# संस्कृतकविपंचक

म्हणजे

कालिदास, भवभूति, बाणभट्ट,

सुबंधु आणि दंडी

ह्यांवरील निबंध.

---

कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर

ह्यांनीं लिहिले.

आवृत्ति तिसरी.

---

सन १९२२ इसवी.

---

किंमत दीड रुपया.

संस्कृतकवि.

# अनुक्रमणिका.

# विष्णुशास्त्री चिपळूणकर.

राष्ट्रांतल्या कांहीं विशेष गोष्टींच्या अभ्युदयास कांहीं विशेष प्रकारच्या व्यक्ति लागत असतात; आणि तशा व्यक्ति कालदेशवर्तमानानुरूप तेथें उत्पन्न व्हाव्या, अशी योजनाही सृष्टिक्रमांत आढळते. श्रीशिवछत्रपति मराठ्यांच्या राज्याच्या अभ्युदयार्थ अवतरले; ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम, वामन, मोरोपंत, इत्यादि महापुरुष आपल्या भक्तिभावाच्या प्रसारार्थ आणि महाराष्ट्र भाषेंतल्या काव्याच्या अभ्युदयार्थ होऊन गेले; तसे, विष्णुशास्त्री चिपळूणकर हे मराठी भाषेच्या गद्यरचनेच्या उन्नत्यर्थ आणि स्वदेशाभिमानाच्या पुनरुज्जीवनार्थ होऊन गेले कीं काय, असें वाटतें. त्यांचें संक्षिप्त चरित्र आम्ही येथें सादर करितों.

सगळ्या जुन्या विद्वन्मंडळांत गाजलेले मोरशास्त्री साठे, हे ज्यांस यथार्थ गुण पाहून मोठ्या कौतुकानें आणि संतोषानें ‘बृहस्पति’ म्हणत असत, त्या सुप्रसिद्ध कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे चिरंजीव हे विष्णुशास्त्री चिपळूणकर होत. म्हणजे हे आमच्यांतले कच होत. हे इ० स० १८५० ह्या वर्षी जन्मले. हे लहानपणापासूनच गरीब आणि संकोचवृत्ति असत. परंतु, त्यांची बुद्धि चांगली होती; आणि त्यांस विद्येची अभिरुचि फार होती. त्यांचे वडील कृष्णशास्त्री हे कांहीं दिवस दक्षिणाप्रैज कमिटीचे सेक्रेटरी होते, आणि पुढें एतद्देशीय वर्तमानपत्रांवरचे व एतद्देशीय पुस्तकांवरचे रिपोर्टर होते; त्यामुळें, त्यांजकडे देशभाषेंतलीं पुष्कळ वर्तमानपत्रें व पुस्तकें येत असत, तीं ह्यांस सहजच वाचावयास मिळत. त्याच्या योगानें ह्यांस मराठी भाषेची फार अभिरुचि लागली,

आणि ह्यांचेठायीं उत्तम मार्मिकता उत्पन्न झाली. हे म्याट्रिक्युलेशनची परीक्षा उतरून, इ० स० १८६५ मध्यें पुण्याच्या कालेजांत गेले, आणि इ० स० १८७२ ह्या वर्षीं बी. ए. झाले. नंतर कांहीं वेळपर्यंत त्यांनी बाबा गोखल्यांच्या शाळेंत शिक्षकाचें काम केलें; आणि मग सरकारी हायस्कुलांत शिक्षकाची जागा पतकरिली. ते मोठे मार्मिक शिक्षक असत. गणित खेरीज करून बाकीचे सर्व विषय—आणि त्यांत विशेषेंकरून भाषाविषय—त्यांस फार आवडत असत; आणि ते विषय ते इतक्या उत्तम रीतीनें शिकवीत म्हणून सांगतात कीं, तें शिकविणें जेव्हां जेव्हां आटपे, तेव्हां तेव्हां विद्यार्थ्यांस वाईट वाटे. मराठी भाषा म्हणजे आपली केवळ माता, तिची सेवा करवेल तितकी केली पाहिजे, असें ते समजत असत. आणि त्याकरितां त्यांनीं, इ० स० १८७४ ह्या वर्षीं **निबंधमाला** हें मासिक पुस्तक चालू केलें. त्यांत कांहीं खरमरीत लेख येऊं लागले, त्यावरून म्हणा, किंवा सरकारी कामांतल्या दुसऱ्या कांहीं कारणावरून म्हणा, त्यांची बदली, इ० स० १८७८ ह्या वर्षीं रत्नागिरीच्या हायस्कुलांत झाली. पुढें त्याच वर्षीं त्यांचे वडील निवर्तले. नंतर त्यांनीं सरकारी चाकरीचा राजीनामा देऊन, कांहीं मित्रांच्या साह्यानें पुण्यास खासगी इंग्रजी शाळा मोरोबादादांच्या वाड्यांत, इ० स० १८८० ह्या वर्षीं घातली. ती आतां पुण्याचें न्यू इंग्लिश स्कूल ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ती त्यांच्या अनुयायांनीं उत्तम प्रकारें चालविली आहे. आणि सगळ्या मुंबई इलाख्यांत त्या शाळेसारखी दुसरी शाळा नाहीं. असें झालें आहे. त्या

होय. तेंही उत्तम चाललें आहे. त्याप्रमाणेंच, केसरी वर्तमानपत्र, मराठा वर्तमानपत्र, चित्रशाळा, किताबखाना, हीं सगळीं झाडें त्यांच्याच हातचीं होत. हीं सगळीं आतां चांगलीं वाढीस लागून, ह्यांस सुंदर फळें येत आहेत. आणि त्या फळांकडे पाहून, जन थक्क होत आहेत. हे विष्णुशास्त्री, नवज्वर होऊन एकाएकीं, इ० स० १८८२ च्या एप्रिल महिन्याच्या १७ व्या तारखेस पुणें येथें कैलासवासी झाले. तेव्हां सगळा महाराष्ट्रदेश फार हळहळला.

विष्णुशास्त्र्यांच्या चरित्रांतल्या मुख्य मुख्य गोष्टी ह्या आहेत. त्यांचें सगळें अवतारकृत्य बत्तीस वर्षांच्या आंत आटपलें. त्यामुळें त्यांच्या योग्यतेचा पूर्ण प्रकाश पडण्यास मिळावा तितका अवकाश मिळाला नाहीं. तरी, सरकारी चाकरीचा राजीनामा देऊन आपल्या आंगच्या बळानें खासगी उद्योगावर निर्वाह चालविण्याचा दृढनिश्चय, खरी निःस्पृहता, खरा मत्सरस्थपणा, आणि आपल्या जन्मभूमीविषयीं खरा अभिमान. हे त्यांचे वर्णनीय गुण बऱ्याच प्रकारें उदय पावून अलीकडच्या नव्या पदवीधर मंडळींतल्या वंद्य पुरुषांत त्यांची गणना होऊं लागली होती, ती अगदीं यथार्थ होती. ते मराठी भाषा उत्तम लिहीत असत. त्यांनीं एकाद्या गोष्टीचें वर्णन केलेलें वाचलें, कीं ती गोष्ट प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांपुढें होत आहे की काय असें वाटतें. त्यांच्या लिहिण्याच्या भाषेमध्यें एक विशेष प्रकारची ऐट आहे. ती ऐट त्यांनीं प्रचारांत आणिली. तिचें अनुकरण आतां पुष्कळ लोक करीत आहेत; तरी तशी ऐट कोणाला साधत नाहीं. आपली खरोखर योग्यता

काय आहे, आणि इतर मत्सरी लोक आपणांस विनाकारण काय काय नांवें ठेवितात, हें त्यांच्या लेखावरून आमच्या लोकांस पुष्कळ कळूं लागलें; आपणांस काय केलें पाहिजे हें त्यांस चांगलें समजलें; आणि स्वदेशाभिमानाच्या अंकुरास पुष्कळ पाणी मिळालें. शिवाय हे गृहस्थ, वागण्यांत अगदीं साधे, मितभाषी आणि फार सालस होते. ह्यांचें सर्व कांहीं अनुकरणीय होतें. मनाचा मोकळेपणा हा त्यांचे ठायीं मूर्तिमंत होता. **निबंधमालेच्या** दुसऱ्या अंकांत त्यांनीं आपल्या उद्देशाविषयीं असें म्हटलें आहे कीं, " आम्हीं दुसऱ्यास वाजवी रीतीनें नांवें ठेवण्यास ज्याप्रमाणें मागेंपुढें पाहणार नाहीं, त्याचप्रमाणें दुसऱ्यांनीं आमच्या लेखाविरुद्ध मतें प्रदर्शित केल्यास त्यांत आम्हांसही अगदीं वाईट वाटणार नाहीं. आपणांस जें खरें वाटतें, तें स्पष्टपणें लिहिण्यास जो भितो किंवा तसें आपणाविरुद्ध कोणी लिहिलेलें ज्यास आवडत नाहीं, तो खरा सत्यनिष्ठ नव्हे, असें आम्ही समजतों. " हें जें शास्त्रीबावांनीं लिहिलें आहे, त्यावरून केवळ त्यांची सत्यनिष्ठा व्यक्त होते असें नव्हे; तर रा. रा. वामन दाजी ओकांसारख्यांशीं त्यांचे जे खडाजंगीचे वादविवाद झाले, त्यांवरूनही त्यांची सत्यनिष्ठता चांगली प्रगट झाली आहे. हे इतके चांगले गृहस्थ आमच्यामध्यें होऊन गेले, ह्याचा आम्हांस खरोखर मोठा अभिमान वाटतो; आणि आमच्या राष्ट्राची उन्नति होण्यास अशाच विभूति उत्पन्न झाल्या पाहिजेत, असें मनांत येतें. देव करो आणि असे अनेक विष्णुशास्त्री आमच्यांत होऊन

# संस्कृत कविता.

## ( उपोद्घात )

"अयि दलदरविंद स्यंदमानं मरंदं
तव किमपि लिहंतो मंजु गुंजंतु भृंगाः।
दिशि दिशि निरपेक्षस्तावकीनं विवृण्वन्
परिमलमयमन्यो बांधवो गंधवाहः॥"[1]

जगन्नाथराय.

प्रस्तुत विषयाची योग्यता किती आहे व तो किती महत्त्वाचा आहे याविषयीं विशेष विस्तारानें लिहिण्याची आजला मुळींच गरज नाहीं. आमच्या देशाच्या सुदैवेकरून या विषयाकडे इंग्रेजी पंडितांचें लक्ष बाकी सर्वांपेक्षां अगोदर लागल्यामुळें, व त्यांच्या द्वारें तो इतर युरोपीय राष्ट्रांसही लवकरच अवगत झाल्यामुळें त्याची जगन्मान्यता तेंव्हांच स्थापित झाली. आमच्या गीर्वाणभाषेंतील काव्यामृतसागराचा एक घुसता पेला चाखतांच द्वीपांतरवासी महान् महान् पंडित अत्यंत विस्मित होत्साते केवळ तल्लीन होऊन गेले;—कोणी आपला कविवर्ग सांडला, कोणी स्वतः अवघ्या जगाच्या स्तुतीस पात्र असतां नम्रत्वें-करून आमचे भाट बनले, कोणी तर आनंदभरांत प्रत्यक्ष देहभानही विसरून गेले! हा सर्व प्रकार झाल्यास अद्याप पुरतीं शंभर वर्षेंही लोटलीं नाहींत तोंच, आमच्या प्राचीन आर्यभाषेचा पगडा साऱ्या जगावर बसून तिला अनेक प्रकारांनीं अग्रगण्यत्व आलें आहे; तिचा अभ्यास जगांतील सर्व मोठमोठ्या पाठशाळांतून मोठ्या आस्थेनें सुरू

---

१ " हे विकास पावणाऱ्या कमला! तुझ्यापासून स्रवणारा जो अत्यंत मधुर मकरंद त्याचें सेवन करून भ्रमर मंजुळ गुंजारव करोत; पण तुझा परिमळ केवळ स्वार्थरहित बुद्धीनें चोहोंकडे फांकविणारा जो वायु त्याचें तुझें ठायीं फार निराळ्या प्रकारचें बंधुत्व आहे!"

होऊन आमच्या जुन्या महान् महान् ग्रंथकारांस पुस्तकालयांतून मुख्य स्थान प्राप्त होत चाललें आहे; आणि जे वेदादि ग्रंथ आमच्या अटोकाट ज्ञानास्तव आम्हांस येथें मातीच्या मोलाचे झाले आहेत तेच युरोपीय पंडितांस केवळ अमोल वाटून टेम्स, ऱ्हाइन् मिसिसिपी वगैरे नद्यांचे तीरीं त्यांचा घोष चालू झाला आहे! अशा समयीं आमच्या देशांत प्रस्तुत विषयाविषयीं जें विलक्षण औदासीन्य आढळतें त्याचा मोठा चमत्कार वाटतो. **पाणिन्या**दि शास्त्रकारांचा, **कालिदासा**दि कवींचा वगैरे ज्यांस अतिशयित अभिमान वाटावा, व त्यांच्या बुद्धिमत्त्वाचें स्वरूप समजून घेण्याविषयीं ज्यांस अतोनात हौस असावी, तेच लोक साऱ्या जगांत त्यांविषयीं केवळ बेफिकीर झाले आहेत; व आपल्या घरची माहिती परस्थ लोकांनीं आपणांस सांगावी याची त्यांस बिलकुल लाज वाटत नाहीं; हें आमच्या देशाची खरी स्थिति ज्यास चांगली माहीत नाहीं त्यास क्षणभर तरी खरें वाटेल काय?

असो; तर अज्ञानापासून उत्पन्न झालेली जी वरील अनास्था ती आपल्या जुन्या विद्येचा अत्यंत चित्तवेधक भाग जो प्रस्तुत कवितारूप विषय त्यापासून तरी कांहीं अंशी कमी करावी या उद्देशानें सांप्रत उद्योग आम्ही हातीं धरला आहे. आतां हें खरें कीं, हा विषय लहानसान आहे असें नाहीं; तसेंच त्याचें यथास्थित विवेचन करणें म्हणजे सामान्य बुद्धीचेंही काम नव्हे. खरें कवित्व ही चीज जशी फार दुर्मिळ आहे; तशीच खरी रसिकताही होय. रत्नपारखे जसे पैशा पांसरी कधींही होत नाहींत, व व्हावयाचेही नाहींत; त्याप्रमाणेंच कवितेच्या मर्मज्ञांचीही गोष्ट होय, कोणा संस्कृत कवीनें म्हटलें आहे—

**मार्मिकः को मरंदानामंतरेण मधुव्रतम् ।**

"मधुव्रताशिवाय म्हणजे भ्रमराशिवाय मकरंदाचा रसज्ञ दुसरा कोण आहे?" तर याच न्यायानें **कालिदासभवभूत्यादि** कविवरांच्या वाणीचे नानाविध गुण प्रगट करण्यास **आरिस्टॉटल्, आडिसन्, जगन्नाथराय** अशांसारखाच कोणी 'मधुव्रत' निर्माण झाला पाहिजे. तसें झालें तरच संस्कृत कवितारूप विशाल कमलवना

पासून मधुबिंदूंचें निष्कासन केलें जाऊन तो अलभ्य लाभ सर्व जनांस होणारा आहे. तथापि ज्या अर्थी वरील प्रकार अद्याप घडण्यांत आला नाहीं, व तो योग केव्हां येईल याचा आज सुमारही करवत नाही, त्या अर्थी सध्यां पक्षीं हा प्रस्तुतचा यत्न आमच्या देशबांधवांच्या बराच उपयोगीं पडेल असें आम्हांस वाटते. त्यांतून या यत्नास पुष्कळजणांचे अभिप्राय अगोदरच अनुकूळ पडले असल्यामुळें आम्हांस विशेष उमेद आली आहे हेंही येथें नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, संस्कृत कवितेचा विस्तार लहान आहे असें नाहीं. नुसते ' रामायण ', ' महाभारत ', ' भागवत ', ' बृहत्कथा[1] ', ' राजतरंगिणी ', येवढेच ग्रंथ घेतले तरी त्यांचें समग्र वाचन म्हटलें म्हणजे लहानसान काम नव्हे. मग याशिवाय ' रघुवंशा ' दि पंच महाकाव्ये; ' शाकुंतल ', ' उत्तररामचरित ' इत्यादि नाटकें; नाटकांचे पुनः चंपू, भाण वगैरे अवांतर प्रकार; आणि सामान्यतः ' काव्य ' या संज्ञेखालीं मोडणारे नानाविषयक लहान मोठे शेंकडो प्रबंध; या सर्वांवर नजर पुरविली तर मोठाच अफाट विस्तार होतो.

---

1 हा ग्रंथ सांप्रत समग्र उपलब्ध नाहीं. याचे कांहीं भाग मात्र सांपडतात; ते एकत्र करून त्यांस ' कथासरित्सागर ' हें नांव दिलेलें आहे. ' बृहत्कथे ' चा कर्ता **गुणाढ्य** होय. यास अनुलक्षून **गोवर्धनानें** दोन ठिकाणीं म्हटलें आहे:—

श्रीरामायणभारतबृहत्कथानां कवीन्नमस्कुर्मः ।
त्रिस्रोता इव सरसा सरस्वती स्फुरति यैर्भिन्ना ॥

तसेंच,

पूर्वैर्विभिन्नवृत्तां गुणाढ्यभवभूतिबाणरघुकारैः ।
वाग्देवीं भजतो मम संतः पश्यंतु को दोषः॥

एका श्लोकांत तर वरील कवीचें व्यासाशीं साम्य मोठ्या चमत्कारिक अर्थानें इंगित केलें आहे—

अतिदीर्घजीविदोषाद्व्यासेन यशोऽपहारितं हंत ।
कैर्नोच्येत गुणाढ्यः स एव जन्मांतरापन्नः ॥

वरील उक्तीवरून स्पष्ट दिसतें कीं, ' सप्तशती ' रचिली त्या वेळेस ' बृहत्कथा ' चांगली प्रचारांत होती

आणि यांतही चार वेद, आणि अठरा पुराणें, यांची जर मोजणी केली, तर कोणी केवढाही जबरा वाचणारा असला, तरी त्याची छाती अगदीं दडपून गेल्याशिवाय राहणार नाहीं! असो; तर याप्रमाणें प्रकृत विषयाच्या सीमा वास्तविकपणें पाहतां महासागराच्या सीमांप्रमाणें सर्वथा दुर्लंघ्य होत. त्या नुसत्या गांठण्यासही एकेका मनुष्याचें सगळें आयुष्य देखील पुरणार नाहीं. मग केवढा प्रचंड विस्तार समग्र धुंडाळून त्याचा बरोबर नकाशा काढणें हें काम तर केवळें दुर्घट आहे याविषयीं बोलायासही नको! तेव्हां प्रस्तुत विषय एका मनुष्यास झेपण्यासारखा मुळींच नसून त्याविषयीं विवरण करणें तर एकेकानें आपापला भाग निवडून घेऊन त्यावर परिश्रम करावे, असें केलें तरच तें होणार आहे हें उघड आहे. आतां वरच्यांतला सर्वांस अत्यंत मनोरंजनावह होणारा व अत्यंत सुगम भाग म्हटला म्हणजे मधला होय; की ज्यास इंग्रेजींत classic literature, व ज्याच्या ज्ञानास इकडे 'काव्यव्युत्पत्ति,' असें म्हणतात. या भागास सुगम असें करतां म्हटलें कीं, 'रामायण,' 'भारत,' 'भागवत' हे इतिहासग्रंथ, व मत्स्यकूर्मादि पुराणग्रंथ हे अतिशयित अवाढव्य असल्यामुळें विस्तारेंकरून दुर्गम होत आणि वेद तर विस्तीर्ण असून शिवाय प्रायः दुर्बोधही आहेत. असो; तर ज्याचें पुढें विवेचन व्हावयाचें तो भाग वर सांगितलेला होय.

---

१ सर् विल्यम् जोन्स् यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे—

"Wherever we direct our attention to Hindu literature, the notion of infinity presents itself; and sure the longest life would not suffice for a single perusal of works that rise and swell protuberant, like the Himalayas, above the bulkiest compositions of every land beyond the confines of India!"

२ वेदांच्या विस्तीर्णत्वाचें व दुर्बोधत्वाचें प्रमाण मोक्षमुल्लर साहेबांचा गेल्या वर्षी संपलेला उद्योग होय. नुसत्या ऋग्वेदाचें चांगलें अध्ययन करून तो सटीक छापून प्रसिद्ध करण्यास वरील वेदमूर्तीस तीस वर्षें लागलीं. वरील ग्रंथ जो १८४५ सालीं हातीं धरला तो १८७५ सालीं समाप्त झाला!

येथील युनिवर्सिटींतून संस्कृत भाषा घातल्यापासून विद्यालयस्थ लोकांचा परिश्रम बहुधा सगळा त्यावरच होत असतो; व त्यामुळेंच त्याची माहिती उत्तरोत्तर आपल्या लोकांस अधिकाधिक होत चालली आहे. मागील काळीं पाहिले तरी पंडित म्हणविणारे लोक याचाच व्यासंग करीत; इतिहास व पुराणें हा भाग पुराणिकांचा असे, व वैदिकांकडे वेदांचें अध्ययन असे. तर या सर्व कारणांवरून प्रकृत विषयाच्या वर सांगितलेल्या भागाचेंच निरूपण करण्याचें मनांत आणिलें आहे.

आतां या निरूपणाचा उपयोग काय असें जर कोणी विचारील तर तो सहज सांगतां येण्यासारखा आहे. वरील प्रश्न अगोदर रसिक व देशाभिमानी पुरुषाच्या तोंडून तर कधींच यावयाचा नाहीं. कारण सुवासिक पुष्पाचा वास घेऊन काय करावयाचें आहे, सुंदर युवतींच्या लीला पाहण्यांत काय अर्थ आहे, हे प्रश्न जसे कोणत्याही मनुष्याच्या तोंडून प्रायः येणार नाहीत; व जर आले तर त्या धन्य पुरुषाचे ठायीं ब्रह्मदेवानें आपली कर्तबगारी कांहीं विशेष रीतीनें ओतली असावी अशी कल्पना करणें जसें प्राप्त होतें; तशीच वरील रसिकशिरोमणींची-ही गोष्ट होय. ज्या कवितेचें लावण्य भाषांतराच्या व्यवधानांतूनही इतकें मनोवेधक झालें कीं, युरोपांतील रसिकवरांची त्या मंदतर प्रभेनें-ही मुरकुंडी वळून गेली; तिचेंच स्वरूप पूर्णपणें दृष्टीस पडलें असतांही आमच्या हृदयवृत्ति जर जडाच्या तशाच तटस्थ राहिल्या, तर इंग्रेजांची नवी सुधारणा आमच्या अंगीं विंबून आमच्या गुरूंवरही आम्हीं कडी केली असें म्हणणें भाग आहे ! असो; तर प्रस्तुत विषयाच्या निरूप-णाचें पहिलें मुख्य कारण त्याचें रमणीयत्व होय. या उपयोगाचें ज्यांस विशेष महत्त्व वाटत नाहीं, व कवितेचें अध्ययन हें केवळ व्यर्थ काल-क्षेप करण्याचें एक साधन होय असें ज्यांस वाटतें, त्यांशीं वाद करून आपला अभिप्रेत अर्थ त्यांच्या मनांत पक्का बिंबवून देतां येईल असा आमचा आम्हांसच भरंवसा नाहीं. यास्तव त्याबद्दल मुळींच पंचा-ईत न करतां इतकेंच सांगतों कीं, प्रस्तुत विषयापासून आपल्या लोकांस वरील मुख्य उपयोगाखेरीज दुसरेही दोन मोठे उपयोग होणारे आहेत. ते, एक स्वभाषेच्या संबंधानें व एक देशाभिमानाच्या संबंधानें असे आहेत.

राष्ट्राच्या संबंधानें उपयोग हा कीं, सध्यां आम्हांस आमच्या विषयींचें जें लज्जास्पद अज्ञान आहे तें नाहीसें होऊन आपली योग्यता वास्तविक किती आहे हें चांगलें कळून येईल. इंग्लंडांतील कित्येक अरण्यपंडितांनीं आम्हांस साऱ्या मानवजातींत अधम पदवी देऊन पशुवर्गाशीं आमचा अत्यंत निकटभाव जो स्थापित केला आहे तो कितपत खरा आहे याविषयीं आमची खात्री होईल, व आमच्या पाश्चात्य गुरूंचे लेख नेहमीं शिरसावंद्यच केले पाहिजेत किंवा प्रसंगविशेष पाहून त्यांची गति वरच्याविरुद्ध करणें अवश्य आहे कीं नाहीं याचा निर्णय होईल. भाषेच्या संबंधानें उपयोग असा आहे कीं, जुनी गीर्वाणभाषा ही चालू देशभाषांची आदिजननी असल्यामुळें व अत्यंत परिपक्व दशेस येऊन पोंचल्यावर तिचा लय झाल्यामुळें तिचें ज्ञान सांप्रतच्या भाषांचें व्युत्पत्तिज्ञान होण्यास व त्यांची अभिवृद्धि होण्यास कारणभूत होणार आहे.

याप्रमाणें प्रस्तुत विषयाच्या स्वरूपाविषयीं व उपयुक्ततेविषयीं विचार झाला. आतां सरतेशेवटीं पुढील निरूपणाच्या संबंधानें एका गोष्टीविषयीं कांहीं लिहून हा उपोद्घात आटपतों. पुढील निबंध सगळे वाचल्यावर वाचकांस कळून येईल कीं, ते केवळ स्वतंत्र बुद्धीनें लिहिले असून इंग्रेजग्रंथकारांच्या किंवा एतद्देशीय पंडितांच्या मतांचें त्यांत बुद्धिपुरःसर अनुकरण केलेलें नाहीं. त्यांचा प्रसंगोपात्त उल्लेख मात्र करून कोठे कोठें त्यांशीं विरोध दाखविला आहे, किंबहुना त्यांचें खंडन ही केलें आहे. आतां यासंबंधें सर्वांस येवढेंच कळविणें आहे कीं, वरील प्रकार दुष्टबुद्धीनें किंवा गर्वानें केला आहे असें नाहीं. आपल्या देशाची सध्यां कोणत्याही गोष्टीविषयीं स्थिति पाहिली तरी ती गेल्या पांच पंचवीस वर्षांत पुष्कळच बदलली आहे. इंग्रेज लोकांची विद्या व वैभव पाहून आम्ही पूर्वीं जसे केवळ चकित होऊन जात होतों, व आम्ही त्यांच्या पुढें काय अगदीं पामर आहों, त्यांची योग्यता आम्हांस कधींही यावयाची नाहीं, असे आमचे समज असत तें सर्व मान आतां अगदीं फिरलें आहे. इंग्रेजी विद्येनें आलीकडे आमच्या मनास नवा संस्कार घडून त्याचीं फळें आज जीं चोहोंकडे दृष्टीस पडताहेत त्यांवरून सर्वांची खात्री होत चालली आहे की, वरील समजुती

साऱ्या चुकीच्या होत्या. बुद्धीच्या मानानें पाहतां आम्ही इंग्रेजांहून मुळींच कमी नसून ज्या कामांत आम्ही मन घालूं त्यांत वरील लोकांची बरोबरी करूंच करूं. हें म्हणणें केवळ फुशारकीचें नव्हें; याचा प्रत्यय दिवसेंदिवस विशेष येत चालला आहे; व आमच्या राज्यकर्त्या लोकांपैकीं अप्रबुद्ध व कोत्या मनाचे जे आहेत त्यांचा आम्हांविषयीं अधिकाधिक द्वेष व मत्सरभाव उत्पन्न होत चालला आहे हें वरील गोष्टीचें उत्कृष्ट प्रमाण होय. असो; तर पुढील लेखांत जो प्रकार दृष्टीस पडेल तो वरील स्थित्यंतराचें फल होय असें समजावें. यापूर्वी युरोपीय पंडित आम्हांस जें सांगतील तें आम्ही निमूटपणीं मान्य करावें, त्यावर आक्षेप काढण्याचीही आम्हांस योग्यता नाहीं, मग खंडन करण्याची वार्ता तर दूरच, असा प्रकार चोहोंकडे असे; पण आतां व पुढें उत्तरोत्तर वरील शिरजोरपणा बिलकुल चालावयाचा नाहीं. इंग्रेजी शिक्षणानें आमच्या बुद्धीस जी तीव्रता आली आहे ती आमच्या गुरूंच्याच गर्वखंडनास अगोदर कारण होईल. त्यांचीं मतें जेवढीं यथार्थ असतील तेवढ्यांचेंच ग्रहण करून अज्ञानास्तव, अरसिकतेमुळें किंवा दुराग्रहानें ज्या मतिभ्रमांचा प्रसार त्यांनीं आजपर्यंत केला आहे व पुढें करतील त्यांचा आमच्या लोकांकडून निरास झाल्याविना कधींहि रहावयाचा नाहीं. त्यांतून प्रस्तुत विषय असा आहे कीं, त्याविषयीं मत देण्यास आम्हांस जो अधिकार आहे तो परस्थ लोक कितीही शहाणे व चतुर असले तरी त्यांस बिलकुल नाहीं. कारण एक तर संस्कृत भाषेचें परिपूर्ण ज्ञान होणें हें परक्यास अगोदर कठीण; आणि त्यांतून राष्ट्रभेदामुळें आमच्या हजारों समजुती व भाव परस्थांस यथास्थित समजणें तर बहुधा अशक्यच होय. यास्तव **शेक्सपीयर**विषयीं **व्हॉल्टेर**

[१] **व्हॉल्टेर** नामेंकरून गेल्या शतकांत फ्रेंच लोकांमध्यें एक मोठा विख्यात मनुष्य होऊन गेला. याची कवि, नाटककार, इतिहासकार इत्यादि निरानिराळ्या प्रकारांनीं कीर्ति झालेली आहे. यानें इंग्लिश भाषेचा उत्कृष्ट अभ्यास केलेला असून तींतलि ग्रंथांची आपल्या लोकांस त्यानें विशेष रुचि लावून दिली. एका गोष्टींत मात्र इंग्लिश लोकांचा व त्याचा अतिशयित मतभेद आहे. तो **शेक्सपीयर** कवीवरून. हा कवि इंग्लिशांनीं केवळ प्रतिदैवत मानिलेला आहे; आणि वरील पंडिताच्या मतें त्याची योग्यता इतकी वाखाणण्यासारखी कांहीं नाहीं.

यानें जे अभिप्राय प्रगट केले आहेत त्यांस इंग्रेज लोक जसे मुळींच मान देत नाहींत, त्याप्रमाणेंच या लोकांतील कित्येक महापंडितांनीं आमच्या प्राचीन कवींवर जीं दूषणें दिलीं आहेत त्यांसही अत्यंत तिरस्कार व उपहास करण्यास आम्हांस पूर्ण अधिकार आहे. यास्तव तो यास्तविक असतां द्वेषबुद्धि किंवा गर्व हीं प्रगट केलींशीं मुळींच होत नाहींत हें सांगावयास नको.

आतां हें खरें कीं, वरील हक्क चालवावयास आम्ही मुखत्यार आहों खरे, तरी तो विशेष कडकपणानें चालविणें आम्हांस उचित होणार नाहीं. कां कीं, आमच्या प्राचीन भाषेचा पुरस्कार पाश्चात्य पंडितांनीं जर घेतला नसता, तर तिची काय दुर्दशा होऊन जाती हे सांगवत नाहीं. रोमन व ग्रीक ग्रंथांची रानटी लोकांच्या धामधुमींत व दीर्घ-काळ चाललेल्या अमलांत जी धुळधाण होऊन गेली व संस्कृत ग्रंथां-चाच मुसलमानांच्या तडाक्यांत यापूर्वीं जो नाश झाला, तो मनांत आणला असतां, ज्या रसिक व थोर मनाच्या लोकांनीं आमच्या जुन्या विद्येचें जिज्ञासाप्रेरित होऊन उत्कंठेनें संपादन केलें, व तसें करून ज्यांनीं तिचें नुसतें रक्षण केलें इतकेंच नाहीं तर तिचा सार्वत्रिक

१ एशिया खंडांत हिंदूंस व पारसीकांस आरब, आफगाण, मोंगल वगैरे रानटी लोक जसे सर्व प्रकारें बाधक झाले, त्याचप्रमाणें युरोपांत गॉल, सेल्ट् वगैरे लोक चोहोंकडे पसरून त्यांनीं रोमची बादशाही मोडून टाकली. या तडाक्यामुळें प्राचीन ग्रीक व रोमन लोकांचे ग्रंथ शेंकडो बुडाले. याचीं दोनच मोठालीं उदाहरणें सांगतों. आथेन्स् येथें तीन मोठमोठे नाटककार झाले होते; त्यांच्या दोन तीनशें नाट-कांपैकीं दहा वीस नाटकें मात्र सध्यां उपलब्ध आहेत. तसेंच लिव्ह-ीनें जितके ग्रंथ रचले त्यांपैकीं एक विसांश मात्र आतां उरला आहे. त्याप्रमाणेंच सन १४५३ सालीं तुर्क लोकांनीं कुस्तुंतुनिया राजधानी जेव्हां हस्तगत केली, तेव्हां त्या शहरांतले व एकंदर सगळ्या देशांतले पंडित पुस्तकसंग्रह पाठीशीं घेऊन जे पळाले ते सगळ्या युरोपभर ठिकठिकाणीं जाऊन राजादिकांच्या आश्रयानें राहिले. या अनिष्ट गोष्टीपासून परंपरेनें युरोपास कोणता मोठा लाभ झाला तो इति-हासज्ञांस विदितच आहे. तो सोळाव्या शतकांतील धर्मक्रांति होय!

प्रसार होण्यासही जे कारणभूत झाले, त्यांचे उपकार साऱ्या भारतवर्षीय जनांवर केवढे आहेत हें सहज ध्यानांत येईल. पण इतकेच नव्हे. [1] वरील लोकांनीं आमच्या प्राचीन ज्ञानभांडाराचा आदर करून हिंदूंचें नांव साऱ्या जगभर गाजविलें येवढेंच जर त्यांनीं केलें असतें, तर ते आमच्या कृतज्ञताबुद्धीस येवढे पात्र होते ना. वरच्याहूनही एक मोठा उपकार त्यांनीं आम्हांवर केला, तो अद्याप सांगावयाचाच आहे. तो हा कीं, आमच्याच जुन्या विद्येचें आम्हांस यथार्थ परीक्षण करण्यास त्यांनीं शिकविलें. म्हणजे आमचीच विद्या खरी, पण तिची खरी योग्यता वरील लोकांवांचून आम्हांस चांगलीशी कळली नसती. या म्हणण्याचा अर्थ असा नाहीं, कीं, आमचे जुने पंडित विद्येनें कमी असून त्यांच्या पेक्षां पाश्चात्य लोकांचें ज्ञान अधिक असतें. असें मुळींच नाहीं. उलटी आमची अशी खात्री आहे, व प्राय: सर्व लोकांची अशीच असेल, कीं, युरोपियन लोकांनीं इकडील ज्ञानाची कितीही चमंडी मारली, व या चमंडीचा किता हुबेहुब उचललेले आमच्यांत जे कित्येक महापंडित आहेत त्यांनीं कितीही वल्गना केल्या, तरी पूर्वींच्या विद्वानांची सर त्यांस लवमात्रही येणार नाहीं. गुरूच्या घरीं विद्याध्ययनांत तपेंच्या तपें काढलेलीं पूर्वींचीं प्रकरणे कोणीकडे, आणि इकडे मोजक्या चार वर्षांत रूपावलीपासून तों अगदीं वेदांपर्यंत, शास्त्रांपर्यंत अभिरथाच्या वेगानें विद्यामार्गक्रमण केलेले आमचे नवे इंग्रेजी पंडित कोणीकडे! तसेच त्यांचे गुरु इंग्लंडांत किंवा जर्मनींत विद्यागुरुत्वाचा टिळा लावून घेऊन इकडे आलेले, व 'पंचतंत्रां' त ज्यांचा हात धरणारा कोणी नाहीं असलें अकटोविकट पांडित्य मिरविणारे ते तरी कोणीकडे! असो; तर विद्येच्या संबंधानें पाहिलें असतां वरील लोकांस

---

१ बडे बडे म्हणविणाऱ्या युरोपीय पंडितांच्या हातूनही किती सामान्य चुका घडतात हें पाहणें असल्यास 'काशीविद्यासुधानिधि' पुस्तक १ अंक १ पहावा. प्रख्यात प्रोफेसर मोनियर व्हिल्यम्स यांच्या कोशांतील कांहीं चुका त्यांत दाखविल्या आहेत, त्या इकडचें एखादें पोरही करणार नाहीं. त्याप्रमाणेंच इकडे आलेल्या शार्मण्यदेशीय पंडितांच्या विद्वत्तेचा व सर्वज्ञतेचा मासला पाहणें असल्यास 'विविधज्ञानविस्तार' पुस्तक ५ अंक १, २ हे पहावे.

पूर्वीच्यांची बरोबरी कधी स्वप्नींही व्हावयाची नाहीं. पण त्यांच्यांत एक गुण मोठा प्रशंसनीय आहे. तो कोणता तर शोधकपणा होय. हा मात्र पूर्वीच्या पंडितांत मुळींच नव्हता म्हटलें तरी चालेल. पिढ्यान् पिढ्यां चालते आलेलीं अलंकारभूषणें जशीं शरीरावर वागवावीं त्याप्रमाणें आमच्या प्राचीन विद्यांचें अध्ययन करून त्या आम्ही जागरूक ठेवीत होतों खरें; पण रत्नें बाळगणारास जशी रत्नांची पारख नेहमीं असतेच असें नाहीं, त्याचप्रमाणें आमची स्थिति होती. आमचे पूर्वा-पार चालत आलेलें धन आम्ही जतन करून ठेवलें हे आम्हांस भूषण-रूप खरें, पण त्याचें चीज या परस्थ लोकांनीच केलें असें म्हटलें पाहिजे. उदाहरणार्थ प्रस्तुत विषयच घ्या. पहा कीं, आमच्या प्राचीन कवि-परंपरेनें आपल्या कृतींतून शब्दार्थचमत्कारांचीं व रसांचीं जशीं कांहीं भांडारें भरून ठेविलीं होतीं. पण त्यांचे आस्वादन आमच्या अर्वाचीन पंडितांकडून कितपत होत होतें हें जर पहावयाचें असेल तर तें अनेक गोष्टींवरून दिसणारें आहे: त्यांच्या टीकांवरून, त्यांच्या आवडत्या ग्रंथांवरून व अवतरणांवरून. **मल्लिनाथ**सारख्यांनीं मोठमोठ्या संस्कृत काव्यांवर सर्वमान्य टीका केलेल्या आहेत; पण त्यांत पाहिलें तर सांपडतें काय? नुसतीं शब्दार्थ, व्याकरणाची कांहीं अडचण असली तर ती, आणि फार झालें तर अमुक स्थलीं अमुक अलंकार झाला आहे, इतकेंच. या तीन चार ठरीव गोष्टींखेरीज त्यांत वाचकास ज्यास्त कांहीं मिळावयाचें नाहीं. इंग्रेजी टीकाकार मूळ काव्यांतलीं रसविशेषात्मक स्थलें, वर्णनाच्या खुब्या वगैरे प्रकार जसे सांगतात, तसें वरील टीकांतून कांहीं आढळत नाहीं. टीकाकारांच्या मतें सारे कवि सारखेच, साऱ्यांचीं काव्यें उत्कृष्टच व सारीच पद्यें बहारीचीं असें असल्यासारखें दिसतें. त्याप्रमाणेंच वरील पंडितांचे आवडते ग्रंथ. यावरूनही वरील गोष्टीचें चांगलें प्रमाण मिळतें. हे अत्यंत प्रियग्रंथ कोणते हें जर पाहिलें, तर एतद्देशीय किंवा पाश्चात्य रसिकांच्या मतें जे उत्कृष्ट ठरले आहेत ते शाकुंतल-रघुवंशादि नव्हत; तर महाकाव्यांत 'नैषध' व लहान काव्यांतून 'भारतचंपू', 'लक्ष्मीसहस्र' वगैरे. 'रघुवंश' 'किरातार्जुनीय' इत्यादिकांचें अध्ययन करावयाचें नाहीं असें नाहीं; पण

भर काय तो वर सांगितल्यासारख्या ग्रंथांवर. त्यांतील एकेक श्लोक निघून त्यांतील पांच पांच दहा दहा श्लेष जेव्हां निघत असतात तेव्हां शास्त्रिमंडळाचा आल्हाद पहावा. 'वाहवारे कवि, आणि धन्य त्याचें कवित्व!' असे उद्गार निघून सारें रसज्ञमंडळ केवळ तल्लीन होऊन जात असतें. मग अशांच्या मुखांतून प्रसंगवशात् जीं वचनें निघतात तीं तरी वरच्याच मासल्याची असतात हें उघडच आहे. ज्यांत एकादा चमत्कारिक श्लेष किंवा व्यावहारिक नीतीचें वगैरे वचन आहे अशाच प्रकारचीं तीं नेहेमीं असतात. ज्यांत वर्णन वगैरे उत्तम आहे अशा प्रकारचें कांहीं निघावयाचें नाहीं. असो; तर युरोपीयन संस्कृतज्ञांचा हा शेवटचा आम्हांवर व आमच्या जुन्या ग्रंथकारांवर मोठा उपकार आहे. व हेंच ध्यानांत आणून त्यांच्या दोषांवर व निंदात्मक टीकांवर विशेष कडक नजर पुरवतां येत नाहीं.

याप्रमाणे पुढील ग्रंथाच्या प्रस्तावनेदाखल जे कांहीं विचार वाचकांस कळविणें अवश्य होते ते दाखल केले. आतां पुढील निरूपण वर सांगितलेल्या नव्या पद्धतीस अनुसरून केलें आहे हें सांगणें नकोच. तें पुढील विषयक्रम पाहिला असतां सहज समजेल. पहिल्यानें प्रत्येक कवीच्या कालाचा निर्णय, पुढें त्यांच्या ग्रंथांचा निर्देश व त्यांचें विवेचन, आणि शेवटीं उत्कृष्ट स्थलांपैकीं कांहींचे उतारे असा क्रम धरलेला आहे. यांत साऱ्या विषयाचा समावेश होऊन मराठी वाचकांस किंवा संस्कृताचें अध्ययन करणारांस जें अपेक्षित आहे तें सर्व येईल असें वाटतें.

असो; आतां पहिल्या कवीस आरंभ करूं. तो कोणता याविषयीं कोणासही संदेह प्राप्त होणार नाहीं. कालाच्या मानानें व योग्यतेच्याही मानानें ज्याचें पहिलें नांव आहे असा ऐकच कवि आहे. जयदेवानें म्हटलें आहे.

यस्याश्चोरश्चिकुरनिकरः कर्णपूरो मयूरो
भासो हासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः।
हर्षो हर्षो हृदयवसतिः पंचबाणस्तु बाणः
केषां नैषा कथय कविताकामिनी कौतुकाय ॥

ज्या कवितावधूचा **चोर** हा चिकुरनिकर ( केशपाश ), **मयूर** हा कर्णपूर ( कर्णभूषण ), **भास** हा हास ( हास्य ), कविकुलाग्रणी गुरु म्हणजे कविश्रेष्ठ जो **कालिदास** तो जिचा विलास, **हर्ष** हा हर्ष ( चित्ताचा उल्हास ),आणि **बाण** हा जिच्या हृदयांत संचार करणारा साक्षात पंचबाण ( मदन ) होय, ती कोणाच्या मनास कौतुक करीत नाहीं ? ”

तर यांत सांगितल्याप्रमाणें कविकुलगुरूपासूनच विषयविवेचनास आरंभ करूं.



---

१ **चोर** कवीनें 'चौरपंचाशिका' रचिली. या काव्याचा वृत्तांत मोठा चमत्कारिक आहे. **मयूरानें** 'सूर्यशतक' रचिलें. या 'शतका' चीही दंतकथा अद्भुत आहे. **भास** हा **धावक** या नावानेंही प्रख्यात आहे. याचे ग्रंथ विशेष प्रसिद्ध नाहीत. **कालिदासा**विषयीं या टिपेंत कांहीं सांगायला नकोच. **हर्ष** हा **श्रीहर्ष** नांवानें साऱ्या संस्कृतज्ञांस माहीत आहे. हा 'रत्नावली', व प्रसिद्ध 'नैषध' काव्य यांचा कर्ता. 'राजतरंगिणी'तला हर्षदेव नांवाचा काश्मीरचा राजा तोच हा असावा असें युरोपीय पंडितांचें मत आहे. **बाण** कवि 'कादंबरी'चा कर्ता. याविषयीं पुढें एक निबंध येणारच आहे. वर सांगितलेलीं दोन काव्यें 'काव्यसंग्रहां'त आहेत.

# कालिदास.

> निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु ।
> प्रीतिर्मधुरसान्द्रासु मंजरीष्विव जायते ॥[1]
>
> हर्षचरित—बाणभट्ट

कालिदासाची स्वतःविषयींची माहिती बहुधा होमरकवीप्रमाणें अद्याप निश्चित कांहींच समजली नाहीं असें म्हटलें पाहिजे. त्याची कीर्ति आज निदान हजार दीड हजार वर्षें तरी त्याच्या स्वदेशांत केवळ अद्वितीयत्वेंकरून चोहोंकडे पसरली असतां, व त्याचें नांव आबालवृद्धांच्या तोंडीं असतां, तो कोण होता, कोठें होता, व केव्हां होता, येवढें सुद्धां कोणासही माहीत नाहीं. वरील तिन्ही गोष्टींचा शोध लावण्याविषयीं इंग्रजी व एतद्देशीय पंडितांनीं पुष्कळ खटपट केली आहे; पण अद्याप म्हणण्यासारखें यश कोणासही आलें नाहीं. त्याची जात, स्थळ व काळ हीं अद्याप अनिश्चितच आहेत. कोणी म्हणतात, तो सारस्वत ब्राह्मण होता; कोणाच्या मतें तो काश्मीरचा राहणारा होता; कोणाच्या मतें उज्जनीचा; व कोणाच्या मतें धारानगरीचा. काळाविषयीं पाहिलें तर कोणाच्या मतें तो इसवी शकाच्या पूर्वीं पहिल्या शतकांत झाला; व कोणाच्या मतें त्याच शकाच्या पुढें सहाव्या शतकांत झाला. याप्रमाणें कालिदासाविषयीं निश्चयात्मक गोष्ट अशी कोणतीच कळत नाहीं. कोणीतर दोन निरनिराळे कालिदास कल्पितात. 'शाकुंतला'दि ग्रंथांचा कर्ता जो महाकवि तो उज्जनीचा; व 'नलोदया'दि क्लिष्ट व सामान्य प्रतीचीं काव्यें ज्यानें रचिलीं तो भोजराजाच्या पदरचा धारेस राहणारा दुसराच कोणी कवि असून त्याचेंही नांव कालिदास असावें, अशी वरील लोक अटकळ करतात. सारांश, ग्रीस देशाच्या आद्यकवीप्रमाणें आमच्या महाकवीची आजपर्यंत सारखी ओढाताण

1 "कालिदासाचीं उत्तम वचनें निघालीं असतां, मधानें थबथबलेल्या नूतन मंजरी पाहून जसा आनंद होतो तसा कोणास होत नाहीं?"

चालून मथितार्थ तो अजून कोणताच निष्पन्न झाला नाहीं. असें करतां करतां एक मात्र न हो म्हणजे झालें, कीं **होमर**चा शोध करतां करतां तो मुळींच नव्हता असें जसें ठरलें, त्याप्रमाणें आमच्या बिचाऱ्या कवीच्या अस्तित्वावरच येऊन एकादे वेळेस न बेतो !'

**कालिदासा**विषयीं आपणास कांहींच माहीत नसण्याचें एक मोठें कारण हें आहे कीं, त्यानें आपल्या ग्रंथांतून स्वतःविषयीं एक अक्षरही लिहिलें नाहीं. **भवभूति, बाण** वगैरे कवींनीं आपली कुल-कथा ग्रंथारंभीं जशी दिली आहे, व बहुधा सर्व कवींची स्वतःविषयीं वाचकांस व विशेषतः पुढील लोकांस कांहीं तरी माहिती देण्याची जी रीत आढळते, ती **कालिदासा**चे ठिकाणीं मात्र बिलकुल आढळत नाहीं. आपणाविषयीं इतर माहिती तर काय, पण या कवीनें आपल्या ग्रंथांवर स्वतःचें नुसतें नांव सुद्धां घातलें नाहीं. त्याची कीर्ति पहिल्या-पासूनच दिगंतरीं पसरून त्याचे ग्रंथ अवघ्या राष्ट्रास अत्यंत प्रिय व वंद्य होऊन जर न राहते, व त्यानें नाटकें रचिलीं नसतीं, तर त्याचें नांवही बुडून जाण्याचा संभव होता. तें वरील दोन्ही गोष्टींमुळेंच केवळ राहिलें आहे. तरी प्रस्तुत कवीच्या मौनापासून एक मोठा घोटाळा झालाच आहे. तो हा कीं, पुष्कळ सामान्य प्रतीचे व कित्येक अप्रयोजक ग्रंथही त्याच्या नांवावर मोडून आजपर्यंत चालत आले आहेत. आणि पूर्वींच्या पंडितांत मागें उपोद्घातांत सांगितल्याप्रमाणें शोधकता गुण मुळींच नसल्यामुळें ते सर्व त्याच्या मोठ्या नांवावर आजपर्यंत खपलेही गेले². अमुक अमुक काव्यावर **कालिदासा**चें नांव आहे खरें; पण

१ जर्मनींत **वुल्फ्** नामें करून एक पंडित होऊन गेला. त्यानें असें मत काढिलें कीं, **होमर** म्हणून कोणी मनुष्यच मुळीं नव्हता. तर 'इलियड्' व 'ऑडिसी' हीं काव्यें अनेक कवींनीं मिळून रचिलीं आहेत, व तीं वरील नांवानें आजपर्यंत चालत आलीं आहेत इतकेंच समजावयाचें. या मताचें आलीकडे विशेष प्राबल्य नाहीं.

२ ग्रंथ नांवाखेरीज प्रसिद्ध असले म्हणजे दोन प्रकारचे अनर्थ होतात. एक हलक्या प्रतीचे ग्रंथ नामांकित ग्रंथकाराच्या नांवावर लादून देण्यास फावतें; आणि दुसरें हें कीं, दुसऱ्याच कोणा मनुष्यास

[ पुढें चालू ]

त्यांत त्याचे कवित्वगुण कितपतसे दृष्टीस पडत आहेत येवढ्याचाही विचार करण्याचे पूर्वी कोणाच्याही मनांत बिलकुल येत नसे. यास्तव त्याचे म्हणून आजपर्यंत सर्वांना मानिलेल्या ग्रंथांतून अर्वाचीन पंडितांनी कित्येक काढून टाकून ते खोटे ठरविले आहेत; उदाहरणार्थ ' मालविकाग्निमित्र ' नाटक, आणि ' नलोदय ' काव्य. वरील नाटक कालिदासाचें नव्हे, किंवा निदान खऱ्या कालिदासाचे तरी नव्हे, असा अभिप्राय विल्सन् साहेबांनीं एके ठिकाणीं दिला आहे; व तेव्हांपासून त्याविषयीं सर्वांच्या मनांत संदेह उत्पन्न झाला आहे. आणि येवढें खरें की, ते नाटक वाचिलें असतां रसज्ञ जनांस " शाकुंतल " व ' विक्रमोर्वशी ' हीं रचणाऱ्या कवीची कृति आपण वाचली असें भासत नाहीं. ' नलोदय ' काव्याची गोष्ट तर त्याहूनही निराळी आहे. ज्याच्या अंगीं लेशमात्र म्हणून रसिकता आहे, व कालिदासाच्या कवित्वाची ज्यास यत्किंचित् तरी ओळख आहे, त्यास वरील क्लिष्ट काव्याच्या कर्तृत्वाविषयीं बिलकुल संशय राहणार नाहीं. संस्कृत

---

आपलें नांव घुसडून देण्याचीही संधी होते. या दुसऱ्या अनर्थापासून आपल्या कवित्वाचें रक्षण करण्याकरतां जगन्नाथरायानें ' भामिनी-विलासा ' च्या सरतेशेवटीं एक पद्य घातलें आहे:—

दुर्वृत्ता जारजन्मानो हरिष्यंतीति शंकया ।
मदीयपद्यरत्नानां मंजूषैषा मया कृता ॥

" दुष्ट रांडलेक माझ्या पद्यरत्नांचें हरण करतील या शंकेस्तव ही पेटी मीं केली आहे."

पंडितराजांचीं रत्नें सारीं गुंफलेलीं नसून बहुतेक विसकळलेलीं असत; त्यामुळें तर वरील भय विशेषच होतें !

१ विल्सन् साहेबानें वरील प्रतिकूल अभिप्राय आपल्या ' हिंदु थियेटर ' नांवाच्या ग्रंथांत दिला आहे. या ग्रंथांत संस्कृत नाटकांतील कित्येक उत्कृष्टांचें इंग्रजी भाषांतर केलेलें असून बाकीच्यांचें थोडें बहुत स्वरूपकथन केलें आहे. वरील नाटकाच्या कर्तृत्वाविषयींच्या वादावर आमचे विद्यालयगुरु रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांनीं आपल्या नवीन आवृत्तीच्या प्रस्तावनेत जो उत्कृष्ट निबंध लिहिला आहे त्याविषयींही येथें उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं.

कवींच्या कुलगुरूची प्रसन्न व सरस वाणी कोणीकडे, आणि नारिकेल-पाकतुल्य असें वरील हठकवित्व कोणीकडे ! आजपर्यंत साऱ्या पृथ्वी-वर जेवढे म्हणून मोठमोठे कवि होऊन गेले त्यांपैकीं कोणीही वरच्या-सारखा गारुडी चमत्कार करण्यांत भूषण मानिलें नाहीं. उलटा सर्वांनी त्याविषयीं तिरस्कार मात्र दाखविला आहे. शब्दचमत्कार मोठ्या प्रयासानें साधून अरसिक लोकांची वाहवा मिळविण्याची वेडी हौस खालच्या प्रतीच्या कवींत मात्र दृष्टीस पडते. हा प्रकार पुढें कांहीं कवींच्या विवरणांत दाखविण्यांत येईल. कालिदासादिकांचीं श्रोतृ-चित्तरंजन करण्याचीं निराळींच साधनें असतात. गोवर्धनाचार्यांनीं म्हटलें आहे.

साकूतमधुरकोमलविलासिनीकंठकूजितप्राये ।
शिक्षासमयेऽपि मुदे रतलीलाकालिदासोक्ती ॥

" शिक्षणसमयींही आल्हादप्रद होणारे दोनच विषय होत. एक स्त्रीसमागम, आणि दुसरा कालिदासाची कविता. पहिला कसा आहे, तर तो कामिनींच्या मधुर, कोमल व भावयुक्त अशा मंद आलापांनी परिपूर्ण; आणि दुसरी कविता ही वरील मुग्ध भाषणा-प्रमाणें मनोहर होय.

असो; तर याप्रमाणें कालिदासाच्या नांवावर चालत आलेल्या कांहीं ग्रंथांवर संशयात्मकता आहे; व तिला या कवीचा वर सांगितलेला विशेष प्रकार कारणभूत झाला आहे. आतां जे ग्रंथ त्याचे खरोखरीच आहेत, म्हणजे ज्यांतील रचनेवरून व आजपर्यंत चालत

---

१ नुसत्या शब्दचमत्कारमय काव्यानें खऱ्या रसिकास मुळीच संतोष होत नाहीं हा अर्थ 'आर्यासप्तशती' त मोठ्या सरस व मार्मिक दृष्टांतानें व्यक्त केला आहे---

रतरीतिवीतवसना प्रियेव शुद्धाऽपि वाङ् मुदे सरसा ।
अलसा सालंकृतिरपि न रोचते शालभंजीव ॥

तसेंच,

अध्वनि पदग्रहपरं मदयति हृदयं नवा नवा श्रवणम् ।
काव्यमभिज्ञसभायां मंजीरं केलिवेलायाम् ॥

आलेल्या लोकप्रसिद्धीवरून जे त्याचेच ठरतात, त्यांविषयीं क्रमाक्रमानें विवेचन करूं.

असा ग्रंथ पहिला म्हणजे 'ऋतुसंहार' होय. यांत षड्ऋतूंचें वर्णन आहे. निरनिराळ्या ऋतूंत सृष्टीचीं निरनिराळीं रूपें जीं दृष्टिगोचर होतात त्यांचें यांत संस्कृत कवींच्या रीतीनें कवीनें वर्णन केलें आहे. या काव्यांतील गुण विशेषेकरून म्हटले म्हणजे मधुर व कोमल पदरचना, व कविसंप्रदायानुरूप सरस अर्थाचें निबंधन येवढेच होत. यावरून पाहतां असें वाटतें कीं, आमच्या कवीनें स्वाभाविक शालीनतेस अनुसरून हा सोपासा विषय पहिल्यानें हातीं घेतला असावा, व ज्या वाग्देवीच्या सर्वस्वाचें व पूर्ण कृपेचें तो पुढें पात्र झाला तिला वरील लहानशा काव्याच्या रूपानें त्यानें प्रथम नमन केलें असावें. आलीकडील इंग्रेजी कवितेच्या अभ्यसनानें सृष्टिवर्णनाच्या नव्या प्रकारांशीं जे परिचित झाले असतील त्यांस प्रस्तुत काव्यांतील वर्णन फारसें पसंत पडावयाचें नाहीं. यांत वैचित्र्य विशेष नसून सृष्टीचें पूर्ण व सूक्ष्म अवलोकन नाहीं असें दूषण ते त्यावर ठेवतील. आणि या दूषणाचें निरसन करण्यास मार्गही नाहीं खराच. प्रकृत काव्याच्या तर्फेनें येवढें मात्र म्हणतां येईल कीं, तें केवळ त्यासच लागतें असें नाहीं. संस्कृत कवितेंतील सृष्टिवर्णनाचा प्रकार सामान्यतः पाहतां बोहोंकडे असाच आढळतो. याच कवीच्या 'रघुवंशां'त वसंत व ग्रीष्म ऋतूंचें वर्णन आहे, 'कुमारसंभवां'त पुनः वसंताचेंच वर्णन आहे, व तसेंच 'मृच्छकटिक' नाटकांत वर्षाकाळाचें, 'कादंबरी'त वसंत व वर्षाकाळ यांचें, किरातार्जुनीयां'त शरदृतूचें आणि 'शृंगारशतकां'त पांचाही ऋतूंचें, इत्यादि निरनिराळ्या स्थळीं संस्कृत कवींचीं ऋतुवर्णनें आहेत. परंतु येथून तेथून एकच प्रकार दृष्टीस पडतो. वसंतवर्णनांत कोकिलाचे शब्द व आम्रांचा मोहोर ग्रीष्मवर्णनांत चांदणें व शीतल उपचार, वर्षावर्णनांत मयूर व चातक, शरद्वर्णनांत हंस व स्वच्छ

---

१ कालिदासाच्या ग्रंथांचा अनुक्रम कालच्या मानानें लावतां येणार नाहीं हें उघडच आहे. यास्तव तो त्यांच्या उत्कृष्टत्वावरूनच सदरील लेखांत लावला आहे.

चांद्रिका, आणि हेमंत व शिशिर यांत थंडी व वाऱ्याचे सोसाटे इत्यादि अति प्रसिद्ध गोष्टींखेरीज कोठेंही निराळें वर्णन केलेलें आढळत नाहीं. इंग्लिश कवितेंत ज्याप्रमाणें उंच उंच पर्वतांचे, त्यांवरून चोहोंकडे दिसणाऱ्या भव्य व रम्य देखाव्यांचे, तुफानांत खवळलेल्या समुद्राचे, वगैरे वर्णन असतें, तसें संस्कृतांत फारसे आढळत नाहीं. फार काय पण समुद्रावरच्या वादळास संस्कृतांत शब्द तरी असेल की नाहीं याची शंकाच वाटते. 'वात्या,' 'वात्याचक्र' वगैरे शब्द आहेत, पण ते जमिनीवरील वावटळासच लागतात. असो; इंग्लिश व संस्कृत कवितांची तुलना करूं गेले असता दोहोंमध्ये असे पुष्कळ विशेष सांपडतील; पण त्यांत हा फरक फार ठळक असून भाषाभिज्ञांनीं चांगला विचार करण्याजोगा आहे. सृष्टीचे चमत्कार व भव्य देखावे पाहून सामान्य विचारी मनुष्याचें मन देखील रंगून जाऊन थक्क होतें; मग 'मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः'[1] असे प्रत्यक्ष अनुभव ज्यांस आले आहेत अशा कवीश्वरांचें मन तर त्यांस पाहून किती तल्लीन व्हावें! पण तसा प्रकार त्यांच्या वर्णनांत पाहूं जावें तो विशेषतः दृष्टीस येत नाहीं. याचीं कारणें सूक्ष्म विचाराअंतीं पुष्कळ सांपडतील यांत संशय नाहीं; तरी सकृद्दर्शनी त्यांतील मुख्य मुख्य जीं कारणें दिसतात तीं सांगतों. **कालिदास, बाण** इत्यादि कवींनीं राजधानींत होणाऱ्या महोत्सवांचें, राजांच्या अंतःपुरांचें वगैरे जें जागोजागीं वर्णन केलें आहे त्यावरून ते राजांच्या आश्रयानें होते हें स्पष्ट दिसतें. तेव्हां अर्थातच अरण्यसृष्टींतील चमत्कार पहात हिंडण्यास त्यांस हवें तसें स्वातंत्र्य नसे. शिकारीस वगैरे राजांची स्वारी जातांना मात्र कधीं कधीं त्यांस असे प्रसंग यावयाचे; यास्तव तशांचें त्यांनीं अनेक स्थळीं वर्णन केलें आहे. इतर जें 'ऋतुसंहार' इत्यादि काव्यांतून वर्णन आहे तें केवळ नगरांतल्या नगरांत किंवा उपवनांत जे सृष्टिचमत्कार दृष्टिगोचर होण्यासारखे आहेत त्यांचेंच होय. दुसरें

---

१ 'सुखिताचेंही व्याकुल होतें मन पाहुनि मेघास.'
'पद्यरत्नावलि.'

असं कीं, आपल्या लोकांत, व विशेषत: ब्राह्मणांत, नित्यनैमित्तिकांचा फार व्याप असल्यामुळें तोही तसाच कवींस यासंबंधें बाधक झाला असावा; आणि सृष्टीची तऱ्हेतऱ्हेचीं भव्य स्वरूपें बघण्याचा व वर्णन करण्याचा तादृश हव्यास न लागून मानवी स्वभाव व निरनिराळे मनोव्यापार यांकडेच त्यांच्या विचारांची विशेष प्रवृत्ति झाली असें दिसतें. साहित्याचा म्हणजे अलंकारशास्त्राचा या देशांत जो इतका उत्कर्ष झाला त्याचें मूळ हेंच असावें. वर्णावयाचे विषय थोडके व नियमित असले म्हणजे पुढील कवींस तेच विषय अनेक प्रकारांतरांनीं वर्णावे लागतात; त्यावांचून उपाय नसतो. **वाल्मीकि, व्यास** इत्यादि आद्यकवींच्या ग्रंथांत ज्या विचाराचा अगदीं साध्या रीतीनें उल्लेख केला असतो त्यांसच अलंकाराच्या थाटामाटानें पुढील कवि सजवतात. मुख चंद्राप्रमाणे रमणीय आहे येवढाच नुसता साधा अर्थ असतां पुढचे कवि त्यावरच कोणीं रूपक, कोणी उत्प्रेक्षा, कोणी विरोधाभास, कोणी श्लेष इत्यादि अलंकारांची गर्दी करतात. याप्रमाणे या शास्त्राची वृद्धि होत जाऊन त्यामुळें संस्कृत भाषेस इतकें वैचित्र्य आलें आहे कीं, तसें इंग्लिश किंवा इतर कोणत्याही भाषेंत बहुधा सांपडणे कठीण. तिसरे कारण असें दिसतें कीं, पदार्थविषयक शास्त्र, म्हणजे ज्योतिष, रसायन, दर्शनानुशासन, इत्यादिकांचा या शतकांत विलक्षण फैलाव होऊन सृष्टीचे अनेक गुप्त व्यापार उदयास येत चालले आहेत; व **विधात्यानें** अपार चातुर्यानें जी तिची रचना केली आहे तीही अधिकाधिक व्यक्त होत आहे. यामुळें क्षुद्र कीटकापासून तों अंतराळांतलि गोलांपर्यंत सर्व विश्व चमत्कारमय भासून त्याच्या देखाव्यांनीं पूर्वींच्या कवींस जो आल्हाद होत असे तो आतां शतगुणित वाढला आहे. म्हणूनच या शतकाच्या आरंभीं झालेल्या इंग्लिश कवींनीं जीं वर्णनें केलीं आहेत, तीं फारच उत्कृष्ट आहेत. **वर्डस्वर्थ्** या कवीस तर सृष्टीचें वैभव पाहण्याचा इतका हव्यास असे कीं, त्याचा सर्व जन्म डोंगराळ प्रदेश, नद्या, मैदानें यांवर फिरतांनाच गेला. असो; तसें आपल्या कवींस कांहींच अनुकूळ नसल्यामुळें ही न्यूनता त्यांच्या काव्यांत दृष्टीस पडते असें म्हणण्यास जागा आहे.

'कुमारसंभव' हें महाकाव्य कालिदासानें मध्यम वयीं लिहिलें असावें असें वाटतें. याची कथा शैवपुराणांतून घेतली आहे. आरंभीं हिमालय, जो पार्वतीचा पिता, त्याचें वर्णन असून पहिल्या सर्गांत पार्वतीचा जन्म व तिची मुग्धावस्था हीं वर्णिलीं आहेत. दुसऱ्यांत त्रिजगत्पीडक जो तारकासुर त्यानें गांजलेले इंद्रादि देव ब्रह्मदेवास शरण गेले आहेत; ब्रह्मदेवानें मदनास वश करून घे अशी युक्ति इंद्रास सांगितली आहे. तिसऱ्यांत मदन येऊन त्यानें इंद्रानें सांगितलेलें जें शिवप्रेरणेचें काम तें पत्करून आपला सहाय्य जो वसंत त्यास प्रगट होण्यास सांगितलें. मग पार्वती शिवदर्शनास आली असतां तिजविषयीं मदनानें शिवाच्या हृदयांत क्षणभर कामबुद्धि उत्पन्न केली; पण ती लागलीच आवरून शिवानें चोहोंकडे क्रोधाग्नीची दृष्टि फेकली. ती मदनावर पडतांच त्याची तत्क्षणीं राख झाली. चवथ्यांत मदनाची जी रति तिचा शोक वर्णिला आहे. शोकानें संतप्त होऊन तिनें वसंतास चिता रचावयास सांगितली; पण इतक्यांत आकाशवाणीनें तिला पतिप्राप्तीविषयीं आश्वासन दिल्यावरून तो बेत तिनें सोडला. पांचव्यांत पार्वतीचें तप वर्णिलें आहे. शिव एकाएकीं अंतर्धान पावून तिचा जो अपमान झाला त्याबद्दल फार कष्टी होऊन तिनें हिमालयावर उग्र तपश्चर्या करण्याचा निश्चय केला. मग पुष्कळ काळ लोटल्यावर एके दिवशीं एक मुनि तिच्या आश्रमांत आला. त्याचें तिनें आगत स्वागत केल्यावर त्यानें तिला अशा घोर तपश्चर्येचें कारण काय म्हणून विचारिलें. मग सखीच्या मुखानें त्या मुनीस सर्व वृत्तांत सांगितल्यावर त्यानें मोठा विस्मय झालासा दाखविला, आणि अमंगलरूप जो शिव त्यावर तुझें इतकें प्रेम असावें हें फार अयोग्य असें सांगून त्याची निंदा करूं लागला. तें सर्व ऐकून पार्वती फार संतापली, आणि शिवाचा अगाध महिमा तुजसारख्या कुटाळास कोठून समजावा, वगैरे भाषणांनीं तिनें त्याची निर्भर्त्सना केली; आणि तो पुन: तेंच बोलणार इतक्यांत 'या बटूस येथून घालवून दे' म्हणून तिनें आपल्या सखीस सांगितलें; आणि आपण रागानें तेथून चालती झाली. इतक्यांत त्या मुनीनें आपलें खरें शिवरूप प्रगट करून तिचें निवारण केलें, व आजपासून मी तुझा दास

झालों असें बोलून तिला आपल्या तपाची कृतार्थता दाखविली. सहाव्यांत शिवांनीं सप्तर्षीचें स्मरण करतांच ते आले आहेत; मग हिमालयापाशीं जाऊन पार्वतीविषयीं मागणीं घालावी अशी आज्ञा होतांच ते तिकडे गेले, आणि विवाहनिश्चय केला. शेवटल्या म्हणजे सातव्यांत त्या संस्काराचे सर्व सोहळे वर्णिले आहेत. शिव-पार्वती हीं कालिदासाचीं उपास्यदैवतें होतीं असें त्याच्या बहुतेक ग्रंथांवरून व त्याच्या नांवावरूनही दिसून येते. तिन्ही नाटकांच्या आरंभींच्या नांद्या शिवनमस्कृतिपर आहेत; 'रघुवंशां'त आरंभीं व कोठें कोठें मधेंही शिवास उद्देशून श्लोक आहेत, आणि 'मेघदूतां'त तर तसे पुष्कळच आहेत. प्रस्तुत काव्यांत त्यांच्या विवाहापर्यंत सर्व गोष्टी वर्णिल्या आहेत; व 'कुमारसंभव' म्हणजे 'कार्तिकेयाचा जन्म' या नांवावरून पाहतां येथेंच काव्याचें पर्यवसान. परंतु आलीकडे आणखी पुढील दहा सर्गांचा शोध लागला आहे; व त्यामुळें तेही कालिदासानेंच केले कीं नाहीं असा नवाच वाद उत्पन्न झाला आहे. बहुतेकांचा रोख हे सर्व कालिदासकृत नव्हेत असेंच मानण्याकडे दिसतो. ते म्हणतात कीं, जर कालिदासानेंच हे रचिले असते तर तो या काव्यास 'तारकवधम्' किंवा असेंच कांहीं दुसरें नांव देता; 'कुमारसंभव' असें देताना. शिवाय कालिदासाचा प्रख्यात टीकाकार जो मल्लिनाथ त्याची टीकाही सात सर्गांपर्यंतच सांपडते, पुढें मुळींच सांपडत नाहीं; यावरून असें दिसतें कीं, हे त्याच्या वेळेस अगदीं अप्रसिद्ध होते, किंवा प्रसिद्ध असून त्यांस कालिदासकृत मानीत नसत. परंतु दुसऱ्या कोणाचें असेंही मत आहे कीं, हे साक्षात् कालिदासाचे तर नव्हेत, पण त्याच्या एकाद्या शिष्याचे वगैरे असतील. म्हणजे ज्याप्रमाणे 'कादंबरी' ग्रंथाचा उत्तरभाग बाणभट्ट कवीच्या पुत्राने रचिला तसें कांहीं याही काव्याच्या संबंधें कदाचित् झालें असेल. ही दुसरी कल्पना करण्यास तरी आधार असा आहे कीं, या पुढील सर्गांचा पहिल्या सातांशीं अगदी विजोडच होतो असें भासत नाहीं. पुष्कळ शब्द, शब्दसमूह, व लिहिण्याची एकंदर धाटणी दोहोंतही सारखीच दृष्टीस पडते. तरी प्रौढता, अर्थचमत्कार वगैरे गुण पहिल्या-

प्रमाणें पुढल्यांत उतरलेले दिसत नाहींत. अशीं या ग्रंथाविषयीं पंडि-तांचीं भिन्न भिन्न मतें आहेत. तरी ज्या अर्थी या संशयजालाचें निरसन करून स्पष्ट निर्णय दिलेला अजून कोठेंही आढळत नाहीं त्याअर्थी या उत्तरसर्गांचें कर्तृत्व वादग्रस्त आहे असें समजून कोणताही पक्ष सध्यां धरवत नाहीं.

या काव्यांत जागोजागी सुंदर वर्णन आहे, व शृंगार आणि शोक हे रस मुख्यत: साधले आहेत. उत्तम श्लोकांचे व भाषणांचे उतारे घेऊं लागल्यास फारच विस्तार होईल हें सांगणें नको. यास्तव येवढें मात्र सांगतों कीं. आरंभींचें हिमालयवर्णन आणि पांचव्या सर्गांतील वेषधारी मुनि व पार्वती यांचा संवाद हीं फार उत्कृष्ट आहेत. पर्वता-वरील अनेक सृष्टिचमत्कारांचें वर्णन मोठें चमत्कारिक व भव्य केलें आहे. तसेंच पांचव्या सर्गांत त्या कपटमुनीनें पार्वतीच्या प्रेमाची परीक्षा पाहण्याकरितां केलेलें कपटाचें भाषण, आणि त्याची पार्वतीनें जी निर्भ-र्त्सना केली तीहि फार मनोवेधक आहेत.

**कालिदासाचे** अत्युत्कृष्ट ग्रंथ ' रघुवंश ' ' मेघदूत, ' ' शाकुं-तल ' नाटक, आणि ' विक्रमोर्वशी ' नाटक हे होत; यास्तव हे त्यानें प्रौढवयांत रचले असावे असें दिसतें. ' रघुवंशां ' त सूर्यवंशी राजांचें वर्णन आहे. दिलीप, रघु, अज, दशरथ, राम, कुश, व अतिथि यांच्या दिग्विजयादि प्रतापांचें व त्यांस संसारांत ज्या सुखदु:खांचा अनुभव घडला याचें वर्णन पहिल्या सतरा सर्गांत केलें आहे. अठरा-व्यांत अतिथि राजाचे जे पुढें पुष्कळ वंशज झाले त्यांचें संक्षिप्त वर्णन आहे. आणि शेवटल्या एकोणिसाव्यांत अग्निवर्ण नामक जो रघुवंशां-तील शेवटला राजा त्याचा शृंगार व अंत वर्णिला आहे. ' रघुवंश ' हें काव्य **कालिदासा**च्या सर्व काव्यांत श्रेष्ठ होय. प्रौढ व मधुर वर्णरचना, वर्णन करण्याची शैली, निरनिराळ्या रसांचा आविर्भाव, वगैरे त्याच्या गुणांचा यांत कळस झाला आहे. ज्या वंशाचें गुणवर्णन करतां करतां **वाल्मिका**दि कविश्रेष्ठांचीही वाणी शिणली, व तीमुळें ज्या वंशाच्या कीर्तीस अमरत्व आलें, त्यावरच धाड घालून आपण

लहान तरी मोठा घाम घेत आहो असा शालीनतस्तव मोठाच संकोच वाटून हे कविराज म्हणतात;

मंदः कवियशःप्रार्थी गमिष्याम्युपहास्यताम्।
प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहुरिव वामनः ॥

" ज्याप्रमाणे एकाद्या वृक्षाचें फळ उंच मनुष्याच्या मात्र हाता येण्यासारखें असून खुज्यानें त्याचा लोभ धरून उगीच हात वर करावे, त्याप्रमाणेंच मंदमति असून मी कवियशःप्राप्तीची व्यर्थ हांव धरीत आहे; यास्तव सुज्ञ जन मला हांसतील ! " यावरून इतकें तरी निदान दिसतें कीं, हातीं घेतलेला विषय सामान्य नव्हे अशी पूर्ण खात्री होऊन कवीनें त्यावर आपलें बुद्धिसर्वस्व खर्चिलें असावें. आणि वस्तुतः पाहतां तसेंच आढळून येतें. जसा एकाद्या मोठ्या नदीचा प्रवाह जेथें जेथें पाहावा तेथें तेथें नेत्रांस रम्यच भासतो तद्वत् या काव्याचा प्रत्येक सर्ग तर काय, पण प्रत्येक श्लोकही कवीचे अपूर्व गुण प्रकट करितो. तथापि रसानुभवात् जेथें अंतःकरण केवळ तल्लीन होऊन जातें अशीं जीं अत्युत्कृष्ट स्थलें या काव्यांत आहेत तीं सांगतो. सिंह व दिलीप, इंद्र व रघु, प्रियंवद व अज यांचा प्रसंग; इंदुमतीचा स्वयंवर ( किंवा सहावा सर्ग ); वैदर्भराजाच्या राजधानींत अजराजपुत्राचा वरप्रवेश व विवाह, इतर राजांशीं झालेला युद्धप्रसंग व तदनंतर भय पावलेल्या इंदुमतीशीं वीररसयुक्त डौलाचें भाषण; पारिजातमालेचा वृत्तांत व इंदुमत्यर्थ अजाचा शोक; वसंतोत्सवाचें व दशरथाच्या मृगयेचें वर्णन; रामाचा व भार्गवाचा प्रसंग; पुष्पक विमानांत बसल्यावर रामानें सीतेस उद्देशून केलेलें समुद्राचें व पूर्ववृत्तस्मारक अनेक स्थलांचें वर्णन; सीतेचें वनविसर्जन व वाल्मीकि मुनीनें केलेलें तिचें सांत्वन; स्त्रीरूपानें आलेल्या अयोध्येचें व कुशाचें भाषण; ग्रीष्माचें व जलविहाराचें वर्णन; आणि शेवटच्या सर्गांतील अग्निवर्णाचें शृंगारवर्णन. ह्यांतून एकाद्याचाही रसास्वाद घेतांच सहृदय वाचकांस कालिदासाच्या कवितेचें मनोहरत्व सहज कळून येईल, व तिचा त्यांस ध्यास लागेल यांत अगदीं संशय नाहीं.

'मेघदूत' हें काव्य बहुतेकांस ऐकून तरी माहीत असेलच. पुष्कळांनी तर मूळच्या संस्कृतांतून किंवा कांहीं वर्षांमागे त्याचें जें मराठींत भाषांतर झाले आहे त्यांतून याची गोडी पाहिलीच असेल. यास संस्कृतात 'खंडकाव्य' म्हणतात, कारण हें फार लहान आहे. तरी कवित्वाच्या कांहीं अपूर्व गुणांनीं हे इतकें रमणीय झालें आहे की, महाकाव्येंही यापुढे फिक्कीं पडतात! फार तर काय, पण कालिदासाचे बाकीचे सर्व ग्रंथ बुडून हेंच लहानसे काव्य जरी मागें उरतें, तरीही कविवृंदांत तो अग्रस्थानींच गणिला जाता यांत तिळमात्रही संदेह नाहीं. काव्याचे विषय पाहिले तर प्रायः संसारांतील अनेकविध प्रसंग, सामान्यतः दृष्टीस पडणारे सृष्टींतील चमत्कार, वगैरेच असतात; व त्यांचें हुबेहुब वर्णन करणें हे जरी लहानसान कविताशक्तीचें काम नव्हे, तरी असे कवि एकंदरीनें पाहतां पुष्कळ होतात; कारण अनुभविलेल्या गोष्टींचें वर्णन करणें तादृश कठीण नाहीं. पण जेथें केवळ मनाचाच रिघाव होतो, अशी जी इंद्रियातीत अद्भुत काल्पनिक सृष्टि तींत यथेच्छ विहार करणें हा अधिकार 'मिडसमर नैट्स् ड्रीम'[1], 'प्याराडैज लास्ट्', 'मेघदूत', हीं रचणाऱ्या वाग्देवतेच्या लालांचाच मात्र! तेथे इतरांची मति नाहीं. कालिदासाच्या जीविताचा व कवित्वाचा अद्वैतभाव किती पूर्ण होता हें या काव्यावरून स्पष्ट दिसून येतें; का कीं, संविधानकाचें म्हणण्यासारखें मुळींच साहित्य नसून कल्पनाशक्तीच्या उदात्त व उज्वल अशा विलासांनींच केवळ हें काम भरलेलें आहे. बरें संविधानक जें योजिलें आहे तें तरी किती साधें व चमत्कारिक आहे! त्यास संस्कृतांत तर काय पण जगांतील इतर भाषांतही जोड सांपडणें बहुधा कठीणच वाटतें. प्राचीन आर्यलोकांच्या काळापासून जो 'गिरिराज' या नांवाने गाजतो आहे,—

---

१ 'मिड् समर् नैट्स् ड्रीम्' (ऐन उन्हाळ्याच्या रात्रीचें स्वप्न) हें शेक्सपीयरच्या नाटकांपैकीं एक सर्वप्रसिद्ध नाटक आहे. याचा विषय 'मेघदूता' सारखा केवळ कल्पनामय आहे. 'टेंपेस्ट' नाटकांत जशी भूतचेष्टा आहे त्याप्रमाणें हें पिशाचक्रीडेनें भरलें आहे. 'प्याराडैज् लॉस्ट्' हें मिल्टनचें महाकाव्य प्रसिद्धच आहे.

व हल्लींच्या शोधांवरून तर त्याचें हे नांव नुसत्या हिंदुस्थानाच्याच नव्हे, तर सगळ्या पृथ्वीच्याही संबंधें यथार्थ झालें आहे—आणि ज्याचीं हिमाच्छादित शिखरें मेघमंडळासही भेदून गेल्यामुळें व गंगायमुनादिक पवित्र महानद्यांचीं उगमस्थानें असल्यामुळें, ज्यास **ग्रीस** देशांतील **आलिंपस्** पर्वताप्रमाणे येथील लोक देवताधिष्ठित मानीत, त्या हिमालयावरील अलकापुरींतील एका यक्षास कुबेराचा शाप होऊन त्यास अत्यंत दुःसह असा प्रियस्त्रीविरह घडला. कोठें हिमालय व कोठें रामगिरि ! पण निरुपायास्तव तेथेंही त्याने विरहाचे कित्येक महिने मोठ्या दुःखानें कंठले. पुढें वर्षाकाळ येऊन ठेपला. तेव्हां दीर्घ विरहानें जी अगोदरच कृश होऊन गेली असेल तिला येणाऱ्या वर्षाऋतूच्या मजेच्या दिवसांत तर आपण नसल्याने फारच अवघड वाटेल, अशी त्यास मोठी चिंता लागून असा उपाय सुचला कीं, आपली क्षेमवार्ता तिला सांगून तिला आश्वासन देईल असा तिजकडे दूत पाठवावा. पण असा दूत त्या यक्षास तेथें कोण सांपडला ? कोणी मनुष्य, किंवा इतर कोणी सजीव प्राणी नव्हे; तर जगाचा संताप हरून त्यास समृद्धि देण्यानें व आपल्या मनोहर नील वर्णानें जो सर्वांच्या व विशेषतः उत्कंठितांच्या हृदयास आल्हाद देतो, त्या मेघासच त्यानें दूत करून त्याशीं बोलण्यास आरंभ केला. हा केवळ अचेतन होय, याकडून आपलें कार्य कसें घडेल, ही कल्पनाही त्याच्या मनांत आली नाहीं; कां कीं, स्त्रीप्रेमानें अगदीं वेडा होऊन गेला होता. मग तेथून म्हणजे रामगिरीपासून तों थेट अलकापुरीपर्यंत त्यानें मेघास मार्ग सांगितला; व मध्यें लागणारीं जीं अनेक नगरें, नद्या, पर्वत त्यांचेंही वर्णन केलें. येथवर या काव्याचा पहिला भाग झाला; यास ‘ पूर्व मेघ ’ म्हणात. ‘ उत्तर मेघां ’ त अकलेचें वर्णन करून मग यक्षानें आपल्या मंदिराचें व स्त्रीचें वर्णन केलें आहे, व शेवटीं तीस सांगावयाचा निरोप सांगितला आहे.

येवढेंच काय तें या काव्याचें संविधानक. तरी अत्युत्कृष्ट कवीस आपली अप्रतिम कवित्वशक्ति प्रकट करण्यास याचें अनुकूलत्व किती अत्यंत आहे, हें मार्मिक वाचणारांच्या सहज लक्षांत येईल. ज्याप्र-

माणे गरुडपक्षी हा उंच उंच वृक्ष व पर्वत यांसही तुच्छ करून आपल्या विस्तीर्ण व वेगवान् अशा पंखांच्या बळावर आकाशांत उंच अस्मान चढतो, त्याप्रमाणे ज्या उद्दाम व उदात्त स्फूर्तीची ' कुमारसंभव ', ' रघुवंश ', इत्यादि ग्रंथांत विषयानुरोधास्तव मध्यें मध्यें मात्र झकाकी मारत असे, तिचाच पूर्ण विकास व्हावा या हेतूनें तदनुरूप हें लहा-नसें संविधानक कवीनें योजिलें असावें असें वाटतें. मेघमंडळापासून जे सृष्टीचे चमत्कार दिसावे त्यांचें आणि पुराणप्रसिद्ध व जगत्प्रसिद्ध असे, पर्वत, नद्या, व इतर स्थळें यांचें वर्णन यांत फार सुरस केलें आहे. तसेंच राम, सीता, अर्जुन, बलराम इत्यादिकांच्या उज्ज्वल चरित्रांनीं जीं जीं स्थानें विख्यात होऊन गेलीं आहेत त्या त्या संबंधें त्यांचें वर्णन केल्यानें आणि उज्जयिनी, हिमालय येथें शिवसेवेस्तव व अन्य प्रसंगीं कामरूप मेघास जीं विचित्र रूपें घ्यावयास सांगितलीं आहेत त्यामुळें या काव्यास फारच शोभा आली आहे. ' उत्तर मेघां ' तही अलकानगरीचें वर्णन सुंदर असून यक्षाच्या स्त्रीची विरहावस्था व शेवटचा निरोप हीं करुणरसभरित वर्णिलीं आहेत. वृत्ताचीही योजना मोठ्या बहारीची आहे; व तीमुळें ही कविता फारच खुलते आहे. त्यामुळें हंस आलेली व अर्थगौरवास्तव जणु काय विशेष झालेली जी मंद गति, तसेंच पदलालित्य, रूपाविशदत्व इत्यादि जे तिचे दुसरे गुण, त्यांहींकरून वाचकांस कवीच्या नायिकांचाच साक्षात् भास होतो; आणि कल्पनेच्या आनंदमय सृष्टींत मन अगदीं दंग होऊन जाऊन या जगाचें भानही त्यांस कांहीं वेळ नाहींसे होतें !

**कालिदास** कवींच्या मालिकेंत जसा अग्रगण्य झाला आहे तसाच नाटककारांतही त्यास मान देतात; किंबहुना, या दुसऱ्या संबंधेंच त्याची हल्लीं विशेष ख्याति झाली आहे असें म्हटलें पाहिजे. त्याच्या 'मालविकाग्निमित्र' नाटकाविषयीं पंडितांत जें बहुमत आहे तें मागें सांगितलेंच आहे; राहिलीं दोन 'शाकुंतल' व 'विक्रमोर्वशी' हीं होत. या दोहों नाटकांची, व त्यांतूनही पहिल्याची, या देशांत पूर्वीपासूनही किती प्रतिष्ठा आहे हें सांगणे नको. प्रत्येक पंडिताच्या तोंडीं त्यांतील पद्यें आणि " काव्येषु नाटकं रम्यं तत्र रम्यं शकुंतला

तत्रापि च चतुर्थोंकस्तत्र श्लोकचतुष्टयम् ॥' हा श्लोक हीं आहेतच. सांगावयाची विशेष गोष्ट ही कीं, आपल्या कवीची अजरामर कीर्ति प्रथम देशांतरास जाऊन नंतर सर्व भूमंडळावर पसरण्यास हेंच 'शाकुंतल' नाटक कारणीभूत झालें. तें असें कीं, **सर विल्यम् जोन्स्** नांवाचा एक विद्वान् न्यायाधीश सुमारे शंभर वर्षांपूर्वी बंगाल्यांत असता त्यास एका पंडिताकडून समजले कीं, संस्कृत भाषेंत नाटकें रचिलेलीं आहेत. हे समजतांच त्यानें त्या भाषेचा अभ्यास फार परिश्रम करून केला, आणि या नाटकाचें इंग्रजी भाषेत भाषांतर करून ते युरोपांत प्रसिद्ध केलें. तें पाहून युरोपांतील कित्येक पंडितांचें मन इतकें वेधून गेले कीं, त्यांनींही **कालिदासा**ची तत्क्षणीं महाकवींत गणना केली. **जर्मनी** देशांतील कविमणि **गेटी** प्रख्यात तत्त्ववेत्ता व मुशाफर **हंबोल्ड्**, आणि महापंडित **श्लेजेल्** यांनीं आपल्या कवीच्या अनुपम कृतीचा केवळ भाषांतर रूपानें रसास्वाद घेऊन आनंदभरांत माना डोलविल्या. या रसिकवरांनीं 'शाकुंतल' नाटकावर अंतःकरणाच्या उल्लासभरांत जे अभिप्राय दिले आहेत ते सर्वांनीं, व विशेषतः हिंदूंनीं तर, आपापल्या हृत्पट्टिकेवर खोदून ठेवण्यासारखे आहेत. ते येथें उतरून घेतले असते, पण तसें करणें प्रशस्त दिसत नाहीं. कां की, ते सर्वत्र प्रसिद्धच असल्यामुळें त्यांचा उल्लेख केवळ पुनरुक्त होयें. असो.

---

१ तरी ते आमच्या सर्व वाचकांस माहीत नसतील यास्तव येथें उतरून घेतों:—

"Wouldst thou the young year's blossoms and the fruits of its decline, And all by which the soul is charmed, enraptured, feasted, fed ?

Would thou the earth and heaven itself in one sole name combine ? I name thee, O Sakoontala ! and all at once is said." —*Goethe.*

"Kâlidâsa the celebrated author of the 'Sakoontalâ, is a masterly describer of the influence which Nature

[ पुढें चालू. ]

'शाकुंतल' नाटक हे महाभारतांतील आदिपर्वांतल्या एका कथेचा आधार घेऊन रचिले आहे. तेथील मूळची गोष्ट अशी आहे कीं, दुष्यंत राजा मृगयेला गेला असतां थकून कण्वऋषीच्या आश्रमास गेला. तेथें दुसरें कोणीही नव्हतें, कण्वाची कन्या शकुंतला मात्र होती. तिनें राजास स्वागत करून त्याचें आदरातिथ्य केलें. राजा तिच्या रूपास भुलला, व त्यानें विचारिल्यावरून तिनें आपलें जन्मवृत्त त्यास सांगितलें. त्यावरून ही क्षत्रियकन्या आहे असें जाणून दुष्यंतानें तीस गांधर्वविवाहानें वरिलें. पुढे दुष्यंत आपल्या नगरास आला. पण मुनि-शापभीतीस्तव शकुंतलेस आणावयास त्यानें पाठविलें नाहीं. इकडे कण्वानें कन्येवर कोप न करितां तिचें अभिनंदनच केलें, व आपले शिष्य बरो-बर देऊन तीस नगरास पोंचविलें. दुष्यंताचें शकुंतलेवरील प्रेम उतरलें नसतांही लोकापवादभयामुळे तिचा अंगीकार त्यास करितां येईना. यास्तव तूं कोण, हा मुलगा कोणाचा हें भलतेंच काय म्हणतेस, असें बळेंच ढोंग करून त्यानें तिची निर्भर्त्सना माडिली. शकुंतलेनेंही राजास पुष्कळ रागाचीं उत्तरें केलीं, व त्या आवेशांत निघून जाणार इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, हे दुष्यंता! ही तुझीच स्त्री आहे. मग दुष्यं-तानें तीस पट्टराणी करून तिचा पुत्र भरत यास कांहीं काळानें यौव-राज्य दिलें.

---

exercises upon the minds of lovers. Tenderness in the expression of feeling, and richness of creative fancy, have assigned to him his lofty place among the poets of all nationas.—*Alexander von Humboldt.*

"No composition of Kálidása displays more the richness of his poetical genius, the exuberance of his imagintion, the warmth and play of his fancy, his profound knowledge of the human heart, his delicate appreciation of its most refined and tender emotions, his familiarity with the workings and counter-working of its conflicting feelings,—in short, more entitles him to rank as the Shakspere of India."—*M. Williams.*

हें कथानक वाचून कित्येक अनभिज्ञांस कदाचित् वाटेल कीं, यावर उत्कृष्ट नाटक रचना यावें असें यांत काय आहे ? पण वस्तुतः पाहिलें तर **कालिदासा**च्या सर्व बुद्धिगुणांचा एकत्र विकास होण्यास याहूनही अनुकूल असा विषय सापडणें कठीण. महाभारतरूप अक्षय खाणींतून आपल्या चतुर कारागिरानें हें रत्न निवडून काढून त्यावर आपली अपूर्व करामत सर्व खर्चिली, आणि त्यास अशा दिव्य कोंदणांत बसविलें कीं, त्यावरून बाकीचीं सर्व ओवाळून टाकावीं. हा प्रकार कोठें कोठें व कसकसा केला आहे तो सांगतों. मूळच्या गोष्टींत असें होतें कीं, शकुंतला आश्रमांत एकटी असून तिनेंच आपल्या जन्माचा वृत्तांत सांगितला व दोघांचा गांधर्वविवाहही प्रत्यक्षच झाला. ह्या दोन्ही गोष्टी काव्यांत फारशा विसंगत दिसत नाहींत. पण जेथें मनाचे स्वाभाविक व्यापार रेखल्याप्रमाणें दाखवावयाचे असतात अशा नाटकांत तर त्या अगदीं अयोग्य; त्यांतूनही नायिकेच्या सहज शालीनतेस तर यासारखें विरुद्ध कोणतेंच नाहीं. यास्तव **कालिदासा**नें शकुंतलेच्या दोन सख्या कल्पून त्यांपैकीं एकीकडून तो वृत्तांत वदविला आहे, व पुढील गांधर्व विवाहाची गोष्टही तशीच त्यांच्या द्वारें ओघाओघानें आणिली आहे. तशीच आरंभीं शकुंतलेची व राजाची दृष्टादृष्ट वृक्षवनांत करून वनवासी कुमारिकांस उचित व कवीजनमनास अत्यंत प्रिय अशा वृक्षसेचनादि व्यापारांत गुंतलेली तीस दाखविली आहे. दुष्यंत राजावर कपटीपणाचा दोष न यावा म्हणून दुर्वास ऋषीचा शाप व शकुंतलेस दिलेल्या आंगठीचें शक्रतीर्थांत पडणें या दोन नव्या गोष्टी कल्पिल्या आहेत. पांचव्या अंकाच्या शेवटींच मूळचीच गोष्ट संपली आहे; पण शकुंतलेस राजानें न ओळखून ती दुःख करीत निघून गेल्यावर तिची आई जी मेनका तिनें एकाएकीं तीस उचलून नेलें असें नवें घालून नाटकांतील शेवटचे दोन अंक अगदी नवेच कवीनें कल्पिले आहेत. सहाव्याच्या आरंभीं एका कोळ्यापाशीं ती आंगठी सांपडून राजास शकुंतलेविषयींची शापहत स्मृति पुनः आली आहे, व मेनकेची सखी सानुमती अप्सरा गुप्तरूपें जवळ उभी असतां शकुंतलेच्या पूर्वीचा सर्व वृत्तांत स्मरून राजा विरहदुःखानें व निराशेनें वेडा होऊन गेला आहे.

पुढें इंद्राचा सारथि मातलि येऊन दैत्यवधार्थ त्यास स्वर्गास घेऊन गेला आहे. सातव्या अंकांत मातलि दुष्यंतास भूलोकास परत आणीत असतां हेमकूटीं मारीचाचें दर्शन घेण्याची राजाची इच्छा पाहून त्यानें तेथेंच रथ उतरविला. मग तेथें शकुंतला व पुत्र भरत यांची व त्याची अकल्पित भेट झाली; आणि शेवटीं मारीच व अदिति यांचें दर्शन व आशीर्वाद घेऊन दुष्यंत राजा तेथून परत आपल्या नगरास निघाला आहे. मारीच व अदिति हीं दोघं नाटकाच्या शेवटीं कां आणिलीं याचें कारण उघडच आहे. संस्कृत नाटकांच्या संप्रदायाप्रमाणें नायक दुष्यंत व नायिका शकुंतला हीं मागील सर्व संकटांतून पार पडून त्यांचे सर्व मनोरथ सफळ झाले असतां अशींच निरंतर सुखांत असा, असा आशीर्वाद त्यांस यांजकडून देवविला आहे; व आणखी तुला कोणता वर पाहिजे असें त्यांनीं विचारिल्यावरून दुष्यंतानें भरतवाक्यरूपानें सर्व श्रोत्यांस उद्देशून आशीर्वचन केलें आहे, व तें कवीच्या उपास्य म्हणजे देवास शिवास प्रार्थनापर आहे.

ही कृति रसिकजनपरंपरेस पुढें चिरकाळ शिरोवंद्य होणार व इतर सर्व काव्यांपेक्षां हीवरूनच आपलें कवित्वयश दिगंतरीं फांकणार हें जणों काय अगोदरच समजून आपल्या कवीनें या नाटकांत आपल्या बुद्धिवैभवाची पराकाष्ठा दाखविली आहे. जें जें नाटकांत पहावें तें तें स्वतः परिपूर्ण असून बाकीच्या सर्वांशीं त्याचा उत्कृष्ट मेळ दृष्टीस पडतो. प्रथम संविधानक पहा. तें इतक्या चातुर्यानें रचिलें आहे कीं, त्यांत यत्किंचितही भाग उणा किंवा अधिक सांपडावयाचा नाहीं. मूळच्या गोष्टींत कसे फेरफार केले आहेत व जास्ती काय काय घातलें आहे तें मागें सांगितलेंच आहे; पण त्याहून बारीक असे कित्येक खुबीदार प्रसंग कवीनें त्या त्या रसास पुष्टि आणण्याकरितां घातले आहेत, तेही येथें सांगतों. पहिल्या अंकांत भ्रमराचें शकुंतलेच्या मुखास कमलभ्रांतीनें झटणें, चवथ्यांत मृगपोतकाचें तिच्या पायांत अडखळणें, पांचव्याच्या आरंभींची राजास उत्कंठित करणारी व अन्योक्तिगर्भित अशी आकाशांतील गाण्याची लकेर, तसाच सहाव्यांत शकुंतलेची तसबीर पाहून तिच्या क्षणभर साक्षाद्दर्शनाचा घडलेला लाभ, आणि धनमित्र

सावकाराचा मरणवृत्तांत ऐकून अनपत्यतेस्तव अतिशयित विषाद वाटून राजास मूर्छा येणें; यांतील प्रत्येकाच्या योगानें एकंदर संविधानक किती मजेनें जुळत गेलें आहे, व तेथला तेथला रस किती सुंदर खुलतो आहे हे सांगणें नलगे. शकुनांचाही याचप्रमाणें कवीनें उपयोग करून घेतला आहे. प्राचीन काळीं लोकांचा त्यांवर पूर्ण विश्वास असल्यामुळें कवीस व विशेषतः नाटककारांस संविधानक जुळतांना त्यांचा अनेकवार मोठा उपयोग झाला आहे. हाही उपयोग दोन प्रकारांनीं होतो. एक पुढील कथेचा संदर्भ अगोदर प्रेक्षकांस किंवा वाचकांस सुचविण्यानें जसा प्रस्तुत नाटकांत पहिल्या व शेवटल्या अंकाच्या आरंभीं राजाच्या बाहुस्फुरणानें सुचविला आहे. दुसरा एखाद्या झालेल्या किंवा पुढें होणाऱ्या भयंकर गोष्टीची सूचना करून मनास धक्का बसविण्यानें. हा दुसरा प्रकार या नाटकाच्या चवथ्या अंकांत आहे. शकुंतला दुष्यंताच्या नगरास येण्यास निघाली असतां वाटेनें तीस एक चक्रवाकी दृष्टीस पडली, ती कमलपत्रांच्याच आड तिचा नवरा असतां तो दूर गेला या भ्रांतीनें आक्रोश करीत होती. ही गोष्ट केवळ क्षुल्लक असतांही शकुंतला व तिच्या सख्या मनांत चरकल्या व तीच अवस्था प्रेक्षकांची व वाचकांचीही होते. असो; ही जुळण्याची शैली शेवटल्या तीन अंकांत तर फारच चमत्कारिक आहे; ती अंमळ लक्षपूर्वक नाटक वाचलें असतां सहज लक्षांत येण्याजोगी आहे. वर्णनाचा प्रसंग नाटकांत फारसा येत नाहीं; तरी तो यांत ज्या थोड्या ठिकाणीं आला आहे तेथें त्यांतही आपल्या कवीनें अगदीं कमाल करून सोडली आहे. पहिल्या अंकांत हरिणाचें व रथवेगाचें जसें वर्णन आहे तसें एकंदर जगांतील कवींच्याही ग्रंथांत थोडेंच सांपडेल असें म्हणण्यास काडीमात्रही धास्ती वाटत नाहीं. पुत्राची बाललीला पाहून बापास आनंदोद्गार कसे येतात हें सातव्या अंकांतील ज्या श्लोकांत वर्णिलें आहे तो श्लोक वाचतांच शेझी नामक फ्रेंच पंडित आनंदाच्या भरांत भान विसरून गेला ही गोष्ट सर्वत्र प्रसिद्ध आहेच. तसेंच सातव्या अंकांत शकुंतलेची अर्धीच झालेली तसबीर कोणत्या प्रकारांनीं पुरती करावी व भोंवतालचा देखावा कशा तऱ्हेचा असावा अशा विषयीचे जे श्लोक आहेत त्यांतील

वर्णन इतके चमत्कारिक आहे कीं, त्यांवरून कांहीं नाहीं म्हटलें तरी चित्रकलेचे मार्मिकज्ञान तरी कवीस खास असावे असे वाटते. असो; या नाटकाची लिहिण्याची धाटणी पाहिली तर तीही जितकी उत्कृष्ट करवेल तितकी त्याने केली आहे हे स्पष्ट दिसत आहे. पद्याविषयीं तर बोलायासच नको, पण गद्यांतील प्रत्येक शब्दही जितका कर्णमधुर व खुबीर सांपडेल तितका आणला आहे. प्रसाद हा गुण **कालिदासाच्या** सर्व काव्यास साधारण आहे खरा, पण तोही येथे कांहीं विशेषच आहेसा भासतो. सारांश, 'साकूतमधुरकोमलविलासिनीकंठकूजितप्राया' हें जे **गोवर्धनाचार्यांनीं कालिदासोक्तीस** वर विशेषण दिलें आहे त्याचा पूर्ण प्रत्यय या नाटकात येतो. यात रस किती उत्कृष्ट साधले आहेत हे फार विस्तारानें सांगण्याची गरज मुळीं कवीनेंच ठेवली नाहीं. ज्यास सहृदयत्व म्हणून लवमात्रही आहे त्यांस त्याचा साक्षात अनुभव घडून ते ते प्रसंग जसे काय प्रत्यक्ष डोळ्यांपुढे उभे राहतात, आणि चित्तवृत्ति जणों काय मंत्रानें भारून जाऊन इतकी तन्मय होते कीं, बाह्यसृष्टीचें भानच नाहींसें होऊन नाटकातील त्या त्या पात्रांशीं वाचक किंवा प्रेक्षक तादात्म्य पावतात. उदाहरणार्थ हे नाटक वाचतांना चवथ्या अंकाच्या पत्रांवर ज्याची टिप पडली नाहींत असा कोण आहे ? सारांश, या नाटकाचे कोणतेंही अंग घ्या, जेथें तेथें कवीनें आपल्या करामतीची शर्थ केलेली नजरेस येते. ज्याप्रमाणे 'मृच्छकटिकां'त दरिद्री **चारुदत्ताचा** मित्र **विदूषक** हा **वसंतसेनेच्या** वाड्याचे चौक पाहून चकित होऊन गेला, व जो जो नवा पाही तो तोच त्यास अति रम्य वाटे, त्याचप्रमाणे वाचकास येथे होऊन जाते. जो जो अंक काढावा त्यात नवी नवीच बहार दृष्टीस पडते, आणि प्रत्येकाची निरनिराळी रचना अधिक उत्कृष्ट म्हणावी, कीं सर्वांचा एकंदर मेळ विशेष खुलतो म्हणावें, याचा त्यास निश्चय होत नाहीं !

'विक्रमोर्वशी' नाटक हें मागील नाटकाच्या खालोखाल प्रसिद्ध आहे. याचेंही भाषांतर इंग्लिश भाषेत **विल्सन्** नामक साहेबानें करून प्रसिद्ध केलें आहे. हा साहेब कलकत्त्यास कित्येक वर्षे पर्यंत संस्कृत भाषेचा मुख्याध्यापक होता, व त्या विद्येचा त्यास मोठा अभि-

मान असून ती त्यानें पुष्कळच उदयास आणली. या नाटकाच्या प्रस्तावनेंत तो म्हणतो की, याची कथा अग्निपुराणांतून घेतली असून सर्व अन्योक्तिपर आहे. ती अशी की, नायक व नायिका हीं सूर्य व उषा म्हणजे प्रभात देवता याच्या बद्दल आहेत. सूर्य व उषा हीं आरंभीं एकत्र असून लागलींच वियुक्त होतात, व बिरहो जो सूर्य त्यानें पर्वत, नद्या इत्यादिकांवर सर्व दिवसभर भ्रमण केल्यावर दिनांतीं त्यांची पुनः भेट होते. हा प्रकार नाटकात कसा आणला आहे हें पाहण्यास त्याचे संविधानक समजलें पाहिजे, यास्तव ते सांगतो.

यांतील नायक राजा पुरूरवा व नायिका अप्सरा उर्वशी. ही कुबेराच्या मंदिराहून परत येत असता केशिनामक दैत्यानें तीस हरण करून नेले. तेव्हा तिच्या सख्या मोठ्याने आक्रोश करूं लागल्या. तो आक्रोश ऐकून पुरूरवा रथारूढ होऊन त्यानी सांगितलल्या दिशेकडे त्वरेने गेला, व राक्षसास जिंकून उर्वशी व तिची सखी चित्रलेखा यास घेऊन आला मग त्या दोघीस दुसऱ्या अप्सराच्या स्वाधीन तो करतो आहे इतक्यांत तेथे चित्ररथ गंधर्व येऊन त्यानें राजास सांगितलें की, आपला पराक्रम ऐकून संतुष्ट होत्साता देवेंद्र आपणांस उर्वशीसहवर्तमान बोलावीत आहे. राजा सध्या कांहीं अगत्याचे काम आहे असे म्हणून गेला नाहीं; मग उर्वशी व इतर अप्सरा निघून गेल्या. पुढें राजा मदनविव्हल होऊन विदूषकासह बागेत बसला असता व उर्वशी कशी प्राप्त होईल याची चिंता करीत असतां ती व सखी चित्रलेखा गुप्तरूपानें तेथें आल्या. मग उर्वशीनें एका भूर्जपत्रावर मदनलेख लिहून राजाकडे टाकला, आणि नंतर प्रगट होऊन राजास जयजयकार करते आहे तोंच देवदूताची वाणी झाली,—" चित्रलेखे, उर्वशीस घेऊन सत्वर चल, इंद्रसभेपुढें नाट्यप्रयोग करावयाचा आहे. " तेव्हा मोठ्या दुःखानें उर्वशी निघून गेली. इतक्यात तें भूर्जपत्र वाऱ्यानें उडून जाऊन राणीच्या हातीं लागलें, व राजा तें हरवलें म्हणून हळहळत असतां तिनें ते त्याच्या हातीं आणून दिलें. राजा फार खजील झाला, व राणी संतापानें निघून गेली. पुढें राणीलाच त्याबद्दल पश्चात्ताप होऊन तिने चंद्रसाक्षिक प्रियप्रसादन व्रत केलें,

व इतःपर मजकडून आपणास उपरोध होणार नाहीं म्हणून राजास सांगितलें. परंतु उर्वशीच्या समागमाचें हें सुख राजास चिरकाळ लाधलें नाही. एके प्रसंगीं उर्वशी गंधमादन वनांतून जात असतां कुमारवनांत चुकून गेली व जातांच तेथल्या तेथें लता झाली.[1] मग राजाची अवस्था काय सांगावी ! तो अगदीं वेडा होऊन जो जो प्राणी भेटले त्यास आपल्या प्रियेची वार्ता पुसूं लागला. याप्रमाणें फिरतां फिरतां तो त्या लतेपाशीं आला, व तीस आलिंगतांच ती पुनः उर्वशी झाली. ही उर्वशीची भेट तरी त्यास संगमनीयमणी सांपडल्यानें झाली. हा मणी राजानें फार जतन करून ठेवला; पण एके दिवशीं एका गिधाडाने तो मांसभ्रमानें उचलून नेला. त्या पक्ष्यामागें राजाही धांवला, पण मणी हातीं लागला नाहीं. पुढें एकाएकीं तो पक्षी बाणानें छिन्नभिन्न होऊन पडला; आणि तो बाण कोणाचा हें पाहतांच राजाचा मुलगा दीर्घायु याचा असें बाणावरील नांव वाचतांच समजलें. याप्रमाणें राजाची आपल्या पुत्राशीं गांठ पडली. शेवटीं नारद येऊन त्यानें राजास कळविलें की, उर्वशीचा शाप जरी आतां संपला आहे तरी तिनें पुढेंही तुमच्या पाशींच राहावें असा इंद्रानें तुम्हांस वर दिला आहे. याप्रमाणें राजाचे सर्व मनोरथ पूर्ण झाले.

हें नाटक एकंदर सर्व नाटकांच्या मानानें पाहतां उत्तमांत धरण्यासारखें आहे खरें; तथापि ‘ शाकुंतला ’ च्या जोडीला बसविल्यास हें फिकें पडेल असें आम्हांस वाटतें. संविधानकचातुर्य वगैरे मागें सांगितलेल्या ज्या अनेक गुणांनीं दुसरें केवळ अप्रतिम होऊन राहिलें आहे ते गुण पहिल्यांत पूर्णत्वानें दृष्टीस पडत नाहींत; त्यांची कोठें कोठें मात्र झांक मारते. शिवाय **कालिदासा**च्या विशाल बुद्धीच्या मानानें पाहतां हीं दोन्हीं नाटकें जशीं परस्पर अत्यंत भिन्न असावीं, व प्रत्येकांत मनोरंजन होण्याचीं निरनिराळींच चमत्कारिक स्थळें असावीं तसें

---

१ या वनाला कुमाराचा ( कार्तिकेयाचा ) शाप होता कीं, माझ्या तपश्चरणास विघ्न करण्यास जी स्त्री येथें येईल ती लतारूप होईल. पुढें उच्छापामुळें उर्वशीला पहिलें रूप प्राप्त झालें.

प्रस्तुत नाटकावरून. पाहतां फारसें दिसत नाहीं. आरंभींचा रथारूढ राजाचा प्रवेश, शेवटीं राजाची व पुत्राची झालेली भेट इत्यादि 'शाकुंतलां'त कल्पिलेल्याच गोष्टी पुनः या नाटकांत घेतल्याने, व 'मेघदूत,' 'रघुवंश' इत्यादिकांतूनही अनेकशः उल्लेख झाला असल्यामुळे ज्यांची नूतन शोभा केव्हांच नष्ट होऊन गेली, असे कित्येक विचार येथेंही मात्क्यान् आणल्यानें, या नाटकाची रसहानि बरीच झाली आहे; व त्यामुळे वाचकांच्या मनांत तें जसें भरावें तसें भरत नाहीं. पांचां अंकांत पहिला व चवथा हेच उत्कृष्ट आहेत. चवथ्यांत स्त्रीप्रेमानें वेडावलेल्या राजाचें पशुपक्ष्यादिकांशीं भाषण व त्याहूनही प्राकृत भाषेंतील मंजुळ गाणीं, हीं फार मनोहर आहेत. पण पहिल्यांतील बहार त्याहूनही विशेषच. आपल्या कवीचे मन हिमालयाच्या भव्य व रम्य शिखरांवर किती अत्यंत प्रेमाने सदां गुंतून राहिले असे हें यावरून स्पष्ट दिसत आहे. 'शाकुंतलाच्या' शेवटल्या अंकांत ज्या हेमकूट शिखरावर दुष्यंत व शकुंतला यांचा दीर्घ विरहानंतर समागम घडवून नाटकाचा उपसंहार केला, त्यावरच या 'विक्रमोर्वशी' नाटकाचें पहिले स्थल कल्पून भयमूर्छित उर्वशीस राजानें तिच्या सखींच्या स्वाधीन केली आहे, व दोघांची दृष्टादृष्ट होऊन परस्परांचे प्रेम जडले आहे. हा पहिला प्रवेश कवीने मोठ्या चातुर्यानें कल्पून त्याची रचनाही तशीच उत्कृष्ट उतरली आहे. यांतील रस उदात्तमिश्रित शृंगार होय. उर्वशीची मूर्च्छा व ती हळूहळू जाऊन उर्वशी डोळे उघडूं लागली असतां राजास झालेला आनंद व विस्मय इत्यादि यांतील गोष्टी अशा हुबेहुब दाखविल्या आहेत कीं, त्या वाचकांच्या मनावर ठसठशीत रेखल्या जाऊन पुढें कधींही बुजत नाहींत. याप्रमाणें हा पहिला अंक वाचून वाचकांस मोठी उमेद येते व पुढेंही याचप्रमाणे सर्व असेल असे वाटतें; पण ही आशा सर्वथैव सफल न होतां ज्या गोष्टी सामान्य नाटकांतूनही असतात, किंबहुना ज्या वाचकांच्याही सरासरी मनांत येतात, त्याच पुढें आढळतात.

येथवर **कालिदासा**च्या मोठमोठ्या ग्रंथांचें वर्णन झालें. पण यांहून लहान असे दुसरेही कांहीं आहेत; ते वरच्याप्रमाणेंच प्रसिद्ध असल्या-

मुळें त्यांस वगळणें नीट दिसत नाही. ते 'श्रुतबोध' 'शृंगारतिलक' 'शृंगाररसाष्टक' हे होत. 'श्रुतबोधा'त सर्व वृत्तांची लक्षणें त्या त्या वृत्तांच्याच पद्यांनी सांगितलीं आहेत, व असे करण्याचा उद्देश या ग्रंथाच्या नावांतच स्पष्ट सांगितला आहे, की त्याच्या साह्याने कोणतेही वृत्त नुसतें 'ऐकताच समजावे.' वर सांगितलेल्या महाग्रंथांवरूनच अगोदर ज्यानें अक्षय कीर्ति जोडिली किंवा ती जोडणे हे आपणास कठीण नाही अशी ज्यास त्याची मनदेवता साक्ष देत होती; त्यानेंच विद्यार्थ्यांस छंदाची माहिती करून देण्याचें हलके काम पत्करावे हें सामान्य समजुतीच्या मनुष्यास मोठे विलक्षण वाटण्यासारखे आहे. परंतु थोरांचे चरित्र व महिमा याचे आकलन होणें हे कोत्या बुद्धीस केवळ दुरापास्त होय इतकेंच नव्हे; तर पुष्कळ वेळ असेही घडते कीं, खऱ्या थोरपणाचे स्वरूप आपणांस यथास्थित न समजल्यामुळे त्यांची कृत्ये परम श्लाघ्य असतांही त्यांविषयीं आपली समजूत भलतीच होते. या गोष्टीचें उत्कृष्ट उदाहरण वरीलच होय. हे सांगताना या सारखे दुसरेही एक उदाहरण येथें सांगितल्याशिवाय राहवत नाही. तेंही अशा तशा सामान्य पुरुषाचे नव्हे, तर आपल्या कवीप्रमाणेच ज्याची उज्वल कीर्ति स्वदेशास अलंकृत करून सर्व जगभर पसरली आहे अशा **मिल्टन्** कवीचे होय. याने आपल्या कवीप्रमाणेच वाग्देवीने घातलेला शिरींचा मुगुट क्षणभर उतरून ठेवून मोठ्या प्राजल व लोकहितपर बुद्धीनें स्वभाषेच्या व्याकरणावर एक ग्रंथ लिहिला. या दोन्ही उदाहरणावरून स्पष्ट दिसते कीं, अंगीं अहंकार नसणे हें खऱ्या थोरवीचें एक मोठेंच चिन्ह होय असो; हा ग्रंथ 'ऋतुसंहार'प्रमाणे कवीनें आपल्या प्रिय स्त्रीस संबोधनें करून लिहिला आहे. यांत माधुर्य, लालित्य, इत्यादि पदरचनेच्याच मात्र गुणाखेरीज इतर काव्यगुणांचा समावेश संभवतच नाही; यास्तव तेवढेच काय ते गुण या ग्रंथांत असून ते अर्थातच नेहमीप्रमाणे परिपूर्ण आहेत. 'शृंगारतिलक' व 'शृंगाररसाष्टक' यांत शृंगारयुक्त स्फुट श्लोक आहेत. हे सर्वच **कालिदासाने** स्वत: केलेले असतीलसे वाटत नाही, कारण कित्येकांत नुसत्या विचकटपणाशिवाय दुसरें कांहीं दिसत नाही. **कालिदा-**

साच्या कर्तृत्वास साजण्यासारखे यांत कांहीं श्लोक आहेत खरे, परंतु सर्वांविषयीं तसें खात्रीनें म्हणवत नाहीं. शिवाय दुसरें असें कीं, ज्या कालरूप अफाट समुद्रावर मोठमोठ्या सुसंबद्ध काव्यांचाही निभाव, अगोदर झालाच तर, मोठ्याच शर्थेनें होतो, त्यावरूनच हा तिलक' विस्कळल्याशिवाय, किंवा हें 'अष्टक' जूट न फुटता सबंधच्या सबंध या कडेपर्यंत सुखरूप येऊन पोचलें असेल, ते तरी म्हणणारानें जपूनच म्हटलें पाहिजे. यावरून पाहता असें वाटतें कीं, शृंगाररसाचे जे शेंकडो श्लोक पुष्कळांच्या तोंडून आपण ऐकतों, त्यांची यांत बरीच भेसळ झालेली असावी.

लोकांत पूर्वींपासून अशी बोलवा चालत आली आहे कीं, विवाह-समयीं जीं मंगलाष्टकें म्हणतात तींही **कालिदासा**नेंच केलीं आहेत. ही बारीक गोष्टही येथें लिहिणें हे पुष्कळांस बहुधा हास्यास्पद वाटेल यांत संशय नाहीं; व साप्रत आपल्या लोकांत गुणाची चहा कितपत आहे व त्याविषयीं जी पूज्यबुद्धि मनांत वागावी ती कितपत वागते आहे, हे थोडेंसें मनांत आणिलें असतां असें वाटेल यांत मोठेंसें आश्चर्य आहे असेंही नाहीं. एखादी वस्तु विख्यात मनुष्याच्या केवळ संबंधा-नेंच कधीं कधीं महत्त्व पावत असते; मग ती त्याच्या विशेष कीर्तीस कारणीभूत होवो कीं न होवो, किंबहुना तिचा संबंधही अगदीं संदिग्ध कां असेना! स्ट्राटफर्ड येथें **शेक्सपीयर** कवीची म्हणून जी खुर्ची ठेविली आहे ती बघण्यास चोहोंकडचे लक्षावधी लोक कशाकरिता जातात! ती विश्वकर्म्यानें तयार केली आहे काय? तसेंच त्या कवि-शिखामणीनें आपल्या हातानें लावल्याबद्दल ज्याची प्रसिद्धि होती, असें तेथेंच एक तुतीचें झाड एकानें तोडल्यावरून त्यावर त्या गांवच्या सर्व लोकांनीं जो एकच गहजब केला व त्याचें पारिपत्य केलें, याचें तरी काय कारण? त्यानें त्या गांवकऱ्यांचा येवढा घोर अपराध तो कोणता केला? अर्थात हाच कीं, **शेक्सपीयर** याचें जिवंत स्मारक असल्या-मुळें ज्यास एक प्रकारची पवित्रताच जणों काय आली होती, व जें त्यांच्या आनंदाचें व अभिमानाचें स्थान होऊन गेलें होतें, त्या झाडा-वर घाव घालून पुनः कधींही भरून यावयाची नव्हे अशी त्यांची हानि

त्यानें केली. या दोन्ही गोष्टींवरून स्पष्ट दिसून येतें कीं, महान् महान् पुरुषांच्या संबंधें क्षुल्लक गोष्टीसही मान देणें यांत हलकेपणा किंवा मूर्खपणाच सर्वथा आहे असें नाही. उलटें, विचाराअंतीं असेंही दिसून येईल कीं, ही पूज्यबुद्धि योग्य रीतीनें असल्यास मनुष्यांस किंवा राष्ट्रांस तिजसारखें उत्कर्षप्रवर्तक दुसरें कोणतें साधन नाहीं. बरें, मग असें जर आहे तर, संसारांतील अत्यंत हृद्य जो समागम तो तुम्हास निरंतर सुखावह होवो असें ज्यानें आपणांस आशीर्वाद केले, किंवा पुढें करणार, तो कोणी यःकश्चित गणमात्रा जुळणारा नव्हे, तर रघुवंशाचा पोवाडा गाऊन त्याच्या कीर्तीस ज्यानें नवेंच अमरत्व दिलें; ज्याच्या विशाल कल्पनेनें मेघारूढ होऊन सर्व आर्यावर्तभर भरारी मारिली, व मधील पर्वत, नद्या, इत्यादिकांवरून सामान्य मनुष्यांस दिसण्यासारखे नव्हेत असे चित्रविचित्र देखावे पसरून दिले; आणि हजारो वर्षां मागची अति प्राचीन लोकस्थिति, की जी कविकल्पनेसच केवळ गम्य, तिची आपल्या बुद्धीच्या मांत्रिक सामर्थ्यानें ज्यानें अशी उत्कृष्ट तजबीर उतरली कीं, कितीही काळ लोटला तरी तिचे रंग उडावयाचेच नाहींत,--त्याच देशभूषणभूत कवींद्राचा व शृंगारदीक्षागुरूचा तो वाग्विलास होय ही गोष्ट मोठ्या मजेची असून ध्यानात ठेवण्याजोगी नाही काय ?

येथवर **कालिदासा**च्या लहान मोठ्या सर्व ग्रंथांचें वर्णन झालें.[1]

---

१ वर जितके ग्रंथ सांगितले तितके **कालिदास**कृत म्हणून सर्व प्रसिद्ध आहेत. यांखेरीज इतरही बरेच त्याच्या नांवावर विकणारे आहेत. 'कविचरित्र' नामक मराठी पुस्तकांत 'प्रश्नोत्तरमाला' 'असज्जनवर्णन,' घटकर्पर काव्य,' 'हास्यार्णव नाटक,' 'कर्पूरमंजरी,' 'श्यामलादंडक', तसेंच 'भोजप्रबंध', 'भोजचंपू', 'रामायणचंपू', हे सर्व ग्रंथ प्रस्तुत कवीचे म्हणून सांगितले आहेत. याशिवाय आमच्या एका मित्राच्या पत्रावरून असे कळतें कीं, पुढील ग्रंथही कांहीं पुस्तकांतून **कालिदास**कृत म्हणून छापलेले आहेत. ते हे:–'महापद्माष्टक', 'गंगाष्टक', 'राक्षसकाव्य' व 'पुष्पबाणविलास.' तसेंच **बाण**कवीच्या 'हर्षचरिता'त 'सेतुकाव्य' म्हणून एक **कालिदासा**चा ग्रंथ सांगितला आहे; व प्रसिद्ध ज्योतिषग्रंथ 'ज्योतिर्विदाभरण' हाही प्रस्तुत कवीनेंच रचिला असें म्हणतात. असो; तर इतके ग्रंथ **कालिदा-**

[ पुढें चालू. ]

आतां त्यास चोहोंकडे जो इतका मान देतात तो कोणत्या गुणांवरून याचा विचार करूं. प्रत्येक राष्ट्रास त्याचा त्याचा अतिशय आवडता असा एकेक कवि बहुधा असतोच. प्राचीन ग्रीक लोकांचा विख्यात कवि **होमर** याचा त्यांस इतका अभिमान असे कीं, तो आमचा आमचा म्हणून सात नामांकित शहरें एकमेकांशीं भांडत असत; आणि त्या लोकांच्या आपआपसांत नेहेमीं लढाया चालत असतांही सर्व देशावर परचक्र येऊन गुदरलें असतां त्यांचा देशाभिमान जागृत करून त्यांकडून जुटीनें शत्रूस हटविण्यास त्याची वीर्योत्साहप्रेरक कविताच उपयोगीं पडली व पुढें जो विद्याकलादिकांचा अपूर्व उत्कर्ष झाला, कीं ज्यापुढें सांप्रतचाही कित्येक अंशीं कांहींच नाहीं, त्यासही तीच बहुधा कारणभूत झाली. ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. हीवरून असें समजावें कीं, महाकवि हे देशाच्या वैभवाचे खांब होत; व कविता म्हणजे केवळ कल्पनामय, तींत तथ्य काय आहे, अशी जे कोणी तिची अरसिकतेस्तव अवहेलना करतात त्यास तिच्या वास्तविक स्वरूपाची ओळख पटलीच नाहीं. असो; **शेक्सपीयर** कवीसही इंग्लिश लोक किती विलक्षण मान देतात हेंही नुकतें वर सांगितलेंच आहे. आपल्या देशांत पाहिलें तर तसा लोकवंदनार्ह झालेला कवि **कालिदासच** होय, दुसरा नाहीं. ज्यास संस्कृताचा गंधही नाहीं, व त्याचा एकही श्लोक ज्यांनीं कधीं ऐकला देखील नाहीं, असे लोक सुद्धां त्याज विषयींच्या गोष्टी मोठ्या प्रेमानें ऐकतात व सांगतात, व अशा प्रका

---

साच्या नांवानें चालत असल्यामुळे प्रस्तुत निबंधांत त्यांविषयीं कांहीं तरी मजकूर असावा हे ग्रंथपूर्णत्वाच्या दृष्टीनें इष्ट दिसतें. तथापि ज्या अर्थी इतक्या ग्रंथांपैकीं एका 'सेतुकाव्या' खेरीज दुसऱ्या कोणत्याही काव्याच्या कर्तृत्वाविषयीं प्रमाणभूत म्हणण्यासारखा लेख मुळींच नाहीं —'त्यांतून 'भोजप्रबंध', 'घटकर्पर' हीं तर धडधडीत दुसऱ्या कवींच्या नांवावर प्रसिद्धही आहेत; शिवाय वरच्यांपैकीं कित्येक उपलब्धही नाहींत, त्या अर्थी त्यांच्या संबंधानें वर कांहीं लिहिलें नाहीं. प्रस्तुत विवेचन हें अगदीं पहिलेंच आहे, व तें अगोदरच इतका विस्तार पावलें आहे, यास्तव इकडून पाहतांही वरील अधिक विवरण वाचकांस इष्ट झालें असतें असें वाटत नाहीं.

च्या बहुतेक दंतकथा किती अप्रयोजक असतात या गोष्टीचाच विचार केला तर **कालिदासा**च्या केवळ नांवाशीं आपलें प्रेम किती गोवून गेलें आहे व एकंदर लोकांस त्याविषयीं केवढा अभिमान वाटत आहे हें स्पष्ट दिसून येईल. पंडितांत तर त्याची केवढी प्रतिष्ठा आहे हे सांगण्यासच नको. कोणी कवीनें म्हटलें आहे,

**पुरा कवीनां गणनाप्रसंगे कनिष्ठिकाऽधिष्ठितकालिदासः।**
**अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव ॥**

' पूर्वी एके वेळीं असें झालें कीं, कोणी पंडित आजपर्यंत किती कवि झाले म्हणून मोजूं लागला, तेव्हां पहिल्यानें **कालिदासा**च्या नावानें त्यानें करंगळी घातली, परंतु पुढें पाहूं लागला तों दुसरें बोट घालण्यास त्यास तसा दुसरा कवि सापडेचना. तेव्हां त्या बोटाचें नाव जें 'अनामिका' तें यथार्थ झालें " या श्लोकांत **कालिदासा**चें अद्वितीयत्व किती चातुर्यानें वर्णिलें आहे! दुसऱ्या बोटास 'अनामिका' म्हणतात येवढ्याच लहानशा गोष्टीवर या सुंदर पद्यांत केवढ्या अर्थाची रचना केली आहे! **कालिदासा**च्या गुणाचें कितीही वर्णन केलें, तरी वरील पद्यांतील मार्मिक अर्थाच्या योगानें मनास जसा चमत्कार भासतो तसा कशानेंही भासावयाचा नाहीं. असो, या श्लोकांत कांहीं अंशीं अत्युक्ति तर आहे खरीच, पण वर सांगितलेली गोष्ट यावरून अगदीं ढळढळीत दिसून येते, ती ही कीं, या साऱ्या देशाचा ताईत होऊन राहिलेला असा कवि **कालिदास**च. इतर कवीस मान नाहींसा नाहीं; परंतु देशीप्रियतेच्या मानानें **होमर**, **शेक्सपीयर** इत्यादिकांच्या मालिकेंत घालण्याची योग्यता याचीच. कवि म्हणजे आपआपल्या देशाचीं व काळाचीं प्रतिबिंबें होत,- म्हणजे त्या त्या देशाची व काळाची स्थिति त्यांच्या काव्यांत रेखलेली दृष्टीस पडते.

---

१ संस्कृतांत हाताच्या पांचाही बोटांस नांवें आहेत. तीं अशीं—अंगुष्ठ (आंगठा), तर्जनी (धमकी दाखविण्याचें बोट), मध्यमा (मधलें बोट), कनिष्ठिका (सर्वांत लहान बोट म्ह० करंगळी), आणि अनामिका (निनांवी बोट) ह्या शेवटल्यास असें नाव दिल्याचें कारण उघडच आहे कीं, स्थानावरून किंवा दुसऱ्या कोणत्याही गोष्टीवरून ओळखण्यासारखी दुसरी संज्ञा त्यास देतांच येईना.

ही स्थिति वरचेवर बदलत असल्यामुळे त्या त्या वेळचे कवीही लोक प्रीतींतून उतरतात. पण ही गोष्ट सामान्य कवींसच लागू. **कालिदासा**सारख्यास लागत नाही. कारण एकेका व्यक्तिभूत राष्ट्राच्याच काय, पण एकंदर साऱ्या मनुष्यजातीच्या स्वभावाचे त्याऱ्या विशाल मानाने आकलन केले असल्यामुळे त्याचे हृदयोद्गार प्रत्येकाच्या हृदयास द्रववून तल्लीन करून टाकतात, व म्हणूनच त्याचे यश देशकालादिकांनीं परिच्छिन्न नसून सूर्यतेजाप्रमाणे त्यावर नित्यत्वाने राहतें !

पूर्वींच्या पंडितांच्या मतें **कालिदासा**च्या कवित्वगुणांतील अत्यंत उज्ज्वल गुण उपमाचातुर्य होय.

**उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम् ।**
**दंडिनः पदलालित्यं माघे संति त्रयो गुणाः ॥**

" उपमा अशी **कालिदासा**नेच करावी, अर्थगौरव असे **भारवी**चेच; पदलालित्य म्हणजे शब्दांची दुमदार रचना ही **दंडी**सच साधली; पण **माघ** कवीचे ठायीं मात्र हे तिन्ही गुण आहेत " उपमान व उपमेय यांचे पूर्ण सादृश्य चमत्कारिक रीतीने दाखविण्याची **कालिदासा**ची शैली इतरास बहुधा आढळत नाही हे खरें, तथापि हीपेक्षांही एक मोठा गुण त्याच्या काव्यात आढळतो, तोही इतर कवींस प्रायः असाधारणच होय. तो कोणता तो पुढे सांगूं. सध्यां वरील उपमेचीं कांही उत्कृष्ट उदाहरणे लिहितो.--

**स्मृतिभिन्नमोहतमसो दिष्ट्या प्रमुखे स्थितासि मे सुमुखि ।**
**उपरागांते शशिनः समुपगता रोहिणी योगम् ॥**[1]

शाकुंतल ७.

---

१ यापूर्वी जेथे जेथे प्रसंगवशात् श्लोक वगैरे आले होते तेथे तेथे त्यांचीं भाषांतरेंही खालीं लिहिलीं होतीं. पण तसें येथे करवत नाहीं. एक तर विस्तारभय, व दुसरें असें कीं, केवळ मराठीच जाणणारांस वरील पद्यांचें स्वारस्य भाषांतराने यथास्थित समजणे बहुधा कठीण, किंबहुना अशक्यच. यास्तव ज्या ज्या काव्याचीं भाषांतरें उपलब्ध असतील त्यात त्यांत वरील पद्यांचें भाषांतर आमच्या वाचकांत जे संस्कृतानभिज्ञ असतील त्यांनीं पाहावें. याशिवाय दुसरा उपायच नाहीं.

किमित्यपास्याभरणानि यौवने
धृतं त्वया वार्द्धकशोभि वल्कलम् ।
वद प्रदोषे स्फुटचंद्रतारका
विभावरी यद्यरुणाय कल्पते ॥

कुमारसंभव. ५.

दृष्टापि सा ह्रीविजिता न साक्षाद्
वाग्भिः सखीनां प्रियमभ्यनन्दत् ।
स्थली नवांभःपृषताभिवृष्टा
मयूरकेकाभिरिवाभ्रवृंदम् ॥

रघुवंश ७.

संचारिणी दीपशिखेव रात्रौ
यं यं व्यतीयाय पतिंवरा सा ।
नरेंद्रमार्गाट्ट इव प्रपेदे
विवर्णभावं स स भूमिपालः ॥

रघुवंश ६.

या शेवटल्या पद्यांतील उपमा तर किती साधी व समर्पक आहे ! वर्णन करण्याची ही आपल्या कवीची तऱ्हा अपूर्व आहे असें मागें अनेक वेळां सांगितलें आहे; त्याचा प्रत्यय पुढील श्लोकांवरून सहज येईल.—

ग्रीवाभंगाभिरामं मुहुरनुपतति स्यंदने दत्तदृष्टिः
पश्चार्द्धेन प्रविष्टः शरपतनभयाद्भूयसा पूर्वकायम् ।
दर्भैरर्द्धावलीढैः श्रमविवृतमुखभ्रंशिभिः कीर्णवर्त्मा
पश्योदग्रप्लुतत्वाद्वियति बहुतरं स्तोकमुर्व्यां प्रयाति ॥

शाकुंतल १.

रंगांनीं प्रत्यक्ष काढलेल्या चित्रांसही कवींचीं शब्दनिर्मित चित्रें कधीं कधीं लाजवतात असें जें म्हणतात त्याचें हें उत्कृष्ट उदाहरण होय. यावरून व वक्ष्यमाण श्लोकांवरूनही वाचकांची खात्री होईल कीं, मार्मिक दृष्टीनें सृष्टिचमत्कार पाहण्याकडे कालिदासाची स्वभावतःच अत्यंत प्रवृत्ति होती. असो; पुढें—

यदालोके सूक्ष्मं व्रजति सहसा तद्विपुलतां
यदर्धे विच्छिन्नं भवति कृतसंधानमिव तत् ।
प्रकृत्या यद्वक्रं तदपि समरेखं नयनयो-
र्न मे दूरे किंचित् क्षणमपि न पार्श्वे रथजवात् ॥

शाकुंतल १.

हें वाचून हल्लींप्रमाणेंच त्या वेळींही अग्निरथ असून त्याचा प्रचंड वेग अनुभवीत असतांच हें कवीनें लिहिलें असेल काय असा कोणास भास होत नाहीं !

तत्प्रार्थितं जवनवाजिगतेन राज्ञा
तूणीमुखोद्धृतशरेण विशीर्णपंक्ति ।
श्यामीचकार वनमाकुलदृष्टिपातै—
र्वातेरितोत्पलदलप्रकरैरिवार्द्रैः ॥

रघुवंश ९.

हा एक सृष्टिवर्णनाचा प्रकार झाला, दुसरा लौकिक प्रसंगाचा पहा.

तासु श्रिया राजपरंपरासु प्रभाविशेषोदयदुर्निरीक्ष्यः ।
सहस्रधात्मा व्यरुचद्विभक्तः पयोमुचां पंक्तिषु विद्युतेव ॥

रघुवंश ६.

इंदीवरश्यामतनुर्नृपोऽसौ त्वं रोचनागौरशरीरयष्टिः ।
अन्योन्यशोभापरिवृद्धये वां योगस्तडित्तोयदयोरिवास्तु॥

रघुवंश ६.

तिसरा प्रकार शृंगारविषयक. येथें तर बोलावयासच नको. प्रणयिजनांचीं अत्यंत गूढ जीं हृद्गतें तींही दाखवून कामदेवानें स्वरहस्यांचा उपदेशच जणों काय कवीस केला आहे असें वाटतें —

यतो यतःषट्चरणोऽभिवर्तते ततस्ततःप्रेरितलोललोचना।
विवर्तितभ्रूरियमद्य शिक्षते भयादकामापि हि दृष्टिविभ्रमम्

शाकुंतल १.

शिरीषपुष्पाधिकसौकुमार्यौ बाहू तदीयाविति मे वितर्कः।
पराजितेनापि कृतौ हरस्य यौ कंठपाशौ मकरध्वजेन ॥

कुमारसंभव १.

विवृण्वती शैलसुतापि भावमंगैः स्फुरद्बालकदंबकल्पैः ।
साचीकृता चारुतरेण तस्थौ मुखेन पर्यस्तविलोचनेन ॥

कुमारसंभव ३

ततः सुनंदावचनावसाने लज्जां तनूकृत्य नरेंद्रकन्या ।
दृष्ट्या प्रसादामलया कुमारं प्रत्यग्रहीत् संवरणस्रजेव ॥

रघुवंश ६.

हे सर्व वर्णनाचे चुटके झाले. पण कोठें कोठें हें वर्णन इतकें परिपूर्ण असतें कीं, वर्णिलेले विषय जसे काय प्रत्यक्ष डोळ्यांपुढें उभे राहतात, व त्यांच्या मनोगत भावांकडे वाचकांची चित्तवृत्ति बलात्कारें ओढली जाऊन तन्मय होते:--

ततः प्रियोपात्तरसेऽधरोष्ठे निधाय दध्मौ जलजं कुमारः ।
तेन स्वहस्तार्जितमेकवीरः पिबन् यशो मूर्तमिवाबभासे ॥

रघुवंश ७.

स चापकोटीनिहितैकबाहुः शिरस्त्रनिष्कर्षणभिन्नमौलिः
ललाटबद्धश्रमवारिबिंदुर्भीतां प्रियामेत्य वचो बभाषे ॥

रघुवंश ७

त्वामारूढं पवनपदवीमुद्गृहीतालकांताः
प्रेक्षिष्यंते पथिकवनिताः प्रत्ययादाश्वसत्यः ।
कः सन्नद्धे विरहविधुरां त्वय्युपेक्षेत जायां
नस्यादन्योऽप्यहमिव जनो यः पराधीनवृत्तिः ॥

मेघदूत

तस्माद्गच्छेरनुकनखलं शैलराजावतीर्णां
जन्होः कन्यां सगरतनयस्वर्गसोपानपंक्तिम् ।
गौरीवक्त्रभ्रुकुटिरचनां या विहस्येव फेनैः
शंभोः केशग्रहणमकरोदिंदुलग्नोर्मिहस्ता ॥

मेघदूत

तस्मिन् हित्वा भुजगवलयं शंभुना दत्तहस्ता
क्रीडाशैले यदि च विहरन् पादचारेण गौरी।

भंगीभक्त्या विरचितवपुः स्तंभितांतर्जलौघ-
सोपानत्वं व्रज पदसुखस्पर्शमारोहणेषु ॥

मेघदूत.

नूनं तस्याः प्रबलरुदितोच्छूननेत्रं प्रियाया
निःश्वासानामशिशिरतया भिन्नवर्णाधरोष्ठम् ।
हस्तन्यस्तं मुखमसकलव्यक्ति लंबालकत्वा-
दिंदोर्दैन्यं त्वदनुसरणक्लिष्टकांतेर्बिभर्ति ॥

मेघदूत.

शेवटल्या श्लोकांत यक्षानें आपल्या विरहशोकार्त स्त्रीच्या मुखाचें वर्णन किती हृदयभेदक केलें आहे ! तसेंच ज्या मेघास त्यानें आपला मित्र कल्पिला त्याचा संबंधही किती खुबीदार आणला आहे !

कामिजनाच्या मनाचे व्यापार खाला किती सुंदर रीतीनें वर्णिले आहेत !—

अनुयास्यन्मुनितनयां सहसा विनयेन वारितप्रसरः ।
स्थानादनुच्चलन्नपि गत्वेव पुनः प्रतिनिवृत्तः ॥.

शाकुंतल १.

यदिदं रथसंक्षोभादंगेनांगं निपीडितम् ।
एकं कृति शरीरेऽस्मिन् शेषमंगं भुवो भरः ॥

विक्रमोर्वशी २.

अभिमुखे मयि संहृतमीक्षितं हसितमन्यनिमित्तकृतोदयम्
विनयवारितवृत्तिरतस्तया न विवृतो मदनो न च संवृतः

शाकुंतल २.

वाचं न मिश्रयति यद्यपि मे वचोभिः
कर्णं ददात्यभिमुखं मयि भाषमाणे ।
कामं न तिष्ठति मदाननसंमुखी सा
भूयिष्ठमन्यविषया न तु दृष्टिरस्याः ॥

शाकुंतल १.

अनुभवन्नवदोलमृतूत्सवं पटुरपि प्रियकंठजिघृक्षया ।
अनयदासनरज्जुपरिग्रहे भुजलतां जल[ड]तामबलाजनः.

रघुवंश ९.

भित्वा सद्यः किसलयपुटान् देवदारुद्रुमाणां
ये तत्क्षीरस्रुतिसुरभयो दक्षिणेन प्रवृत्ताः ।
आलिंग्यंते गुणवति मया ते तुषाराद्रिवाताः
पूर्वं स्पृष्टं यदि किल भवेदंगमेभिस्तवेति ॥

मेघदूत.

दुष्यंताची शापहतस्मृति पुनः येतांच शकुंतलेचा अपमान केल्या-बद्दल त्यास अतिशय पश्चात्ताप झाला, व इतःपर तिचें दर्शन दुर्लभ असें वाटून अत्यंत विरहदुःख झालें त्या वेळस तो म्हणतो:----

स्वप्नो नु माया नु मतिभ्रमो नु क्लिष्टं नु तावत्फलमेव पुण्यम्
असन्निवृत्त्यै तदतीतमेते मनोरथानामतटप्रपाताः ॥

शाकुंतल ६.

तसाच अजराजाचा शोक.- -

धृतिरस्तमिता रतिश्च्युता विरतं गेयमृतुर्निरुत्सवः ।
गतमाभरणप्रयोजनं परिशून्यं शयनीयमद्य मे ॥

रघुवंश ८.

त्याप्रमाणे इतर प्रसंगींचेही हृदयोद्गार अशा चमत्कारिक शब्दांनीं वर्णिले आहेत कीं, त्यांतील प्रत्येकांत तो तो रस ओतलाच आहे काय असा भास होतो.—

यास्यत्यद्य शकुंतलेति हृदयं संस्पृष्टमुत्कंठया
कंठः स्तंभितबाष्पवृत्तिकलुषश्चिंताजडं दर्शनम् ।
वैक्लव्यं मम तावदीदृशमपि स्नेहादरण्यौकसः
पीड्यंते गृहिणः कथं न तनयाविश्लेषदुःखैर्नवैः ।।

शाकुंतल ४.

हा व पुढील आणखी तीन श्लोक इतके करुणरसभरित आहेत कीं, ते पंडितांस अत्यंत प्रिय होऊन त्यांस 'श्लोकचतुष्टय' हें नांव मिळालें आहे.[1]

---

१ दुसरे तीन श्लोक हे:—
शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने
भर्तुर्विप्रकृताऽपि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ।

[ पुढें चालू. ]

इतः प्रत्यादेशात्स्वजनमनुगंतुं व्यवसिता
मुहुस्तिष्ठेत्युच्चैर्वदति गुरुशिष्ये गुरुसमे ।
पुनर्दृष्टिं बाष्पप्रसरकलुषामर्पितवती
मयि क्रूरे यत्तत्सविषमिव शल्यं दहति माम् ॥

शाकुंतल ६.

जेव्हां दुष्यंतही स्वीकार करीना, व मुनिशिष्य शार्ङ्गरवें हाही दरडावून रागें भरला, तेव्हां बिचाऱ्या शकुंतलेस देमाय धरणी ठाय असें होऊन तिनें डोळ्यांत आसवें आणून दीन दृष्टीनें पुन: राजाकडे पाहिलें, तरीही त्यास द्रव आलाच नाहीं. ही गोष्ट पुढें राजाच्या जिव्हारीं लागून विदूषकापाशीं तो तिजबद्दल पश्चात्ताप करीत आहे. हा सकरुण प्रसंग कवीनें चातुर्यानें कल्पून श्लोकांतही तो रस पूर्णपणें उतरविला आहे.

तसेंच पुढील श्लोकांतही—

पुरं निषादाधिपतेरिदं तद्यस्मिन्मया मौलिमणिं विहाय ।
जटासु बद्धास्वरुदत्सुमंत्रः कैकेयि कामाः फलितास्तवेति ।।

रघुवंश १३.

शकुंतलेचा विनाकारण त्याग करून मीं हतभाग्यानें आपल्या हातानेंच आपला घात करून घेतला. याप्रमाणें राजा खेद करीत असतां त्यास धनमित्राचा वृत्तांत कळला. तेव्हां तर त्याचें चित्त

---

भूयिष्ठं भव दक्षिणा परिजने भाग्येष्वनुत्सेकिनी
यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः ॥
अभिजनवतो भर्तुः श्लाघ्ये स्थिता गृहिणीपदे
विभवगुरुभिः कृत्यैस्तस्य प्रतिक्षणमाकुला ।
तनयमचिरात्प्राचीवार्कं प्रसूय च पावनं
मम विरहजां न त्वं वत्से शुचं गणयिष्यसि ।।
भूत्वा चिराय चतुरंतमहीं सपत्नी
दौष्यंतिमप्रतिरथं तनयं निवेश्य ।
भर्त्रा तदर्पितकुटुंबभरेण सार्द्धं
शांते करिष्यसि पदं पुनराश्रमेऽस्मिन् ।।

आनतर्शागत उदास होऊन संततिविच्छेदास्तव पितरांस अभोगांत घडणार याबद्दल त्यास मोठा विषाद वाटला. त्या वेळच्या त्याच्या दुःखोद्गार वाचून कोणाचें अंतःकरण भरून येत नाहीं ?—

अस्मात्परं बत यथाश्रुतिसंभृतानि
को नः कुले निवपनानि नियच्छतीति ।
अस्मत्प्रसूतिविकलेन मया प्रसिक्तं
धौताश्रुशेषमुदकं पितरः पिबंति ॥

शाकुंतल ६.

त्याचप्रमाणे—

त्वं रक्षसा भीरु यतोऽपनीता तं मार्गमेताः कृपया लता मे ।
अदर्शयन् वक्तुमशक्नुवंत्यः शाखाभिरावर्जितपल्लवाभिः ॥

रघुवंश १३.

मृग्यश्च दर्भांकुरनिर्व्यपेक्षास्तवागतिज्ञं समबोधयन्माम ।
व्यापारयंत्यो दिशि दक्षिणस्यामुत्पक्ष्मराजीनि विलोचनानि

रघुवंश १३.

अत्रानुगोदं मृगयानिवृत्तस्तरंगवातेन विनीतखेदः ।
रहस्त्वदुत्संगनिषण्णमूर्धा स्मरामि वानीरगृहेषु सुप्तः ॥

रघुवंश १३.

**कालिदासाच्या** कवितेत अश्लीलत्व म्हणजे ग्राम्यत्वाचा दोष कोठेंही आढळत नाहीं. त्याचे हृदयोद्गार शुद्ध मार्मिकपणाचे असतात. ग्राम्यजनांच्या कुत्सित दृष्टीस सृष्टींतील सर्व विषय क्षुद्रत्वाने भासतात; स्त्रिया म्हणजे केवळ उपभोग्य वस्तु अशी अप्रशस्त बुद्धि त्यांचे ठायीं असून त्याचे सर्व विचारही तदनुरूपच असतात. पण ही अयोग्य समजूत **कालिदासाच्या** काव्यांत अगदीं दृष्टीस पडत नाहीं. ब्रह्मदेवाचें कर्तृत्व ज्यांचे ठायीं पूर्णत्वानें दृष्टीस पडते, ज्यांपरते रम्य जगांत काहीं नाहीं, ज्यांस सारख्या प्रमाणानेंच बुद्धिगुण देऊन हृदयाची कोमलता ज्यांचे ठायीं विधात्यानें विशेष ठेविली, कीं संसारांतील आपला वांटा संभाळून त्यांनीं आपल्या सहचरांस विशेष सुख द्यावें,—अशा ज्या स्त्रिया, त्यांकडे **कालिदासासारख्या**

महाकवीच्या मनाचा ओघ असा विपरीत कसा वाहेल! अर्थातच वाहायचा नाहीं. त्याच्या कवितेंत जेथें तेथें स्त्रियांविषयीं आदर व गौरव हींच दृष्टीस पडतात. अजराजा आपल्या शत्रूंस प्रस्वापनास्त्रानें जिंकून टाकून शेवटीं इंदुमतीकडे आला; तेव्हां

**स चापकोटीनिहितैकबाहुः शिरस्त्रनिष्कर्षणभिन्नमौलिः**
**ललाटबद्धश्रमवारिबिंदुर्भीतां प्रियामेत्य वचो बभाषे ॥**
**" इतः परानर्भकहार्यशस्त्रान् वैदर्भि पश्यानुमता मयासि।**
**एवंविधेनाहवचेष्टितेन त्वं प्रार्थ्यसे हस्तगता ममैभिः " ॥**

रघुवंश ७.

हें वीररसयुक्त भाषण त्या प्रसंगीं किती शोभतें आहे! ज्यानीं इंग्रजी कादंबऱ्या वाचल्या असतील त्यांस खरोखर **सर वाल्टर स्काट्** याच्या अनुपम ग्रंथांची आठवण झाल्याविना राहणार नाहीं.

आपल्या कवीचा हा स्त्रियांविषयींचा पक्षपात इतका दृढ होता कीं, तसा विशेष प्रसंग नसताही तो मधें मधें झळकतो. अजराजा स्वयंवरास निघाला असतां वाटेनें नर्मदेच्या कांठीं तळ देऊन राहिला; तों एकाएकीं एक प्रचंड हत्ती त्या नदींतून निघून त्यानें सैन्याची दाणादाण करून दिली. तो प्रसंग वर्णीत होत्साता कवि म्हणतो,

**स छिन्नबंधद्रुतयुग्यशून्यं भग्नाक्षपर्यस्तरथं क्षणेन।**
**रामापरित्राणविहस्तयोधं सेनानिवेशं तुमुलं चकार ॥**

रघुवंश ५.

इंदुमती एकाएकीं मरण पावली असतां अजराजा शोकविव्हल होत्साता तिचे गुण आठवतो—

**गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ।**
**करुणाविमुखेन मृत्युना हरता त्वां वद किं न मे हृतम्**

रघुवंश ८.

स्त्रिया म्हणजे सर्व प्रकारें निंद्य, त्यांस बटीकपणाच योग्य, वगैरे ज्या अलीकडे आपल्या लोकांत समजुती होऊन गेल्या आहेत, त्यांत व वरील श्लोकाच्या प्रथमार्धांत केवढी तफावत आहे! पण हा कवीचा पक्षपात केवळ राजस्त्रिया वगैरे अशांकडेच होता असें नाहीं, तर एकंदर स्त्रीजातीकडे होता.—

त्वय्यायत्तं कृषिफलमिति भ्रूविकारानभिज्ञैः
प्रीतिस्निग्धैर्जनपदवधूलोचनैः पीयमानः ।
सद्यः सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं
किंचित्पश्चाद् व्रज लघुगतिः किंचिदेवोत्तरेण ॥

मेघदूत.

या पद्याच्या पूर्वार्धांत शेतकऱ्यांच्या बायकांविषयींची स्वभावोक्ति किती हृदयग्राहक आहे !

आतां भाषणाचे कांहीं उत्कृष्ट प्रकार दाखवितों.

अतोयमश्वः कपिलानुकारिणा
पितुस्त्वदीयस्य मयापहारितः ।
अलं प्रयत्नेन तवात्र मा निधाः
पदं पदव्यां सगरस्य संततेः ॥ रघुवंश ३.

या श्लोकांत इंद्रानें थोड्याच पण खुबीदार शब्दांनीं रघूस केवढी जरब घातली ! पण तो पराक्रमी राजपुत्र अशा जरबेस विचारतो काय त्यानेंही लागलींच उत्तर दिलें,

ततः प्रहस्यापभयः पुरंदरं
पुनर्बभाषे तुरगस्य रक्षिता ।
गृहाण शस्त्रं यदि सर्ग एष ते
न खल्वनिर्जित्य रघुं कृती भवान् ॥ रघुवंश ३.

हें उत्तर राजपुत्राच्या कुलीनतेस, वीरश्रीस व त्या प्रसंगास किती उचित आहे !

हें वीररसाविषयींचें झालें; आतां तद्विरुद्ध जो करुणरस तन्मय भाषणाचें उदाहरण पहा—

जाने विसृष्टां प्रणिधानतस्त्वां मिथ्यापवादक्षुभितेन भर्त्रा ।
तन्मा व्यथिष्ठा विषयांतरस्थं प्राप्ताऽसि वैदेहि पितुर्निकेतम् ।

रघुवंश १४.

पारध्यानें क्रौंच पक्ष्यास मारलें हें पाहतांच ज्याच्या तोंडांतून शापरूप छंदोमयी वाणी निघाली त्या आद्यकवीची दयार्द्रता व वाणीची प्रौढता वरील श्लोकांत कशी उत्कृष्ट उतरली आहे !

पण येथवर सांगितलेल्या उज्ज्वल गुणांसही लोपवणारा व इतर कवींस असाधारण असल्यामुळें **कालिदासा**चा विशेष होऊन राहिलेला असा एक गुण अद्यापि सांगावयाचाच आहे. तो कोणता ? तर उदात्तरस किंवा कल्पनाविशालत्वें. आजपर्यंत सर्व देशांत जे जे कविश्रेष्ठ होऊन गेले ते सर्व या गुणेंकरून विशिष्ट होते. इंग्लिश कवितेच्या वर्णनांत एके जागीं **ड्रैडन्** कवीचा एक सर्वप्रसिद्ध चुटका लिहिला होता तो वाचकांस आठवत असेलचें. त्यांत या गुणाच्या संबंधें **होमर** कवीस अग्रगण्यत्व देऊन **मिल्तन्** यासही त्याच्या जोडीस बसविलें आहे. **ड्रैडन्** हा एक शतक पुढें होऊन आपल्या कवीचें काव्यामृत जर चाखता, तर **गेटी**प्रमाणेंच तल्लीन होऊन वरील कविमालेंत तो त्यास खास घालता; कारण त्यास गुणांची पारख उत्कृष्ट असून त्याहूनही दुर्लभ जी मनाची समवस्था, म्हणजे वृथाभिमान, मत्सर इत्यादि विकारांपासून मुक्तता, तीही त्यास अनुकूल होती; आणि **कालिदासा**चा हा अत्युज्ज्वल गुण तर त्याच्या कवितेंत चोहोंकडे आढळतो—

**पांड्योऽयमंसार्पितलंबहारः क्लृप्तांगरागो हरिचंदनेन ।**
**आभाति बालातपरक्तसानुः सनिर्झरोद्गार इवाद्रिराजः ॥**

रघुवंश ६.

---

१ या रसाचा वाचक शब्द संस्कृत साहित्यांत नाहीं; यास्तव तो येथें नवा केला आहे. या रसास इंग्रेजींत The sublime असें म्हणतात.

२ मूळ ‘ शाळापत्रकां ’ त या निबंधाच्या अगोदर इंग्रेजी कवींचें थोडेसें वर्णन केलें होतें. तें येथें नाही, यास्तव तो चुटका या ठिकाणीं देणें अवश्य आहे—

Three poets in three distant ages born,
Greece, Italy and England did adorn;
The first in loftiness of thought surpassed,
The second in majesty, in both the last.
The force of Nature could no further go;
To Make a third, she joined the other two.

वरील सुंदर सुभाषित ड्रायडन्नें एका तजबिरीखालीं लिहून ठेविलें होतें. यावरून वरील कवीचे शीघ्रकवित्व व गुणग्राहकत्व हे गुण स्पष्ट होतात.

सरित्समुद्रान् सरसीश्च गत्वा रक्षःकपींद्रैरुपपादितानि ।
तस्यापतन्मूर्ध्नि जलानि जिष्णोर्विन्ध्यस्य मेघप्रभवा इवापः

रघुवंश १४.

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा हिमालयो नाम नगाधिराजः।
पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य स्थितः पृथिव्या इव मानदंडः॥

कुमारसंभव १.

प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत् ।
सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः ॥ रघुवंश १.

राजांनीं कर घेणें म्हणजे केवळ प्रजेस बुचाडणें आहे ही जी अडाणी लोकांची समजूत तिचें निरसन व प्रजाहितावहत्वरूप जें करांचें यथार्थस्वरूप त्याचें विवरण, वरील दृष्टांतानें जसें उत्कृष्ट होतें, तसें इतर कशानेंही होईल काय ?

अजराजपुत्रास विवाहवस्त्रें देऊन नंतर अंतःपुररक्षकांनीं त्यास इंदुमतीकडे विवाहार्थ नेला, या गोष्टीचें वर्णन कवि करतोः—

दुकूलवासाः स वधूसमीपं निन्ये विनीतैरवरोधरक्षैः ।
वेलासकाशं स्फुटफेनराजिर्नवैरुदन्वानिव चंद्रपादैः ॥

रघुवंश ७.

या सुंदर दृष्टांतावरून कालिदासाच्या सृष्टिज्ञानाविषयीं अनुमान करणें आम्ही आपल्या वाचकांवरच सोंपवितों.

विवाहाग्नीभोंवतालीं वधूवरें प्रदक्षिणा करूं लागलीं,त्या प्रसंगाचें वर्णन—

प्रदक्षिणप्रक्रमणात्कृशानोरुदर्चिषस्तन्मिथुनं चकासे ।
मेरोरुपांतेष्विव वर्तमानमन्योन्यसंसक्तमहस्त्रियामम् ॥

रघुवंश ७.

केवढी विशाल कल्पना ही ! मेरूभोंवतीं दिवस व रात्र हें युग्म नित्यसंबंधानें फिरत आहे हा विचार सामान्य कवींच्या मनांत येणें केवढें कठिण आहे !

तिस्रस्त्रिलोकप्रथितेन सार्धमजेन मार्गे वसतीरुषित्वा ।
तस्मादपावर्तत कुंडिनेशः पर्वात्यये सोम इवोष्णरश्मेः ॥

रघुवंश ७.

चंद्र स्वतः प्रकाशमान नाहीं, व अमावास्येच्या दिवशीं तो पर्व-

ताच्या गुहेंत[1] वगैरे लपून न राहतां आकाशांतच सूर्याच्या अगदीं जवळ असतो, व कलाहीन होतो, इत्यादि ज्योतिषाचीं रहस्यें **कालिदासास** चांगलीं माहित होतीं असें त्याच्या ग्रंथावरून स्पष्ट दिसतें. वरील श्लोकात चंद्राचा दृष्टांत घेऊन तो तीन रात्रीं ( वद्य चतुर्दशी, अमावास्या व प्रतिपदा ) सूर्याजवळ असतो, व द्वितीयेस त्यापासून निघतो असें स्पष्ट सांगितलें आहे. असो.

**सप्तर्षिहस्तावचितावशेषाण्यधो विवस्वान् परिवर्तमानः ।**
**पद्मानि यस्याग्रसरोरुहाणि प्रबोधयत्यूर्ध्वमुखैर्मयूखैः ॥**

कुमारसंभव १.

हें पद्य वाचून हिमालयाची भव्य उंची कोणाच्या मनावर ठसत नाहीं ? कवीचा अभिप्राय असा आहे कीं, सूर्य क्षितिजाखालीं असताही त्याचें किरण हिमालयाच्या वरच्या प्रदेशांतील सरोवरांतल्या कमलांस विकासवितात ' सप्तर्षि० ' हे कमलाचे विशेषण व ' ऊर्ध्वमुखैः ' हें किरणाचें विशेषण हीं वरील अर्थास अनुक्रमेंकरून पुष्टि व विशदत्व आणतात, यास्तव त्यांची योजना फार समर्पक होय.[2]

---

१ ही कल्पना यहुदी लोकाची होती. २ मिल्टननें ' साम्सन् एगोनिस्टिस् ' नाटकाच्या आरंभीं स्वपर जो करुण उद्गार प्रगट केला आहे त्यांत म्हटलें आहे.

The sun to me is dark
And silent as the moon,
When she deserts the night.
Hid in her vacant interlunar cave.

आपल्यात अशी वेडगळ समजूत मुळींच नव्हती हें ' अमावास्या ' ( सह असणे ), ' सूर्येंदुसंगम ' इत्यादि शब्दांवरूनच दिसत आहे.

२ वरील पद्यावर मल्लिनाथाने जी टीका केली आहे तीवरून मागें उपोद्घातांत अर्वाचीन पंडितांविषयीं जें लिहिलें आहे त्याचा उत्कृष्ट प्रत्यय येईल. मूळ कवीनें हिमालयाच्या उन्नततेवर ज्या अत्यंत सरस व उदात्त अर्थाचें निबंधन केलें आहे तो टीकाकारास मुळींच समजला नाहीं. ' ऊर्ध्वमुखैर्मयूखैः ' यावर व्याख्यान करतांना ती म्हणतो—' अतिमार्तंडमंडलत्वादग्रभूमेरिति भावः ' ! म्हणजे टीकाकर्त्याचा अभिप्राय असा कीं, हिमालयाच्या अग्रभागांतील सरोवरांत असणाऱ्या कमलांस सूर्याचीं किरणे ऊर्ध्वमुखत्वानें कां स्पर्श करितात ?—तर ते हिमालयाचे प्रदेश सूर्यमंडलाहून उंच आहेत म्हणून ! ! ज्या आमच्या चतुर कवीस ज्योतिषादि सर्व शास्त्रें चांगलीं अवगत असावींशीं दिसतात त्यानें हिमालयाचीं शिखरें सूर्याहून उंच असली अप्रयोजक कल्पना करणें हें केवळ विचित्र आहे !

मेघास हिमालयापर्यंत मार्ग सांगून पुढे कैलासास जाण्याचा उपाय यक्ष सांगतो,

**प्रालेयाद्रेरुपतटमतिक्रम्य तांस्तान्विशेषान्**
**हंसद्वारं भृगुपतियशोवर्त्म यत्क्रौंचरंध्रम् ।**
**तेनोदीचीं दिशमनुसरेस्तिर्यगायामशोभी**
**श्यामः पादो बलिनियमनाभ्युद्यतस्येव विष्णोः ॥**

मेघदूत.

यक्ष म्हणतो, " भार्गवरामानें क्रौंचपर्वतास जें विवर पाडलें आहे त्यांतून जाण्याकरिता तू संकुचित होऊन लांबच लांब असा सोट हो, म्हणजे वामनावतारीं जेव्हां विष्णूनें विटाट्स्वरूप धारण केलें त्या वेळेस साऱ्या स्वर्गास व्यापणारा त्याचा श्यामवर्ण पाय जसा प्रचंड दिसला तसा तूं दिसशील. " या कल्पनेनें मनास केवढा चमत्कार भासतो व तें किती थक्क होतें !

याप्रमाणे **कालिदासा**च्या काव्यांतून जे गुण ठळक ठळक दिसतात त्यांचे वर्णन करून ज्या ज्या स्थलविशेषीं वाचकाचें मन अत्यंत रममाण होते तेही सांगितले. आतां कदाचित् असे झालें असेल, की कित्येकांचे आवडते श्लोक वर आले नसतील. पण त्याबद्दल त्यांनीं आम्हांस दोष लावूं नये; तो सर्वथा कवीचाच होय. मोठा रत्नपरीक्षक जरी असला तरी जर एखाद्या सार्वभौम राजाच्या जवाहिराच्या भांडारांत त्यास सोडिलें, व कांही थोडीच रत्नें त्यास निवडायास सांगितलीं, तर त्या बिचाऱ्या निवडणारानें काय करावे ! सरासरी जेवढीं एका मुठींत येतील तितकीं तो निवडून काढील, इतकेंच. आपल्या कवीचे गुण अपार, तशींच चित्त रमण्याचीं स्थानेही नानाविध व पुष्कळ. तेव्हां अशा निधींत निवडानिवड करणे हें केवळ अशक्य होय. तथापि 'रघुवंशा'दि काव्यांविषयीं लिहितांना जे प्रशंसापर अभिप्राय वर लिहिले त्यांचा पूर्ण प्रत्यय वाचकांस यावा या हेतूनें वरील उतारे घेतले. त्यांत तरी **कालिदासा**च्या कवितेंतील अत्यंत सरस पद्यें बहुतेक चुकलीं नसतील असा भरंवसा आहे. असो; येथवर संस्कृत कविमालेंत पहिला जो **कालिदास** त्याविषयीं झालें. यापुढें त्याच्या तोडीचा कवि व नाटककार जो **भवभूति** त्याविषयीं लिहूं.

---

# भवभूति.

**भवभूतेः संबंधाद्भूधरभूरेव भारती भाति ।**
**एतत्कृतकारुण्ये किमन्यथा रोदिति ग्रावा ॥**[1]

सप्तशती गोवर्धन.

मागे **कालिदासा**विषयीं लिहितांना असे म्हटले होते कीं, त्याज विषयीं खात्रीची माहिती कोणतीही बिलकूल मिळत नाहीं. फार तर काय, पण त्याची लोकोत्तर कीर्ति त्याच्या वेळेपासूनच जर न पसरती, व तो नाटके न लिहिता, तर त्याच्या नुसत्या काव्यावरून त्याच्या नांवाचाही मागमूस न लागता. **भवभूतीस** ही गोष्ट सर्वथा लागत नाहीं. तो कोणत्या काळी होता, व कोठे राहात असे, वगैरे गोष्टींचा जरी **कालिदासा**च्याप्रमाणेंच अगदी पत्ता लागत नाहीं, तरी आपला कुलवृत्तांत तरी पुढील लोकास समजावा अशी त्याने तजवीज करून ठेवली आहे. त्याच्या तिही नाटकाच्या आरंभी पुढील मजकूर सापडतो. दक्षिण देशात पद्मपुर नामक नगरी उंबर नावाचे तपोनिष्ठ ब्राह्मण राहत असत. त्यांच्या कुळात गोपाळभट्ट हा झाला. त्याचा पुत्र नीलकंठ, हा **भवभूतीचा** बाप. **भवभूती**च्या आईचें नाव जातुकर्णी. भट्टश्रीकंठ असेही नाव आपल्या कवीस पुढे मिळाले. खरा म्हणण्यासारखा **भवभूती**चा वृत्तांत काय तो इतकाच. याशिवाय लोकातही जी माहिती आहे ती केवळ कल्पनामय होय.

आपल्या लोकात जुन्या संस्कृत कवीविषयीं पुष्कळ दंतकथा आहेत. त्यांत **भवभूती**विषयीं असे सांगतात कीं, भोजराजाच्या पदरी जे पुष्कळ पंडित होते त्यांत तोही होता. व कवित्वाविषयीं त्याची व **कालिदासा**ची मोठी स्पर्धा असे. हे केवळ सामान्यतः झालें; पण

---

१ " भवभूतीच्या संबंधावरून पाहता सरस्वती ही पर्वताची कन्या म्हणजे पार्वतीच असावी असे वाटते. कारण एरवी त्याच्या करुणरसानें पाषाण कसा रडावयास लागेल ! "

विशेषतः असेही सांगतात की, **भवभूती**चे 'उत्तररामचरित' नाटक वाचून **कालिदासा**स अतिशय विस्मय झाला, व त्या आनंदभरांत तें नाटक मस्तकीं धरून तो धन्य धन्य म्हणून नाचला. तसेच त्या नाटकांतील पहिल्या अंकांत.

**किमपि किमपि मंदं मंदमासत्तियोगा-**
**दविरलितकपोलं जल्पतोरक्रमेण ।**
**अशिथिलपरिरंभव्यापृतैकैकदोष्णो-**
**रविदितगतयामा रात्रिरेवं व्यरंसीत् ॥**

असा **भवभूती**चा मूळचा श्लोक होता; तो **कालिदासा**नें वाचून कवीस असें सुचविलें कीं, शेवटल्या चरणांतील ' एवं ' या पदाच्या जागीं ' एव ' असें पद घातल्यास अर्थ विशेष खुलेल.[1] या सूचनेवरून **भवभूती**नेंही तसेंच पाठांतर केलें, व तोच पाठ अद्याप चालत आहे, असें सांगतात.

वरील मनोरंजक आख्यायिकेंत केवळ असंभाव्यच असें कांहीं नाहीं; कां कीं, त्या नाटकाची योग्यता अशीच आहे कीं, 'शाकुंतल' नाटककारानेंही तें मस्तकीं धरावें; तसेंच विशालबुद्धीशीं सहज जी निरभिमानता ती **कालिदासा**चेठायीं पूर्ण असावीशी दिसते. परंतु लिहावयास परम खेद वाटतो कीं, **भवभूती**चीं नाटकें कवीश्वरांच्याही शिरीं जीं चढलीं तीं अशा अल्पायासानें व अल्पावकाशांत चढलीं नाहींत;

**नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा**
**मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि ॥**

" सर्वांनीं मस्तकीं धारण करावें हीच सुवासिक पुष्पाची स्वभावसिद्ध योग्यता; पायांखालीं तुडवून जाणें ही नव्हे " हें खरें; परंतु जगांत याच्या उलट अनुभव आले आहेत. याच देशांत काय, पण सर्व देशांतही अशा गोष्टी अनेक वेळां घडून आल्या आहेत कीं,

---

१ तो असा कीं, ' पूर्वोक्त प्रकारें बोलतां बोलतां 'रात्र मात्र' संपली, पण गोष्टी संपल्या नाहींत. ' पूर्वपाठाचा अर्थ इतकाच होत होता कीं, 'अशा प्रकारें बोलत असतां रात्र संपली'; यापेक्षां वरील अर्थ अधिक सरस होय हें अर्थमर्मज्ञान सहज समजण्यासारखें आहे.

खरी पारख करणारे रसिकजन नसल्यामुळें कित्येकांचे स्वाभाविक बुद्धिगुण उदयास न येतां तसेच अप्रसिद्ध राहिले, व कित्येकांस तर मूर्ख अरसिक अशा आपल्या काळच्या लोकांपासून सुदुःसह विटंबनाही सोसणे भाग आलें. भवभूतीचीही अशीच दशा झाली हें त्याच्या नाटकांवरून स्पष्ट दिसते. ' उत्तररामचरिता 'च्या आरंभीं सूत्रधार म्हणतो,

**सर्वथा व्यवहर्तव्ये कुतो ह्यवचनीयता ।**
**यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः ॥**

" कोणीं नांव ठेवल्याखेरीज जनात राहणे हे फार कठिण आहे; स्त्रियांचें पातिव्रत्य व वाणीचें निर्दोषत्व हीं दोन लोकांस कधीं सहन होत नाहींत, त्यात काहींना काही तरी व्यंग काढणे हा त्यांचा धर्मच. " तसेंच 'महावीरचरितांतील ' शेवटचें भरतवाक्य—

**लोके नित्यप्रमोदं विदधतु कवयः श्लोकमाप्तप्रसादं**
**संख्यावंतोऽपि भूम्ना परकृतिषु मुदं संप्रधार्य प्रयांतु ॥**

" प्रसादगुणयुक्त म्हणजे ज्याचा अर्थ सरळ आहे अशीं मनोरंजक काव्यें कवि रचोत, आणि बुद्धिमान् पंडित तीं आदरपूर्वक वाचून त्यांचे गुण घेवोत. "

**भवभूतीची** त्याच्या वेळच्या लोकांत जर चहा असती व तो सर्वांचें प्रीतिपात्र असता, तर असे कृतघ्नपणाचे उद्गार त्याचे मुखांतून निघते काय ?

पण हे कांहींच नव्हेत; यांहूनही अत्यंत खोलपासून निघालेला हृदयोद्गार ' मालतीमाधव ' नाटकाच्या आरंभीं आहे, तो वाचकांच्याही हृदयांत तसाच खोल गेल्यावांचून राहणार नाहीं;—

**ये नाम केचिदिह नः प्रथयंत्यवज्ञां**
**जानंतु ते किमपि तान् प्रति नैष यत्नः ।**
**उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा**
**कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥**

" जे कोणी आमची अवहेलना करून ती लोकांमध्यें पसरावितात यांनीं असें समजावें कीं, हा [illegible] श्रम त्याजकरितां मुळींच

नव्हे; मजसारखेच ज्याचे मनोधर्म आहेत असा कोणी तरी पुढे मागें होईलच होईल,—कां कीं, काल हा अनंत आहे व पृथ्वीही तशीच विस्तीर्ण आहे ! "

असमंजस लोकांनीं वास्तविक योग्यता न ओळखतां ज्यास क्षुद्रवत् लेखिलें अशा कविमणीची भविष्यरूप यथार्थ उक्ति वरच्या इतकी उदार व सकरुण कोठें तरी सांपडेल काय ? कल्पित सकरुण प्रसंगाचें वर्णन करून **भवभूति** वाचकास पुष्कळ ठिकाणीं द्रवविते, परंतु प्रस्तुत श्लोकांतील त्याची स्वतःचीच खरी स्थिति वाचून जसा हृदयास द्रव येतो तसा वरील कोणत्याही प्रसंगीं येत नसेल !

वरील पद्यें वाचून **कालिदास** व **भवभूति** याचें समकालीनत्व अंमळ संशयाचेंच खरें असें वाचकांस वाटल्यावाचून राहणार नाहीं; कां कीं, ज्याच्या अद्वितीयत्वानें ' अनामिकेचें नाव यथार्थ झालें ' तो कोणीकडे; व ज्याची एकंदर लोकांत कीर्ति होणें तर दूरच, पण कवितेचा नुसता रसज्ञही ज्यास कोणी न भेटल्यामुळें ' **काला**च्या अनंतत्वावर व पृथ्वीच्या विस्तारावर ' काय ती भिस्त ज्यास ठेवावी लागली तो बिचारा काव कोणीकडे !

पण याशिवाय दुसऱ्याही अनेक गोष्टी आहेत, त्यांवरून वरील वादाचा बहुधा निर्णय होतो. त्याही येथें सविस्तर सांगणें अवश्य होय.

**कालिदास** व **भवभूति** हे समकालीन नव्हत असें मानण्यास पहिला मोठा आधार हा कीं, पहिल्याची कीर्ति प्राचीन काळापासून ही आबालवृद्धांत सुद्धां असून दुसऱ्याची केवळ पंडितांत मात्र आहे. **कालिदासा**वर त्याच्या जिवंतपणींही लोकांची इतकी विलक्षण भक्ति जडली होती कीं, त्याचें म्हटलें कीं, सर्वांनीं त्यास अतिशयित मान द्यावा. 'विक्रमोर्वशी' नाटकांत आरंभीं सूत्रधार रूवांस इतकीच विनंति करतो,

**"प्रणयिषु दाक्षिण्यवशादथवा सद्वस्तुबहुमानात् ।**
**शृणुत जना अवधानात् क्रियामिमां कालिदासस्य" ॥**

---

१ मागील निबंध पहा—पृष्ठ ३३.

"हे प्रेक्षक जनहो! या नाटकांत जीं नायक व नायिका आहेत त्यांविषयीं आदरयुक्त बुद्धि धरून, किंवा ही सत्कृति **कालिदासाची** होय हे मनात आणून आमच्या नाट्यप्रयोगाकडे लक्ष द्या."

या सूत्रधारोक्तीत व वरील दोहोंमध्ये केवढा फरक आहे! बरें, जर **कालिदास** स्वत: त्या वेळच्या लोकांस इतका वंद्य होता, तर ज्या कवीची कृति त्यासही शिरसावंद्य झाली तो कवि तर त्यास किती पूज्य असावा! पण असा सुखसोहळा भोगणें बिचाऱ्या **भवभूती**च्या नशीबीं कधींही आलें नाहीं, हें त्याच्या नाटकावरून अगदीं स्पष्ट दिसत आहे.

**भवभूती**स राजाश्रय होता हेंही म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं; कारण तसें असतें तर त्याच्या तिन्ही नाटकाचा प्रयोग कालप्रियनाथाच्या यात्राप्रसंगींच का व्हावा? [1] **कालिदासा**च्या कोणत्याही नाटकाच्या आरंभीं रंगभूमीच्या स्थलाचा उल्लेख नाहीं, यावरून सहज अनुमान होतें कीं, त्याचा प्रयोग राजाच्या दरबारीं वगैरे होत असेल. तसा भाग्योदय **भवभूती**चा कधींही न झाल्यामुळे यात्रादि लोकसमाजांच्या प्रसंगींच आपल्या नाटकाचा प्रयोग त्यानें करविला असावा असें वाटतें. पण याहूनही सबळ प्रमाणे खुद्द नाटकांमध्येंच आहेत. **कालिदासा**च्या सर्व ग्रंथातून संस्कृत भाषेचे शुद्ध व साधें स्वरूप दृष्टीस पडतें. वाक्यांची रचना सरळ, तींत कृत्रिमत्वाचा लेशही नाहीं; तसेंच शब्दही सुबोध असून समास थोडथोड्याच शब्दांचे. **कालिदासा**चे ग्रंथ सारे धुंडाळले तरी चार पांचांवर पदें एका समासांत थोड्याच ठिकाणीं सांपडतील. उदाहरणार्थ 'मेघदूत' काव्यांत पहा. तें मंदाक्रांत या दीर्घ वृत्तात रचलें असतांही त्यातील समास प्राय: लहानलहानच आहेत पण ही भाषेची सरणी **भवभूती**च्या नाटकांतून दृष्टीस पडत नाहीं. **बाण, श्रीहर्ष** इत्यादि पुढील कवींनीं लांब लांब समासाची जी कृत्रिम रचना हळू हळू प्रचारांत आणली

---

१ वरील स्थलाचा उल्लेख प्रस्तुत कवीच्या तिन्ही नाटकांच्या आरंभीं सांपडतो.

तीच त्यांत मधून मधून नजरेस येते तसेंच 'मालतीमाधव' नाटकांत बौद्धमताच्या स्त्रियास मुख्य पात्रांत घातल्या आहेत व कापालिक इत्यादि घोर पंथांचाही संबंध आणला आहे. पण अशाविषयीं यत्किंचित् संबंधही कालिदासाच्या काव्यात कोठेंही आढळत नाही 'मृच्छकटिक,' 'प्रबोधचंद्रोदय,' नागानंद इत्यादि नाटकांत व 'दशकुमारचरित' वगैरे ग्रंथांत मात्र त्या वेळच्या लोकस्थितीचें कांही स्वरूप दृष्टीस पडतें. यास्तव भवभूतीस कालिदासाच्या वेळचा मानण्यापेक्षां वरील ग्रंथ ज्या काळी झाले त्या सुमारास तो होता हें मानणें अधिक सयुक्तिक दिसतें. शिवाय, भवभूतीच्या नाटकांत कालिदासाच्या ग्रंथास अनुलक्षून लिहिलेले व त्यातील काही शब्द घेतलेलेही आढळतात. 'मालतीमाधवा'च्या दुसऱ्या अंकांत--

''कामंदकी । अयि सरले किमत्र मया भगवत्या शक्यम्। प्रभवति प्रायः कुमारिकाणां जनयिता दैवं च । यच्च किल कौशिकी शकुंतला दुष्यंतमप्सराः पुरूरवसं चकमे इत्याख्यानविद आचक्षते । वासवदत्ता च राज्ञे संजयाय पित्रा प्रदत्तमात्मानमुदयनाय प्रायच्छदित्यादि । तदपि साहसकल्पमित्यनुपदे एवायमर्थः।''

या भाषणात 'शाकुंतल' व 'विक्रमोर्वशी' या नाटकांचा व 'मेघदूता'दि ग्रंथांतून प्रसिद्ध जी वासवदत्ता व उदयनराजा यांची गोष्ट तिचा संबंध आणला आहे हें उघड आहे.

तसेंच त्याच नाटकाच्या नवव्या अंकांत मालतीच्या विरहानें वेड झालेला माधव दाखविला आहे. तो अंक 'मेघदूत' व 'विक्रमोर्वशी' नाटकाचा चवथा अंक यांवर धोरण ठेवून कवीनें लिहिला असावा असें कित्येक ठिकाणी भासतें.

'महावीरचरिता'च्या सातव्या अंकांत:—

'' बिभीषणः । देव

एते ते सुरसिंधुधौतदृषदः कर्पूरखंडोज्ज्वलाः

**पादा जर्जरभूर्जवल्कलभृतो "गौरीगुरोः पावनाः"**
त्याच अंकांत पुनः
सुग्रीवः ।** **'उत्खातत्रिभुवनकंटको ऽतिदृप्य-**
**द्दोर्दंडांचितमहिमाप्ययं निकारः ।**
**देव्याश्च प्रतिशमितस्तथात्र संधा**
**निर्व्यूढा प्रगुणविभीषणाभिषेकात् ॥'**

यासारखेंच सादृश्य आणखीही कित्येक ठिकाणीं बारकाईनें पाहूं गेल्यास सांपडेल असें आम्हांस वाटतें.

वरील वाद आमच्या वाचकांस बहुधा रुचणार नाहीं, व मागें सांगितलेल्या मनोवेधक आख्यायिकेच्या विरुद्ध जीं प्रमाणें वर दाखविलीं तीं वाचून त्याचा फार हिरमोड होईल; पण या गोष्टीस इलाज नाहीं. या जगांत सत्यत्व व मनोहरत्व या गुणांचें साहचर्य नेहेमींच आढळतें असें नाहीं; यास्तव ज्यास निवळ सत्यासच धरून चालावयाचें असेल त्यास अनेक प्रसंगीं मनाचा मोठा धडा करून आपल्या अत्यंत प्रिय मतांवर व स्वाभाविक वृत्तींवरही सत्यप्रीत्यर्थ पाणी सोडावें लागतें. आतां जर कोणी असें विचारतील कीं, वरील गोष्ट खऱ्यासारखी दिसत असून तिला अगदीं नवीन बनविलेलीच कशी म्हणावी! व तशीही म्हटली, तर ती रचणाराचा हेतु तरी काय? तर यांवर आमचें उत्तर इतकेंच आहे कीं, हा प्रकार **कालिदास** व **भवभूति** यांच्याच संबंधें किंवा या देशांतच केवळ आढळतो असें नाहीं. मनु-

---

१ कार्या सैकतलीनहंसमिथुनस्रोतोवहा मालिनी
पादास्तामभितो निषण्णहरिणा 'गौरीगुरोः पावनाः'

शाकुंतल ६

**'उत्खातलोकत्रयकंटकेऽपि
सत्यप्रतिज्ञेऽप्यविकत्थनेऽपि ।
त्वां प्रत्यकस्मात्कलुषप्रवृत्ता-
वस्त्येव मन्युर्भरताग्रजे मे ॥

रघुवंश १४

त्याच्या मनाची सर्वत्र अशी प्रवृति दिसून येते कीं, कोणी दोन अति विख्यात मनुष्य असले म्हणजे त्यांची कोणत्या तरी प्रसंगानें सांगड घालून द्यावी. त्यांतूनही ते फार पुरातन असले म्हणजे तर कल्पकांच्या कल्पनाशक्तीस चांगलेंच फावतें. मनुष्यास अत्यंत स्वाभाविक अशी ही मनोवृत्ति सर्व राष्ट्रांच्या आद्यविद्याभूत अशा कथासमूहांत [ ज्यास इंग्रजींत Mythology म्हणतात त्यांत ] फार उत्कृष्ट रीतीनें दिसून येते. ती अशी कीं, मनुष्य अज्ञानदशेंतच असतां ईश्वरदत्त बुद्धीचा जेव्हां हळुहळू त्याचे ठायीं विकास होऊं लागतो, त्या वेळेस चंद्र-सूर्यादि आकाशांतील तेजस्वी पदार्थ, तसेच समुद्र, पर्वत, नद्या इत्यादिकांकडे बघून तो थक्क होतो, व आपणाहून फार वरिष्ठ अशा या सर्व देवताच आहेत अशी पूज्यत्वाची बुद्धि त्याविषयीं त्याचे ठायीं सहज उद्भवते. मग आपले सर्व धर्म त्यांजमध्येंही कल्पून तो त्यांचीं नातीं व परस्पर संबंध जोडूं लागतो. याप्रमाणें एकदां आरंभ झाला म्हणजे पितृपुत्रपरंपरेनें त्याच कथांचा विस्तार होऊन पूर्वोक्त कथासमूह बनतो. हिंदु, ग्रीक, रोमन इत्यादि सर्व राष्ट्रांच्या प्राचीन कथासमूहाचे विषय सृष्टींतील भव्य व रमणीय पदार्थच आहेत. व त्यांची परस्पर तुलना हा अर्वाचीन भाषाभिज्ञांस मोठा मनोरंजक विषय झाला आहे. असो; याप्रमाणे ही मनोवृत्ति मनुष्यास केवळ अंगभूत असून तशीच प्रबलही आहे, व थोर पुरुषांविषयीं लोकांत ज्या गोष्टी चालत आलेल्या असतात त्यांत प्रायः हें बीज बरेंच असते. 'दश-कुमारचरित' नामक ग्रंथाचा कर्ता दंडी, ज्याचें नांव मागें एका श्लोकांत आलें आहे, त्याची व कालिदासाचीही अशीच एक गोष्ट सांगतात. पण तीही पूर्वोक्त कारणांवरूनच केवळ असंभाव्य आहे इतकेंच नव्हे, तर शिवाय अप्रयोजक व ग्राम्यही आहे.[1] आतां परदेशांतील एक उदाहरण सांगतों. ग्रीक लोकांतला प्रख्यात तत्वज्ञ जो सोलन् त्याची व प्राचीन लिडिया देशाचा अमितधनसंपन्न व भाग्यशाली राजा क्रीसस् याचीही एक अद्भुत गोष्ट इतिहासांत प्रसिद्ध

---

१ ही पुढें दंडीच्या निबंधांत सांगण्यांत येईल.

आहे. पण अर्वाचीन इतिहासकार असें म्हणतात कीं, शकाच्या संबंधें या गोष्टीचा चांगला मेळ बसत नाहीं, व या कारणावरून ती गोष्ट सर्व प्रसिद्ध असताही तिला ते प्रमाण मानीत नाहींत. याप्रमाणें या सर्व गोष्टींचा यथास्थित विचार केला असतां संस्कृत भाषेच्या दोघां कविमणींविषयींही त्याच्या कल्पनासृष्टिचतुर राष्ट्रांत वरील चित्तवेधक आख्यायिका परंपरेनें चालत आली आहे यांत नवल काय?

आतां या प्रसंगोपात्त विषयाच्या संबंधें एक मोठ्या महत्त्वाची गोष्ट येथें लिहिणें अवश्य वाटतें ती ही कीं, अशा प्रकारच्या दंतकथा खोट्या तर खऱ्याच, पण खोट्या म्हणून टाकाऊ नव्हेत; उलट विद्वानानीं आदरपूर्वक संग्रह करण्यासच त्या योग्य. कां कीं, एक तर त्या मनोरंजक; व दुसरें असें कीं, वस्तुतः मिथ्या असताही त्यांत सत्याचा एक मोठाच अंश असतो; तो हा की, त्यात एकंदर लोकाचें मत संक्षिप्त रूपानें असते. वरील **भवभूती**विषयींची गोष्ट खरी असती, तर तिजवरून त्याची योग्यता इतकी मोठी दिसून न येती; पण ती अगदीं खोटी आहे यावरून पुढील लोकात त्याची केवढी चहा झाली असावी हें दिसते. जर तो **कालिदासा**च्या वेळेसच असता, तर ज्या लोकानीं 'शाकुंतल' व 'विक्रमोर्वशी' यांची वाहवा केली त्यांनींच 'उत्तररामचरित' व 'मालतीमाधव' यांचीही केली असती यांत कांहीं मोठें विशेष नव्हतें. पण तो कविसिंह गर्जून गेल्यावर जेव्हां पुष्कळ वेळ चोहोंकडे सामसूम झालें, व तशी गर्जना पुनः होणें कठिण असें वाटूं लागलें; तेव्हां पहिल्याची आठवण देणारा, किंबहुना त्याहूनही प्रचंड, असा दुसऱ्याचाही गंभीर नाद ऐकूं येऊं लागला, ही बरीक चमत्कारिक गोष्ट खरी!

वर जो कवीनें आपला वृत्तांत लिहिला आहे व आपल्या काळच्या लोकांचा अधिक्षेप केला आहे, त्यावरून तो आत्मश्लाघादोषास पात्र होतो असें कित्येकांस वाटेल यांत संशय नाहीं. पण अंमळ विचार केला तर ही समजूत सर्वथा चांगली आहे असें थोड्यांसच वाटेल. कवींची वगैरे फार प्रसिद्धि म्हटली म्हणजे त्यांच्या मरणानंतरच होऊं लागते; कारण त्यांच्या जिवंतपणीं त्याचा उत्कर्ष न साहून मत्सर कर-

णारे फार, सारज्ञ असून निर्मल बुद्धीचे असे फारच विरळा. तेव्हां आपणाविषयींचा यथास्थित वृत्तांत लिहून ठेवणारा त्यांस दुसरा कोण मिळणार ? व मिळावा हें शक्यही नव्हे; कारण एकाचें अंतर्गत दुसऱ्यानें कसें लिहावें ! हें सर्व समजूनच कित्येक थोर मनुष्यांनीं स्वचरित्रे लिहून ठेविलीं आहेत, व त्याप्रमाणेंच सर्वांनींही जर ठेविलीं असतीं तर जगास केवढा अमूल्य लाभ होता ! समजा कीं, सध्या इंग्लंड देशांत कोणास शेक्सपीयर कवीचें स्वरचित सविस्तर चरित्र सापडलें, तर त्याच्या प्रती घेण्यास सर्व देशांतील लोकांच्या काय उड्या पडतील ! असो; असा प्रघात पूर्वींपासून असता तर दुसराही एक अनर्थ बराच टळता. तो हा कीं, क्षेपकें नवीन जोडून घालण्यास व दुसऱ्यांचे विचार उपटून आपलेसे म्हणविण्यास जसें क्षुद्र ग्रंथकारांस फावलें तसे फावलें नसतें. यावरून पाहतां महान् ग्रंथकाराचे स्वतः-विषयींचे लेख दूषणार्ह नव्हेत, तर त्यांपासून फार उपयोगही आहे, असें दिसून येईल. इतर संस्कृत कवि व विशेषतः नाटककार, यांनींही आपलीं नांवें बहुधा ग्रंथांत घातलेलीं आढळतात. ' मुद्राराक्षस, ' ' मृच्छकटिक ' इत्यादि नाटकांत व ' कादंबरी ' वगैरे काव्यांत तर त्या त्या कवींनीं आपआपणांविषयीं आरंभीं बरेंच लिहिलेलेंही आढळतें. यास्तव याच संबंधें भवभूतीस दोष देणें अगदीं गैर आहे.[1] आतां हें खरें कीं, कालिदासाचें नांव त्याच्या नाटकांशिवाय बाकी कोणत्याही त्याच्या ग्रंथांत सांपडत नाहीं, व त्यातही जें त्यानें घातलें आहे तें केवळ नाटककारांच्या रीतीस अनुसरूनच होय असें दिसते. पण कालिदासाची गोष्ट अगदीं निराळी होती. त्याच्या काव्यांतून जे त्याचे कांहीं अंगचे गुण झळकतात त्यांत शालीनता प्रमुख आहे खरी; परंतु त्याच्या कृति आधींच सर्वमान्य झाल्यामुळें ती शोभून गेली, व स्वगुणप्रस्तावनेचें जें अश्लाघ्य कर्म त्याचा प्रसंगच मुळीं उडाला. भवभूतीची स्थिति तशी अनुकूल नसल्यामुळें स्वतःविषयीं

---

१ या विषयावर सामान्यतः पुष्कळ विवेचन केलेलें पाहणें असल्यास ' निबंधमाला ' अंक १६ ( गर्व ) हा पहावा.

लिहिणें याशिवाय त्यास दुसरा उपायच उरला नाहीं. तसें तो न करता तर त्याच्या नांवाचा लोप होऊन ग्रंथ बुडण्याचेंही भय होतें; व या भयास्तवच कोठं सगळाले श्लोक, कोठें एक एक दोन दोन चरण, व कोठें नुसते शब्दच, त्यानें तिही नाटकांत सारखे घातले असावे असेंही अनुमान होतें. सारांश, या दोहों कवींची यासंबंधें तुलना करूं गेल्यास चालणार नाहीं. तथापि लोकमान्यतेच्या संबंधानें गुणिजनांच्या ज्या अत्यंत भिन्न अशा दोन अवस्था होतात त्यांचीं उत्कृष्ट उदाहरणें वरील दोन होत; व दोन्हीही मजेचीं असून ध्यानात ठेवण्यास रखीं आहेत. आपल्या सहज लीलांनीच वश झालेल्या युवजनांस पाहून सुंदर कुमारिकाचें लाजेनें खालीं पाहणें जसें चित्तास मोहून टाकतें, त्याप्रमाणेंच अर्भकाचा आपणाविषयीं अनादर पाहून त्यांकडे त्यानीं फेकलेले तिरस्काराचे कटाक्षही मनोहर होणार नाहींत काय ?

**भवभूती**च्या नावानें तीन नाटकेंच काय ती प्रसिद्ध आहेत; तीं ' मालतीमाधव, ' ' महावीरचरित ' व ' उत्तररामचरित ' होत. येवढींच त्यानें मुळीं लिहिलीं, किंवा लिहिल्यांपैकीं इतकींच राहिलीं, याचा इतःपर निश्चय होणें बहुधा अशक्यच होय. तरी इतकें खरें आहे कीं, हीं तिन्ही त्यानेंच रचिलीं. एक तर, त्या सर्वांवर त्याचें नाव आहे म्हणून; व दुसरें कारण नुकतेंच वर सांगितलें आहे कीं, सर्वांत कांहीं श्लोक वगैरे सारखेच सांपडतात. आतां **भवभूतीनें कालिदासा**प्रमाणे काव्येंही लिहिलीं कीं नाहीं हाही वाद सहज उत्पन्न होतो पण याचाही निर्णय करणें वरच्याप्रमाणेंच बहुधा दुर्घट आहे. तरी ' मालतीमाधव ' नाटकाच्या आरंभीं सूत्रधाराच्या भाषणांत

' **भवभूति**माधव ' नाटकाच्या आरंभीं सूत्रधाराच्या भाषणांत

' **भवभूति**नामा कविर्निसर्गसौहृदेन भरतेषु वर्तमानः ' ( **भवभूति** नांवाचा कवि, ज्याचा आम्हां नाटक करणारांशीं स्वभावतःच अत्यंत स्नेह आहे '-- ) असे जे घातलें आहे त्यांत मूळचा कांहीं विशेष अभिप्राय जर असला, तर आपल्या कवीची नाटकांकडे जात्याच प्रवृत्ति होती असें म्हणण्यास आधार होऊन वरील गोष्टीचा कांहींसा उलगडा पडेल. तसेंच त्याच्या नाटकांची आधीं सर्वथा अवज्ञा झाली असूनही

तीं पुढें कांहीं काळानें सर्वोत्कृष्ट ठरलीं, यावरूनही कदाचित् असें अनुमान करतां येईल कीं, भवभूतीचा स्वभावतःच इकडे कल असून आपलें बुद्धिसर्वस्वही त्यानें इकडेच खर्चिलें असावें. असो; एकंदरींत ही गोष्ट संशयात्मकच खरी.

'मालतीमाधव' या नाटकास बाकीच्या दोहोंप्रमाणें पुराणांतील कथेचा आधार नाहीं; त्यांतील गोष्ट केवळ कवीच्या कल्पनेचीच होय. तिचा सारांश येथें सांगतों. भूरिवसु व देवरात हे दोघे मित्र होते. ते आपल्या गुरूजवळ विद्याभ्यास करीत असतां परस्परांचा असा संकेत झाला कीं, आपणास मुलगा व मुलगी अशीं अपत्यें झालीं असतां त्यांचा परस्पर विवाह करावयाचा. पुढे भूरिवसु हा पद्मावतीच्या राजाचा प्रधान झाला, व देवरातासही विदर्भ देशाच्या राजानें आपला दिवाण केला. दैवयोगेंकरून त्यांच्या मनांत होतें तसेंच झालें; भूरिवसूस मालतीनामें कन्या झाली, व देवरातास माधवनामें पुत्र झाला. हीं प्रस्तुत नाटकांतील नायिका व नायक होत. दोघें वयाचीं झाल्यावर कृतसंकल्पाप्रमाणें त्यांचें लग्न व्हावयाचें; पण मध्येंच एक मोठी अडचण येऊन पडली. ती अशी कीं, नंदन नामेंकरून पद्मावतीच्या राजाचा एक आवडता सचिव होता; त्यानें मालतीकरितां तिच्या बापाकडे राजाकडून मागणी घालविली. भूरिवसु मोठ्या चिंतेंत पडला, व आतां तोड कोणती काढावी हें त्यांस कांहीं सुचेना. या संकटसमयीं त्याची पूर्वीची गुरुबहीण कामंदकी, जिच्या समक्षच अपत्यसंबंधाविषयीं दोघा मित्रांचें बोलणें झालें होतें, तिनें त्याचें कार्य आपल्या अंगावर घेऊन तें मोठ्या चातुर्यानें तडीस नेलें. तिनें आपलें अंग न दाखवितां आपल्या दासीकडून माधव व मालती यांचें अनेक प्रसंगांवरून प्रथमतः परस्परांवर प्रेम जडविलें. मग एके दिवशीं मालतीच्या समाचारास म्हणून जाऊन तिनें सहज माधवाची गोष्ट काढिली, आणि त्याच्या गुणांचें वर्णन करून त्याचा कुलवृत्तांतही प्रसंगवशात् मालतीस कळविला. तेणेंकरून माधवाच्या कुलीनतेबद्दलचा मालतीचा संशय फिटून तिचा त्याविषयींचा पूर्वीचा अनुराग फारच दृढ झाला, व दुसरा वर जो नंदन त्याविषयीं द्वेष होऊन आपल्या

बापाची केवळ स्वार्थावरच दृष्टि आहे असा तिच्या मनांत संशय आला. पुढें मालतीचा नंदनाशीं विवाह ठरून तिचें माधवावरील प्रेम तिला जन्मभर हृदयशल्य होण्याचा रंग दिसूं लागला. माधवासही असा आशाभंग झाल्यामुळें सर्व जग शून्य भासूं लागलें. इकडे उभय पक्षांची लग्नसमारंभाची सर्व तयारी झाली,—पण इतक्यात चामुंडो-पासक कपालकुंडलेनें आपला गुरु जो अघोरघंट त्याच्या मंत्रसिद्धीस्तव देवीस बळी देण्याकरिता मालतीस उचलून आकाशमार्गानें नेलें. ती आपल्या वाड्याच्या उंच मजल्यात निजली होती, आणि आतां जागी होऊन पाहते तो आपणास बळी देण्यास सिद्ध केलें आहे! तिनें मोठ्यानें किंकाळी फोडिली,—ती, माधव निराशेनें उदास होऊन स्मशानात फिरत होता त्याच्या कानीं आली. मग मोठ्या त्वरेनें तो चामुंडेच्या देवळांत गेला, आणि अघोरघंटाचा वध करून त्यानें माल-तीस सोडविलें. इतक्यात वाड्यांतही मालती नाहींशी झाल्याचा बोभाट झाला होता, व लोक चोहोंकडे शोधास लागले होते. मग ती या देवळांत सांपडल्यावर लग्नाचा थाट निघाला. कामंदकीनें माधव व त्याचा मित्र मकरंद यांस ग्रामदेवतेच्या देवळांत लपवून ठेवून, तिला वंदन करण्याकरिता मालतीस तेथे आणावी असें सांगून ठेविलें होतें. त्याप्रमाणें मोठ्या परिवारासह मालती, वाजत गाजत देवीच्या दर्शनास आली. मग देवळांत गेल्यावर तिची अत्यंत प्रिय सखी लवंगिका हिच्या गळीं पडून मालती माधवाचे गुण व उपकार आठवून रडूं लागली; आणि प्राणत्यागाचा निश्चय करून त्याविषयीं तिनें अनु-मोदन द्यावें म्हणून तिच्या पायांही पडूं लागली. इतक्यात लवंगिकेनें खुणाविल्यावरून माधव तिच्या जागीं येऊन उभा राहिला. तरी मालतीचे डोळे पाण्यानें भरून आले असल्यामुळें तिला काहींही संशय आला नाहीं. शेवटीं तिनें माधवास लवंगिकाच समजून मिठी मारली, आणि आपल्या मनांतील सर्व हितगुज त्यास सांगितलें; आणि ही माधवानें गुंफिलेली बकुलमाला मालतीच्या जीविताची खूण म्हणून त्वां निरंतर आपल्या हृदयाशीं वागवावी अशी विनवणी करून तिच्याच गळ्यांत आपल्या बुद्धीनें तिनें ती माळ घातली. पण वर

पाहतांच माधवास ओळखून ती चपापली व लाजून मागें सरली. इतक्यांत कामंदकी आंत येऊन, तिनें मालतीस व माधवास आपल्या मठाकडे चोर वाटेनें लावून दिलें. तेथें अवलोकिता नामक आपल्या शिष्यिणीकडून तिनें अगोदरच लग्नाचें साहित्य करून ठेविलें होतें. इकडे मालतीचा साज मकरंदावर घालून त्यास कामंदकीनें भूरिवसूच्या वाड्यात नेलें, व कोणासही संशय येऊं न देतां त्याचा नंदनाशीं विवाह केला. नंदनाची मदयंतिका म्हणून बहीण होती; व तिचें प्रेम मकरंदावर आधींच जडलें असून, वाघाच्या तडाक्यांतून तिला त्यानें अकस्मात् सोडवल्यापासून तर तें फारच दृढ झालें होतें. तिची व मकरंदाची गांठही याच संधीस चमत्कारिक रीतीनें पडली आहे. नंतर कृतसंकेताप्रमाणें तीं दोघं, लवंगिका व कामंदकीची दुसरी शिष्यीण बुद्धरक्षिता अशीं चौघें मध्यरात्रीं वाड्यात चोहोंकडे सामसूम झालेलें पाहून मठाकडे चोरून निघालीं. पण वाटेनें नगरच्या रखवालदारानीं त्यास अडवलें; तेव्हां मकरंदानें तिघा स्त्रियास माधवाचा हुजऱ्या कलहंसक याच्या बरोबर मठाकडे लावून देऊन आपण एकटा त्याशीं मारामारी करीत राहिला. पुढें माधवही तें वर्तमान ऐकताच आपल्या मित्राच्या साह्यास आला. दोघानीं रखवालदार पुष्कळ असतांही त्यांचा अगदीं मोड केला. तो त्यांचा पराक्रम पाहून नगरच्या राजानें त्यांस बहुमानानें आपणाकडे बोलाविलें, आणि त्यांचा सगळा वृत्तांत ऐकून घेऊन, नंदन व भूरिवसु यांनीं आपली बहीण व आपली कन्या अशा अनुक्रमें त्यास द्याव्या असें ठरविलें. याप्रमाणें राजसत्कार पावून मोठ्या आनंदानें माधव व मकरंद कामंदकीच्या मठाकडे आले; पण पाहतात तों मालती नाहीं. लवंगिका वगैरे तिच्या सख्या दूर झाल्याशा पाहून कपालकुंडलेनें तिला अकस्मात् उचलून नेलें होतें; व माधवाचा सूड उगवण्याकरतां तिला ती मारणार इतक्यांत त्याच श्रीपर्वतावर कामंदकीची एक पुरातन शिष्यीण सौदामिनी नामेंकरून तपश्चर्या करीत होती, तिनें मध्यें पडून तिला सोडविलें. इकडे माधव, मालतीच्या विरहानें वेडा होऊन मकरंदासहवर्तमान तिच्या शोधार्थ रानोमाळ फिरूं लागला. फिरतां फिरतां दुःखभार सहन न होऊन

त्यास मूर्च्छा आली, तेव्हां मकरंदास जिवाचा अतिशयित त्रास येऊन तो कडयावरून खालीं नदींत उडी टाकावयास सिद्ध झाला. तों सौदामिनी योगबलेंकरून तेथें प्रकट झाली, आणि मकरंदाचें निवारण करून तिनें मालतीच्या जीविताची खूण जी बकुलमाला ती मकरंदास दाखविली इतक्यांत वाऱ्याची गार झुळूक सुटून माधवही सावध झाला, व उन्मादभरांत वायूची प्रार्थना करावयास लागून तो अंजलि करून उभा राहिला. तों सौदामिनीनें तो योग्य प्रसंग जाणून त्याच्या हातांत ती माला अकस्मात् टाकली माधवाने ती तत्क्षणीं ओळखली, व तेणेंकरून त्याच्या चित्तास धीर आला पुढे सौदामिनी प्रकट होऊन तिने मालतीचें वर्तमान त्या दोघांस सांगितलें शेवटीं कामंदकी, भूरिवसु व लवंगिकादि मालतीच्या सख्या, यासहां मालतीचा कोठेंच थांग न लागल्यामुळें अत्यंत दुःख झालें होतें, त्याचेंही सौदामिनीनें आश्वासन केलें, व मालतीस आणून भेटविली. नंतर सर्वांस मोठा आनंद होऊन दोन्ही वधूवरांच्या लग्नांचा सोहळा झाला

याप्रमाणें प्रकृत नाटकाचें सविधानक होय. हे बरेच लांब असूनही अगदीं सरळ आहे; फार आढवेढे घेतल्याने जसें एखादें बिकट झालेलें असतें तसें नव्हे. शिवाय, यातील प्रसंग इतके चमत्कारिक व विचित्र कल्पिले असतांही ते परस्परांशीं लवमात्रही विसंगत नाहींत. मूळचा कांहीं आधार नसून भवभूतीनें अशी सुंदर गोष्ट रचली, यावरून त्याच्या अंगीं कल्पकता गुण मोठा असावा असें वाटतें; तसेंच कापालिक पंथाचीं दोन पात्रें मध्यें घालून त्यांचा एकंदर संविधानकाशीं एकमेळ करून दिला आहे, इत्यादि गोष्टींवरून त्याचें चातुर्यही दिसून येतें. पात्रांचे स्वभाववैचित्र्य ढळढळीत रीतीनें दाखविणें हें अंग संस्कृत नाटकांत, किंबहुना एकंदर संस्कृत कवितेंतही कमी; फार तर काय, पण नाटकांत ' वेणीसंहार ' व काव्यांत ' महाभारत ' यांखेरीज उक्त गुण इतरत्र कोठेंही पूर्णपणें दृष्टीस पडत नाहीं असें म्हटलें असतां चालेल. प्रस्तुत नाटकांतही तो गुण विशेष म्हणण्यासारखा अर्थात् नाहींच; तरी प्रत्येक पात्राच्या ठायीं त्याच्या त्याच्या मानानें जे जे गुण असावेत ते ते उत्कृष्ट रीतीनें दाखविले आहेत. माधव व मकरंद

यांचें शौर्य व परस्पर स्नेह; मालतीचा गंभीर स्वभाव व कुलाभिमान; लवंगिका, बुद्धरक्षिता व अवलोकिता यांचे भाषणपटुत्व; कामंदकीचा प्रौढपणा व चातुर्य; तसेंच अघोरघंट व कपालकुंडला यांचें क्रूरत्व हे सर्व गुण यांत पूर्णपणें उतरले आहेत यांतील मुख्य रस फार करून शृंगार आहे; तरी बहुतेक नाटकांतून जितका तो स्पष्ट व उद्दाम असतो तितकाही यांत दाखविला नाहीं. तो अगदीं नाजुक तऱ्हेचा असून मोठ्या प्रौढतेचा असा आहे. पहिल्या अंकांत मालतीची मदनोद्यानांत दृष्टादृष्ट झाल्यामुळें माधवास प्रथमतः कामविकार होऊन झालेला सर्व वृत्तांत तो मकरंदास सांगतो आहे, तो प्रसंग; सहाव्यांत मालतीस गहिंवर येऊन तिनें लवंगिकेच्या भ्रांतीनें माधवास आलिंगन दिलें व नंतर त्यास पाहून लाजली, तें; तसेच आठव्याच्या आरंभींचा खुबीदार शृंगाराचा चुटका; हीं वरील गोष्टींचीं उदाहरणें होत. पण याहूनही पांचव्या अंकांतील प्रसंग कवीनें फारच चातुर्यानें घातला आहे. त्यांत भयानक, अद्भुत, वीर व करुण हे भिन्न भिन्न रस एकवट झाले आहेत, व त्यांत शृंगाराचाही जो भाग आहे तो उदात्तरूप असून अत्यंत शुद्ध आहे. निरनिराळ्या रसांची अशी एकात्मता फारच थोड्या ठिकाणीं सांपडेल यांत संशय नाहीं. मालतीचा नंदनाशीं विवाह ठरला तेव्हां माधव निराश होऊन त्याच्या मनाची जी स्थिति झाली ती, तसेच कपालकुंडलेनें तिला उचलून नेल्यावर तिचा विरह दुःसह होऊन जें त्यास अतिशयित दुःख झालें, तेंही त्या त्या प्रसंगांच्या हृदयोद्गारांनीं उत्कृष्ट दाखविलें आहे. बीभत्सरसाचेंही या नाटकांत एक प्रसिद्ध उदाहरण आहे. जेव्हां माधव निराश होऊन स्मशानांत संध्याकाळच्या समयीं फिरत होता, त्या वेळेस पिशाचांच्या चेष्टा त्याच्या दृष्टीस पडल्या त्याचें तो वर्णन करीत आहे, तें तें होय. याप्रमाणें बहुधा सगळे रस कवीनें यांत आणले आहेत, व त्यांचा परिपाकही तसाच उत्कृष्ट उतरला आहे. मध्यें मध्यें कोठें कोठें वर्णन आहे तेंही सुंदर आहे, व विशेषतः नवव्या अंकांत सौदामिनी आकाशमार्गानें चालली असतां पद्मपुराजवळील वनश्रीचें वर्णन करते आहे, तें तर फारच बहारीचें आहे. या नाटकांत रचनेच्याही संबंधें एक विशेष

लक्षांत ठेव ण्यासारखा आहे, तो इतर थोड्याच नाटकांत सांपडतो संस्कृत काव्यविषयक ग्रंथांत नाटकांत अंक अमुकच असावे असा निर्बंध नाहीं; यास्तव इंग्रजी नाटकाप्रमाणें त्यांत पांचच अंक नेहेमीं नसून ते दहांपर्यंतही क्वचित् आढळतात. तसेंच सांप्रत नाटकांत आहे; व बाकीच्या दोहोंत नसून यांतच हा विशेष असण्याचें कारणही उघड आहे. तें हें कीं, संविधानक फार लांब पडलें; तेव्हां सुद्धा सातच अंकांत तें आटपायासारखें नव्हतें. तरी या नाटकाचा प्रयोग करूं गेल्यास त्यास नेहेमींपेक्षा ज्यास्त वेळ लागेल असें वाटत नाहीं; कारण पृष्ठांच्या मानानें पाहतां तें इतरांयेवढेंच सुमारें आहे.

'महावीरचरित' हे नाटक रामायणाच्या सर्वप्रसिद्ध कथेवर रचलें आहे. तरी त्यांतील कथानकाहून याचें संविधानक फारच निराळें बांधलें आहे, यास्तव तें येथें संक्षेपानें सांगतों विश्वामित्र दशरथाकडे जाऊन यज्ञविघ्ननिवारणार्थ राम व लक्ष्मण यांस आपल्या आश्रमास घेऊन आला. त्यानें जनकराजासही यज्ञसमारंभ पाहण्यासाठीं निमंत्रण केलें होतें, पण त्यास स्वतः येण्यास न फावल्यामुळें त्यानें आपला भाऊ कुशध्वज व कन्या सीता आणि ऊर्मिला अशा तिघांस तिकडे पाठवून दिलें. याप्रमाणें प्रथमतः विश्वामित्राच्या आश्रमांत या दोन राजपुत्रांची व राजकन्यांची गांठ पडली. इतक्यांत रावणाकडून एक राक्षस कुशध्वज व विश्वामित्र यांकडे सीतेविषयीं मागणी घालण्याकरितां आला. त्याचें स्वागत करून त्यांनीं त्यास तेथें बसविलें: तों ताटकेचा भयंकर शब्द ऐकूं आला. तेव्हां विश्वामित्राच्या आज्ञेवरून रामानें तत्क्षणीं तिचा वध केला. पुढें कुशध्वजानें शिवधनुष्यही तेथें आणविलें. तेंही रामानें मोडल्यावरून त्या दोन्ही कन्या राम लक्ष्मण यांस अनुक्रमे द्याव्या असा संकेत ठरला. इतकें झाल्यावर रावणाकडील राक्षस भयचकित व निराश होत्साता चालता झाला, व लंकेस पोंचल्यावर त्यानें झालेला वृत्तांत रावणाचा आजा व अमात्य जो माल्यवान् त्यास सांगितला. तो ऐकतांच माल्यवानास मोठी चिंता लागली, व तेव्हांपासून रामाचा घात करण्याविषयीं तो नाना उपाय योजूं लागला. प्रथमतः महेंद्रद्वीपास जाऊन त्यानें परशुरामास शिवधनुष्याचा

वृत्तांत सांगितला, व त्याबद्दल रामाचा सूड उगविण्याविषयीं त्यास उत्तेजन दिलें. परशुरामही परम क्रुद्ध होऊन मिथिला नगरीस आला. तेव्हां रामाशीं युद्ध न करण्याविषयीं विश्वामित्र व वसिष्ठ त्याची विनंति करूं लागले, पण तो कांहीं केल्या आपला आग्रह सोडीना. तें पाहून जनकाचा पुरोहित शतानंद फार संतापला, व दोघांची बोलाचाली होऊन शतानंद परशुरामास शापोदकानें भस्म करणार इतक्यांत दशरथराजानें त्याचें निवारण केलें. पुढें रामानेंच स्वतः येऊन परशुरामास युद्धास बोलाविलें, व दोघांचा समरप्रसंग होऊन परशुराम पराभव पावला. याप्रमाणें माल्यवानाची पहिली मसलत फसल्यावर त्यानें पुनः दुसरा बेत मांडला; तो असा कीं, शूर्पणखेस मंथरेच्या शरीरांत संचार करावयास सांगून तिजकडून रामास वनांत घालविण्याविषयीं कैकेयीची बुद्धि फिरविली; व विराध, खर इत्यादिकांस रामाचा नाश करण्याविषयीं ताकीद देऊन वानरांचा राजा जो वाली त्यासही अनुकूल करून घेऊन तेंच सांगितलें. इकडे परशुरामानें शस्त्रसंन्यास करून दंडकारण्यातील मुनिजनांचें राक्षसांपासून रक्षण करण्याचा अधिकार रामाकडे सोंपविला, व आपण तपश्चर्येस निघाला. रामानेंही तो मोठ्या आनंदानें पत्करला, व त्यामुळेंच कैकेयीनें दिलेल्या वनवासाचें त्यास यत्किंचितूही दुःख वाटलें नाहीं. दंडकारण्यांतील खरदूषणवधादि वृत्तांत, तसेंच सीतेचें हरण, हें सर्व जटायु व संपाति यांच्या भाषणांत सुचविलें आहे. पुढें राम व लक्ष्मण हे दोघे अरण्यांतून सीतेचा शोध करीत फिरत असतां बिभीषणाकडून श्रमणा नांवाची एक स्त्री त्याचा लेख घेऊन आली, त्यांत त्यानें रामाचा आश्रय मागितला होता. रामानें तो लेख मान्य केला, व सीतेविषयीं तुला कांहीं बातमी आहे काय असें तिला विचारलें. तिनें इतकेंच सांगितलें कीं, सीतेनें एक वस्त्र खालीं टाकलें तें सुग्रीव बिभीषण, हनुमान् इत्यादिकांनीं तुमच्या स्नेहास्तव आपणांपाशीं ठेवलें आहे. हें समजतांच दोघे किष्किंधानगरीकडे चालले. पुढें रामाचें व वालीचें युद्ध होऊन वालीनें मरणसमयीं सुग्रीव व अंगद यांस राज्याधिकार देऊन रामाचें व सुग्रीवाचें अग्निसाक्षिक सख्य करविलें. यानंतर झालेल्या लंकादहनादि

गोष्टी नाटक संप्रदायाप्रमाणें कोठें पडद्यामागील भाषणांत, कोठें पात्रांच्या भाषणांत वगैरे सुचविल्या आहेत; व थोरल्या युद्धप्रसंगाचें इंद्र व चित्ररथ यांच्या संभाषणाच्या रूपानें वर्णन केलें आहे. शेवटल्या म्हणजे सातव्या अंकात आरंभीं लंका शोकाकुल होत्साती आली आहे, व नंतर अलका म्हणजे कुबेराच्या नगरीची देवता येऊन तिचें सांत्वन करिते. शेवटीं पुष्पक विमानांत राम, सीता, लक्ष्मण व सुग्रीवबिभीषणादि बसून अयोध्येकडे निघाले आहेत, व वाटेनें राम निरनिराळ्या प्रसंगींचा पूर्वी घडलेला वृत्तात सीतेस निवेदन करीत आहे. नंतर अयोध्येस पोंचल्यावर भरताची भेट होऊन रामास राज्याभिषेक झाला.

वरील संविधानकावरून सहज दिसून येईल कीं, प्रकृत नाटकास रामायण केवळ आधारभूत मात्र आहे, वरकड सर्व रचना केवळ कवीच्याच कल्पनेची होय. मूळच्या कथेंत व साप्रतच्या संविधानकात पहिला मोठा भेद असा आहे कीं, परशुरामाशीं व वालीशीं जें रामाचें युद्ध झालें, तसेंच त्यास वनवासात जावें लागलें, इत्यादि गोष्टी स्वतंत्रपणें घडल्या असताही, त्याचा घाट माल्यवानानें कपटानें घातला असें येथें कल्पिलें आहे. व असें आपल्या चतुर कवीनें का केलें याचें कारणही आमच्या सुज्ञ वाचकाच्या मनात तेव्हांच आल्यावाचून रहाणार नाहीं तें हें कीं, वरच्यासारख्या गोष्टी कितीही पुष्कळ असल्या तरी त्याचे पृथक् वर्णन काव्यात केलें असता चालतें; पण त्या परस्पराशीं असंबद्ध असल्यामुळें व नाटकाचें मुख्य पर्यवसान,–जसें येथें रामरावणयुद्ध-त्यावर त्याचें धोरण मुळींच नसल्यामुळें, त्या नाटकात तुटक तुटक दिसतात; आणि नाटकाचा प्रधान गुण जें वस्त्वैक्य[1] त्याचा भंग होतो याप्रमाणेंच दुसरेही फेरफार जे कवीनें केले आहेत ते असेच समंजस प्रकारचे आहेत. विश्वामित्र ताटकेस पाहून भ्याला, रावण शिवधनुष्य उचलून त्यास प्रत्यंचा चढवीत असता उलथून पडला, परशुराम क्रुद्ध होऊन आला असतां दशरथाची भयानें गाळण झाली, इत्यादि गोष्टी मनास प्रशस्त

१ ( Unity of Action ), नाटकाच्या संविधानकात जें कृत्य असतें त्यास ‘ वस्तु ’ अशी सस्कृत पारिभाषिक संज्ञा आहे त्याचें ‘ ऐक्य ’ म्हणजे सर्व भागांचा एकमेकाशीं मेळ.

वाटणाऱ्या नव्हेत, यास्तव त्यांचा प्रसंगच मुळीं उडवून कवीनें निराळीच रचना केली आहे. परशुरामाचा स्वभावही जसा निर्दय व अत्युग्र दाखविलेला असतो तसाच केवळ येथें दृष्टीस न पडतां बराच सौम्य दिसतो. तसेंच वाली व सुग्रीव यांचें वैर, त्यांतून पहिल्याचा दांडगेपणा, व त्याशीं रामानें केलेले कपट, या गोष्टींचाही या नाटकांत मागमूस देखील बिलकूल दिसत नाहीं. याप्रमाणें नाटककारांच्या सांप्रदायास अनुसरून **भवभूतीनें** संविधानकाचा चमत्कार करण्याकरितां व पात्रांचे ठायीं उदात्तशीलता दाखविण्याकरितां मूळची रामायणांतील कथा आपणास हवी तशी पुष्कळ ठिकाणीं बदलली आहे.

प्रस्तुत नाटकाच्या नांवाप्रमाणें त्यांत वीररसच मुख्यतः आहे व आरंभीं सभासदपेक्षित गुणांचें वर्णन करीत होत्साता सूत्रधारही तसेंच म्हणतो,

**महापुरुषसंरंभो यत्र गंभीरभीषणः ।**
**प्रसन्नकर्कशा यत्र विपुलार्था च भारती ॥**
**अप्रकृतेषु पात्रेषु यत्र वीरः स्थितो रसः ।**
**भेदैः सूक्ष्मैरभिव्यक्तैः प्रत्याधारं विभज्यते ॥**

" अभिनय करावयाच्या पुढील नाटकांत महापुरुषांचा गंभीर व भयंकर असा आवेश दाखविलेला असावा; भाषणें स्पष्ट, उद्दाम व खुबीदार असावीं; पात्रें उंच पदवीचीं असून त्यांचेठायीं वीररस स्फुरत असावा, व तो त्या त्या पात्रांत त्यास शोभेल इतक्या बेताचा असावा. "

या प्रस्तावनेप्रमाणेंच यांतील सर्व गुण आहेत. कांहीं थोड्या ठिकाणीं मात्र शृंगाररसाची झांक आहे. याखेरीज इतर कोणताही रस ' महावीरचरितां ' त फार करून नाहींच म्हटलें असतां चालेल.

या नाटकांतील पात्रांच्या स्वभावांचें वर्णन येथें केलें पाहिजे असें नाहीं; कारण तीं सर्व प्रख्यातच आहेत. पुराणप्रसिद्ध किंवा इतिहासप्रसिद्ध कथेवर नाटक लिहिणारास येवढी गोष्ट आयती सांपडते कीं, वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या ठायीं ज्या मनोवृत्ति त्यांस उभ्या करावयाच्या असतात त्या अगोदरच त्यांचे ठायीं सिद्ध असतात. इतकेंच

मात्र कीं, संविधानक अप्रयोजक रीतीनें जुळून किंवा पात्रांचीं भाषणें त्यांस न शोभण्यासारखीं घालून, मूळच्या गोष्टीची रसहानि त्यानें करतां कामा नये, त्याच्या अंगीं तसें चातुर्य असल्यास तीच गोष्ट त्यास सुधारतांही येते; व हा शेवटला प्रकार सांप्रत नाटकांत भवभूतीनें कोठकोठें व कसकसा केला आहे हें वर सांगितलेंच आहे. असो; प्रकृत नाटक कवीच्या कल्पनेप्रमाणेंच उत्कृष्ट उतरलेंही आहे. यास्तव अमुकच भाग उत्तम असा निर्देश करणें अशक्य होय. तथापि काहीं स्थलाचें अंमळ विशेष वर्णन करणें अवश्य आहे. पांचव्या अंकाच्या आरंभींचा जटायु व संपाति यांचा प्रवेश; तसेंच शेवटल्या अंकांत राम, सीता वगैरे पुष्पक विमानांत बसून सूर्यमंडळासन्निध गेलीं, व पूर्ववृत्तांतस्मारक अशा दंडकारण्यावरून अयोध्येस परत आलीं, तो प्रसंग; हीं दोन्ही भव्य व उदात्तरसभरित आहेत. सहाव्या अंकांत सातोविषयीं सोत्कंठ होत्साता रावण आला आहे; मग मंदोदरीस येतांना पाहून त्यानें आपली मुद्रा छपविली, व तिनें सांगितलेल्या सेतुबंधाच्या वृत्तांताचा उपहास करून तिचें आश्वासन केलें; पुढें त्याचा सेनापति प्रहस्त येऊन त्यानें राम सैन्यासकट समुद्र तरून लंकेवर चाल करून आला हें वर्तमान रावणास स्पष्ट दोनदां सांगितलें असतांही त्यानें धुंदींत ऐकलेंच नाहीं; इत्यादि गोष्टी मोठ्या चातुर्यानें घातल्या आहेत. त्यावरून रावणाचा गर्व, संकटाविषयीं उन्मादपूर्वक अनास्था व अप्रासंगिक कामातुरत्व हीं अगदीं रेखल्यासारखीं स्पष्ट दिसून येतात.

'उत्तररामचरित' हें **भवभूतीचें** तिसरें नाटक होय. याची मागील दोहोंपेक्षांही विशेष ख्याति असून कोणी कोणी तर यास सर्व संस्कृत नाटकांत उत्तम लेखितात. **कालिदासा**विषयीं याच नाटकाच्या संबंधानें जी आख्यायिका परंपरेने चालत आली आहे, ती नुकती वर सांगितलीच आहे; तीवरून **भवभूती**स संस्कृतज्ञ पंडितांत केवढा मान आहे हें स्पष्ट दिसून येत. हें नाटक मागील 'महावीरचरिता'स उत्तरभागरूप आहे. मागच्यांत रामायणकथा रामाच्या अभिषेकापर्यंत असून यांत ती बहुधा शेवटपर्यंत नेली

आहे, तरी 'महावीरचरिता'प्रमाणेंच यांतही मूळच्या कथेपेक्षां पुष्कळ ठिकाणीं फेरफार केले आहेत. ते पुढील संविधानकावरून सहज लक्षांत येतील.

राम राज्यावर बसून कांहीं काळ लोटल्यावर ऋष्यशृंगानें द्वादश-वार्षिक सत्र आरंभिलें. ऋष्यशृंग हा, रामाची बहीण शांता हिचा नवरा यानें बोलावल्यावरून रामाच्या तिघी आया, वसिष्ठ व अरुंधती, अशीं राजकुलांतील वडील माणसें तिकडे गेलीं. जनकराजा राम व सीता यांस भेटण्याकरितां अयोध्येस येऊन कियेक दिवस राहिला होता तोही नुकताच परत मिथिलेस गेला. त्यामुळें जानकीस खेद झालेला पाहून तिच्या करमणुकीस्तव रामानें आपल्या सर्व वृत्तांताचा चित्रपट तयार करविण्यास लक्ष्मणास सांगितले होतें. तो घेऊन लक्ष्मण आला, व तीं चित्रें अनुक्रमेंकरून तो दाखवीत असतां रामास त्या त्या वृत्तांताच्या स्मरणानें पूर्वानुभूत हर्ष, विरह, शोक इत्यादि मनोवृत्तींचा पुनः एकवार पहिल्याप्रमाणे अनुभव घडला. याप्रमाणे पाहतां पाहता दंडकारण्यांतील गोष्टीपर्यंत जेव्हां आलें, तेव्हां रामास जानकीवियोगाचे स्मरण असह्य होऊन त्यानें लक्ष्मणास थांब म्हणून सांगितलें, सीतेस तीं विचित्र वनशोभा पाहून गर्भारपणामुळें असा डोहाळा झाला कीं, भागीरथीच्या पवित्रतीरीं जाऊन तेथील वनांत रहावें. मग तिची ती इच्छा पूर्ण करण्यास रामानें लक्ष्मणास रथ तयार करण्यास सांगितलें. लक्ष्मण तिकडे गेल्यावर सीता चित्रदर्शनानें परिश्रांत होऊन रामाचा हात उशाशीं घेऊन निजली. इतक्यांत दुर्मुख नांवाचा रामाचा गुप्त बातमीदार आला. त्यास रामानें लोक आपणाविषयीं काय बोलतात असें विचारल्यावरून सीतेविषयींचा भयंकर लोकापवाद त्यानें त्याच्या कानांत सांगितला. तो ऐकतांच राम मूर्छित झाला, पण पुनः सावध होऊन निरुपायास्तव त्यानें सीतेस अरण्यांत सोडण्याविषयीं निश्चय केला. मग त्या क्रूर संकल्पाप्रमाणें करण्यास त्यानें दुर्मुखाकडून गुप्तपणे लक्ष्मणास सांगवलें. यानंतर यापुढील पुष्कळ वृत्तांत,—म्हणजे कुश व लव हे जुळे मुलगे गंगेनें स्वतः आणून वाल्मीकीच्या स्वाधीन केले; ब्रह्मदेवानें वर दिल्यावरून

तो आद्यकवि रामायण रचावयास लागला; वसिष्ठ अरुंधती व रामाच्या आया इतकीं जणें सत्रसमाप्तीनंतर वाल्मीकीच्या आश्रमांत येऊन राहिलीं; रामानें अश्वमेधास आरंभ करून घोडा सोडला, व त्याबरोबर सेनेसहवर्तमान लक्ष्मणाचा मुलगा चंद्रकेतु याची योजना केली—हा सर्व, वासंती नांवाची [1]जनस्थानांत राहणारी वनदेवता व वाल्मीकीच्या आश्रमांत राहणारी तापसी आत्रेयी यांच्या परस्परसंवादांत सुचविला आहे. आत्रेयीनें शेवटीं हेंही सांगितलें कीं, शंबूकनामक शूद्र या पंचवटीत स्वधर्माविरुद्ध तपश्चरण करून लोकांच्या अकालमरणादि अनर्थांस कारण होत आहे असें आकाशवाणीनें सांगितल्यावरून राम त्यास दंड करण्याकरितां इकडे लवकरच येणार आहे त्याप्रमाणें राम येऊन त्यानें शंबूकाच्या वध करताच तो दिव्य देह धारण करून प्रगट झाला. पुढें शंबूकाच्या भाषणावरून तें दंडकारण्य होय असें रामास समजून तो पूर्ववृत्तात आठवून तेथील शोभा पाहूं लागला. नंतर अगस्त्याच्या आश्रमाकडून बोलावणें आल्यावरून त्या ऋषीच्या दर्शनास तिकडे गेला. तिकडून परत अयोध्येकडे जातांना रामानें आपलें पुष्पक विमान पुनः त्या दंडकारण्यात थाबविले, कीं पूर्वींचीं स्थळें पाहून सीताविरहाचे दुःख अमळ हलकें करावें. परंतु तसें न होतां जनस्थानाच्या दर्शनानें त्याचें वियोगदुःख अधिकच जागृत मात्र होऊन त्यास मूर्छा आली. हा होणारा अनर्थ गंगेनें आधींच जाणून त्याच्या निवारणाचा उपायही योजून ठेविला होता. तो हा कीं, आपल्या प्रभावानें सीतेस अदृश्य राहण्याची शक्ति देऊन तमसेस तिजजवळ ठेविली होती. यास्तव राम मूर्छित पडताच सीता अदृश्यरूपानें त्याजवळ गेली. आणि तिच्या हाताचा परिचित स्पर्श होतांच राम सावध झाला. पण डोळे उघडून पहातो तों जवळ कोणी नाहीं. तेव्हां फार खेद होऊन त्यास वाटलें कीं, सीतेच्या निदिध्यासामुळें मला ही उगीच भ्रांति झाली. इतक्यांत वनदेवता वासंती धाबऱ्या धाबऱ्या रामाकडे आली;

---

१ सांप्रत ज्यास 'नाशिक' म्हणतात त्याच्याच भोंवतालच्या प्रदेशास प्राचीन काळीं 'जनस्थान' असें म्हणत असत.

आणि सांगूं लागली कीं, सीतेनें पूर्वी ज्यास आपल्या हातानें वाढविलें त्या तरुण लहान हत्तीवर एक मोठा दुसरा हत्ती घाला घालीत आहे. तेव्हां त्यास सोडविण्याकरितां राम त्वरेनें तिकडे गेला. पण पहातो तों तोच जय पावून आपल्या स्त्रीसहवर्तमान खुशाल जलविहार करीत आहे. याप्रमाणेंच इतर पशुपक्षीहि पूर्वीच्या परिचयाचे त्यानें पाहिले, व वासंतीनें पूर्वीच्या अनेक प्रसंगांचें रामास स्मरण दिल्यामुळें त्या त्या औत्सुक्यादि वृत्ति त्याच्या मनांत उठल्या. बोलतां बोलतां सीतेविषयींही गोष्ट काढून तिचा परित्याग केल्याबद्दल वासंतीनें केवळ हृदयभेदक अशा शब्दांनीं रामाचा उपालंभ केला. रामासही सीतेचा समागम चिरकाल अंतरल्यावरून व घोर अरण्यांत तिची गति काय झाली तीं मुळींच न कळल्यावरून अत्यंत गहिंवर आला, व दुःखावेग सहन न होऊन मूर्छाही आली. तेव्हा पुनः पाहिल्याप्रमाणें सीतेनें त्याच्या ललाटास आपल्या हातानें स्पर्श करून त्यास सावध केलें, पण त्याच्या किंवा वसंतीच्या दृष्टीस पडली नाहीं. शेवटीं अश्वमेधाचा काळ अंतरेल यास्तव वासंतीस पुसून राम विमानांत बसून आयोध्येकडे निघाला. यापुढील स्थल वाल्मीकीचा आश्रम कल्पिला आहे. तेथें वसिष्ठ वगैरे मंडळी होतीच, आणि जनकही वाल्मीकीस भेटावयास आला आहे. त्यांचा सीतेच्या भयंकर गतीस्तव शोक चालला असतां आश्रमांतील बटूंपैकीं एक त्यांच्याकडे आला. त्यानें माझें नांव लव व वडील भावाचें नांव कुश सांगितलें. आईबापांचीं नांवें विचारतां, तीं मला माहीत नाहींत, आम्ही दोघे वाल्मीकिऋषीचे इतकेंच काय तें आम्हांस ठाऊक आहे असें तो बोलला. तरी जनकास व कौसल्येस त्या मुलाच्या तोंडावळ्यावरून व चालचलणुकीवरून सीतेच्या व रामाच्या खुणा पटल्या. इतक्यात त्या मुलाचे खेळगडी धांवत धांवत त्याकडे आले, आणि 'अश्व या नावाचा एक चमत्कारिक पशु आपल्या आश्रमांत आला आहे, तो तुला दाखवतों चल, असें म्हणून त्यास तिकडे घेऊन गेले. पुढें त्यानें तो अश्व धरून ठेवल्यावरून त्याचे रक्षक त्याच्यावर चालून आले. पण रामाचीं दिव्यास्त्रें त्यास जन्मतःच प्राप्त झालीं असल्यामुळें त्यानें एकट्यानें सर्व सैन्याचा पराभव

केला. तें वर्तमान ऐकून कुमार चंद्रकेतु त्याशीं भिडावयास आला. नंतर दोघांचीं वीरभाषणें होऊन युद्धप्रसंग झाला. हें सर्व राम शंबूक वध करून दंडकारण्याहून परत येण्याच्या आंत झालें. मग राम येतांच त्याने दोघांस युद्ध थांबविण्याविषयीं आज्ञा देऊन आपणाकडे बोलाविलें. चद्रकेतूने लवाची फार प्रशंसा केली, व रामायणकथेचा मुख्य पुरुष हा असें समजतांच लवानेंही रामास वंदन केलें. पुढे कुशही तेथें येऊन रामास अनेक कारणांवरून आपल्या दोघां पुत्रांची ओळख पटली. शेवटीं वाल्मीकिऋषीच्या आज्ञेवरून लक्ष्मणाने गंगातीरीं मोठा समाज बसण्यासारखी रंगभूमि तयार केली, व तेथें त्या कर्त्यानें रचलेल्या लहानशा नाटकाचा अप्सरांनीं प्रयोग केला. हा प्रयोग सर्वांसमक्ष करण्याचा त्या मुनीचा उद्देश असा कीं, सीतेस वनांत सोडल्यावर पुढें काय वृत्तांत झाला तो सर्वांस विदित व्हावा. त्याप्रमाणें सीतेनें आपला देह गंगेंत टाकला, तिला दोन पुत्र झाले, नंतर गंगेनें व पृथ्वीनें तिचें रक्षण करून दोघां पुत्रांस क्षात्र संस्कार करण्यास्तव वाल्मीकीच्या स्वाधीन केले, इत्यादि सर्व वृत्तांत त्या दृश्यकाव्यांत लोकांस प्रत्यक्ष झाल्यासारखा झाला. शेवटीं या उपनाटकांतील सीतेनें पृथ्वीच्या पोटांत ठाव मागितला, व आंत गडप झाली. नंतर सर्व पडद्यात गेल्या, परंतु लागलीच सर्वांसमक्ष खरोखरीची सीता, गंगा व पृथ्वी अशा तिघी गंगेंतून निघाल्या, व याप्रमाणें सीतेची शुद्धि सर्वोदेखत सिद्ध झाल्यावर रामानें सीतेचा पुनः अंगिकार केला. शेवटीं वाल्मीकीनें सर्वांस आशीर्वचन केलें आहे.

वरील संविधानकांत मुख्यतः दोन गोष्टी बदलून घातल्या आहेत. एक ही कीं, मूळच्या कथेंत लव व कुश यांनीं रामलक्ष्मणादिकांचा पराभव करून टाकला असें वर्णन असतां, येथें लव व लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु याचाच मात्र युद्धप्रसंग आणिला आहे. तशीच दुसरी गोष्ट ही कीं, राम, लक्ष्मण व सीता यांचा शेवट फार दुःखाचा झाला असतां येथें तो गोड झालासा दाखविला आहे. पहिला फेरफार करण्याचें कारण उघडच आहे कीं, नाटकाच्या नायकादि मुख्य पात्रांवर लाघवदोष येत होता तो न यावा; व दुसरा तर अगदीं आवश्यकच

होय. कां कीं, दुःखपरिणामी नाटकांचा--ज्यांस इंग्रजींत 'ट्राजेडी' म्हणतात त्यांचा--प्रघात संस्कृतांत मुळींच नाहीं, व अशा प्रकारचा नाटकाचा शेवट असूं नये अशाविषयीं साहित्यशास्त्राचा स्पष्ट नियमही आहे. संविधानकाच्या इतर भागांची रचनाही अशीच चातुर्यानें केली आहे. तीवरून मुख्य पात्रांच्या अंगचे उदात्त गुण कवीस स्पष्ट रीतीनें दाखवितां आले आहेत. सीतेवर रामाचा इतका जीवप्राण असतां, व चित्रपटावरून झालेल्या पूर्ववृत्तांतदर्शनानें तर त्याचें हृदय अत्यंत द्रवून प्रेमभरांत आलें असतांही दुर्मुखाच्या तोंडून जनापवाद कानीं पडतांच तें त्यानें तत्क्षणीं दगडाप्रमाणें कठिण केलें व वसिष्ठाच्या निरोपास आणि आपल्या नुकत्याच केलेल्या कठोर प्रतिज्ञेस अक्षरशः अनुसरून सीतेनें निद्रिस्त असतां घातलेली मिठी मोठ्या क्रूरपणानें तत्काळ तोडली, व अत्यंत सद्गदित होऊन तिचा शेवटचा निरोप घेतला! याचप्रमाणें दुसऱ्या व तिसऱ्या अंकांतील प्रसंगही हृदयभेदक आहेत. त्यांवरून महाशयपुरुषांचें अंतःकरण समयविशेषीं, किंबहुना एकेच वेळीं, 'वज्राहून कठोर व कुसुमाहून मृदु' कसें असतें तें कवीनें दाखविलें आहे. शंबुकवधाचा प्रसंग कवीस अवश्य घालावा लागला; कारण अशा कांहीं कामाशिवाय राजकार्य सोडून दंडकारण्यांत येण्यास रामास सवड कोठची? तरी त्याच्या सदयत्वास विरुद्ध असें तें कर्म असल्यामुळें, व शिवाय रंगभूमीवर प्रयोग करण्यास अप्रशस्त, यास्तव त्याचा प्रसंग फार संक्षेपानें उडवून त्यास दिव्यपुरुषाच्या रूपानें लागलीच आणला आहे. तिसऱ्या अंकांत तर करुणरस जसा काय अवतरलाच आहे. दंडकारण्यांतील वनशोभा पाहून रामाचें मन द्रवलें, व तें स्थान पुष्कळ वर्षांनीं पुनः पाहिल्यामुळें जो जो पदार्थ त्याच्या दृष्टीस पडे तो तो पूर्ववृत्तांतस्मारक होऊन सीताविरहाचें दुःख जागृत करी. तशांत सीतेची सखी वनदेवता वासंती हिचीही गांठ पडली आहे. पण यांहूनही एक चमत्कारिक गोष्ट या अंकाच्या संविधानकांत कवीनें मोठ्या चातुर्यानें योजिली आहे. ती तर यांतील करुणरसास विशेष अनुकूल झाली आहे. ती सीतेची अदृश्यता होय. जिची घोर अरण्यांत काय गति झाली हें कांहींच न समजल्यामुळें रामाच्या

हृदयांत दुःखाचे उमाळे येताहेत, तीच स्वतः पुढें उभी असतांही त्यास कळूं नये; व तिचाच परिचित हस्तस्पर्श झाला असतांही रामाच्या भाषणावरून त्यास उन्माद झाला अशी वासंतीस शंका यावी, व रामानेंही ती व्यर्थ भ्रांतीच मानावी; या गोष्टी अत्यंत हृदयद्रावक होत, व यांच्या योगानें सीतेचा परित्याग केल्याबद्दलचा जो रामाचा कठोरपणा त्याचा अगदीं विसर पडतो. चवथ्या अंकास वाल्मीकीचा आश्रम हें स्थल अनेक कारणांनीं फार समर्पक झालें आहे. राम व सीता हीं दोघे लहानपणापासून फार गुणाचीं असतांही त्यांस सुख म्हणून कधीं लागलेंच नाहीं व शेवटीं तर फारच भयंकर परिणाम झाला, हें पाहून कौसल्येस व जनकास पराकाष्ठेचें दुःख होऊन त्यांची चित्तवृत्ति उदास व विरक्त झाली असता, त्यांचे हृदयोद्गार वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या हृदयावर स्थलौचित्यानें विशेष ठसावेण्यास ऋषीच्या आश्रमाशिवाय दुसरें योग्य स्थान कोणतें सांपडणार? तसेंच संसारांतील नानाविध दुःखाचे प्रसंग काढून भागलेला असा वृद्धवर्ग सशोक व सचिंत होत्साता एकीकडे बसला असतां, आश्रमाच्या दुसऱ्या बाजूस तेथील बटु अनध्यायास्तव निश्चिंतपणें व स्वच्छंदपणें खेळत असून त्यांत अगदीं दंग होऊन गेले होते. या दोन्ही गोष्टीही एकापुढे एक घातल्यानें परस्पर फारच शोभतात; कां तर संसारांतील या दोन अवस्था परस्परांहून अत्यंत भिन्न असल्यामुळें अशा ठिकाणीं त्यांचा भेद फारच ठळक रीतीनें दिसून विशेष खुलतो. पुढें लव येऊन सीतेविषयीं निराश झालेल्या जनकास व कौसल्येस त्याकडे पाहून सीतेचा हा पुत्र असेल अशी शंका उत्पन्न झाली वगैरे वृत्तांत; लवाचे खेळगडी येऊन त्यांनीं केलेलें घोड्याचें मौजेचें वर्णन; आणि राजपुरुषांनीं दटाविलें असतां इतर बटूंमध्यें व त्या तेजस्वी क्षत्रियकुमारांत तत्क्षणीं दिसलेलें अंतर, या सर्व गोष्टीही मोठ्या खुबीनें आणल्यामुळें त्या त्या अंकास शोभाप्रद झाल्या आहेत. असो. यापुढील शेवटल्या तीन अंकांचेंही याप्रमाणें विशेष वर्णन करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. वरील संविधानकावरूनच त्यांविषयीं आमच्या चतुर वाचकांस बरीच कल्पना बांधतां येईल असें आम्हांस वाटतें.

‘ उत्तररामचरितां ’ त मुख्य रस म्हटला म्हणजे करुण होय. पहिल्या अंकांत तो कोठें संभोगशृंगाराशीं, व कोठें विप्रलंभशृंगाराशीं, असा मिश्रित आहे. दुसऱ्याच्या शेवटीं पुनः विप्रलंभशृंगाराशी मिश्रित असून तेथें त्यास नुकता आरंभ मात्र झाला आहे. पण पुढील अंकांत त्याचा अगदी कळस झाला आहे. चवथ्यांत जनक व कौसल्या यांच्या व दुसऱ्याच्या आरंभीं वासंतीच्या, भाषणांत शुद्ध करुणरस आहे. पांचव्यात व साहव्याच्या आरंभीं वीर असून, दोघेही योद्धे कुमार असल्यामुळें त्यांचीं भाषणें विशेष मजेचीं वाटतात. शेवटल्या म्हणजे सातव्या अंकांत आरंभीं करुण व शेवटीं अद्भुतरस आहे. यांप्रमाणें प्रस्तुत नाटकांत कवीनें करुणरसावर मुख्य धोरण ठेवून इतर केवळ प्रसंगोपात्त किंवा तदंगभूत असे आणले आहेत. हें सर्व या नाटकाच्या आंतील रचनेविषयीं झालें. पण केवळ बाह्यतः पाहतांही यांतील निरनिराळीं स्थळें कवीनें किती चमत्कारिक योजलीं आहेत तीं सहज वाचणारांच्या सुद्धां लक्षांत आल्यावांचून राहणार नाहींत. कोठें ऋषींचा आश्रम, कोठें वनदेवतांचीं रम्य व भव्य अरण्यें, कोठें विद्याधरलोकांचा दिव्य प्रदेश, कोठें सुरासुरादि सर्व भूतसृष्टीनें अधिष्ठित असा आश्चर्यभूत रंग, कोठें समरभूमि, अशा चित्रविचित्र स्थलांची कल्पना केल्यानें त्या त्या अंकांतील रस वाचकांच्या, व विशेषतः प्रेक्षकांच्या मनांवर विशेष आल्हादकारक होण्यासारखा झाला आहे. प्रकृत नाटकांत सृष्टिवर्णनाचाही प्रसंग कवीनें आणला आहे; तो दुसऱ्या व तिसऱ्या अंकांत होय. या दोहों ठिकाणीं केलेलें दंडकारण्याचें वर्णन फार सुंदर आहे. तसेंच कांहीं दुसऱ्या जागींही प्रसंगवशात् जेथें जेथें वर्णन करणें आलें आहे तेथें तेथेंही तें तसेंच उत्कृष्ट व समर्पक केलें आहे. यांतील पात्रें बहुतेक रामायणावरून प्रसिद्धच आहेत; व येथेंही त्यांचे उदात्त गुण तसें संविधानक योजून कवीनें अधिक व्यक्त केले आहेत. याप्रमाणें अनेक गुणांनीं ‘ उत्तररामचरित ’ फार रमणीय झालें आहे. व यावरूनच तें एकदम रसिकप्रिय होऊन आजपर्यंत त्याचीच बाकीच्या दोहोंपेक्षां पूर्वींच्या पंडितांत विशेष प्रसिद्धि आहे; व ही त्याची ख्याति कालगतीबरोबर सतत वृद्धिंगत

होऊन **भवभूतीचें** नांव दिगंतरींही जाऊन तें चिरकाल राहील यांत तिळमात्रही संदेह नाहीं !

येथवर **भवभूतीचे** सर्व ग्रंथांविषयीं--म्हणजे त्याच्या तीन नाटकांविषयीं-झालें. आतां त्यांत जे कांहीं विशेष ठळक रीतीने दिसतात ते अगोदर सांगून नंतर त्याच्या कवित्वगुणाचें एकंदरींत वर्णन करूं. संविधानकाच्या संबंधें पाहतां **भवभूतीच्या** नाटकांत प्रथमतः हा एक मोठा विशेष दिसतो कीं, त्यांतील विष्कंभक अगदीं साधा असतो. त्यांत आधीं नांदी म्हणजे मंगलाचरणच पहा बाकीच्या सर्व नाटकांतून हिला जितका डौल आणवेल तितका बहुधा आणलेला असतो-म्हणजे शिखरिणी, स्रग्धरा, अशा प्रकारचें एकादें दीर्घवृत्त घालून त्यांत अर्थाची व पदांची रचना खुबीची केलेली असते. तसेंच कित्येकांत अशा प्रकारचें एकच पद्य पुरेसें न होऊन अधिकही घातलेलीं असतात. उदाहरणार्थ, ' वेणीसंहार '; या नाटकांत हीं मंगलाचरण-पद्यें सहा सात घातलीं आहेत. पण असें केल्यानें प्रेक्षकजनांच्या कुतूहलाचा विघात होतो, यास्तव ' काव्यप्रकाश ' नामक प्रख्यात साहित्यग्रंथांत त्यास दोष दिला आहे. असो; पण **भवभूतीच्या** ' महावीरचरित ' व ' उत्तररामचरित ' या दोन्ही नाटकांच्या आरंभींच्या नांद्या अनुष्टुप् छंदांत असून अगदीं साध्या आहेत. आतां हें खरें कीं, ' मालतीमाधवा ' च्या आरंभीं तीन दीर्घ वृत्तें घालून नांदी केली आहे, व त्यांत अर्थही चमत्कारिक व प्रौढ आणला आहे; पण तें केवळ प्रसंगविशेषानुरोधास्तव किंवा नाटक करणाऱ्या मंडळींच्या आग्रहास्तव **भवभूतीनें** केलें असावें असें आम्हांस वाटतें. बाकीच्या सर्व नाटकांतून पहिलीं पात्रें रंगभूमीवर आणण्यास कवीनें अशी युक्ति केली असते कीं, सूत्रधार आणि नटी किंवा पारिपार्श्वक यांच्या भाषणाचा व पहिल्यानें प्रवेश करणाऱ्या पात्रांचा कांहीं तरी संबंध घालून दिला असतो. कांहीं नाटकांत हा संबंध वस्तुतः नसून श्लिष्टपदांच्या योजनेनें त्याचा आभास मात्र होण्याची तजवीज केली असते. पण **भवभूतीच्या** नाटकांत हाही प्रकार कांहींच आढळत नाहीं. विष्कंभक व पहिला प्रवेश हे अगदीं विलग असतात. विष्कंभकांत सूत्रधार

कवीचें वर्णन करून पुढील संविधानकाचें दिग्दर्शन करतो, व पहिलीं पात्रें कोण येणार हें प्रेक्षकांस सुचवितो. नंतर तीं पात्रें येऊन नाटकास खरा आरंभ होतो. इतर नाटकांतूनही कवीचें वर्णन वगैरे अगोदर केलेले असतेंच, पण यापुढे दोहोंत एक मोठाच फरक असतो. **भवभूतीच्या** नाटकांतील सूत्रधार आपलें बाह्यत्व शेवटपर्यंत[1] राखतो; पण या दुसऱ्या नाटकांतून तसे नसून, तो तें मध्येंच विसरतो, व पहिल्या येणाऱ्या पात्रांशीं आपण परिचित आहों असें दाखवितो. हे नाटकरीत्य पाहतां विलक्षण होय; व हा दोष समजून तो आपल्या नाटकांवर न यावा म्हणून आपल्या कवीनें विष्कंभकाचा चमत्कार करण्याकडे आपलें चातुर्य मुळींच खर्चिलें नसावें असे वाटतें. हें एक; व दुसरें असे कीं, वरील वैपरीत्य वस्तुतः दोषरूप असताही मोठमोठ्या कवींनीं[2] सुद्धां वाचकाच्या किंवा श्रोत्यांच्या मनास चमत्कार भासव

---

१ कोणी कदाचित् असा वाद घेईल कीं, हे सूत्रधाराचें बाह्यत्व ' उत्तररामचरितां ' त त्याच्या निष्क्रांतीपर्यंत ठेवलें नाहीं, कां तर, तो व नट यांचें सीतेविषयींच्या अपवादाबद्दल भाषण होऊन ते रामाकडे चालते झाले आहेत. पण अंमळ विचार केला असतां सहज लक्षांत येईल कीं, त्या नाटकांत सूत्रधाराचा सूत्रधारपणा ' एषोऽहं कार्यवशादायोध्यिकस्तदानींतनश्च संवृत्तः ' ( हा मी आजच्या नाटकप्रयोगास्तव अयोध्यावासी व त्या वेळचा बनलों पहा ! ) असे म्हणतांच गेला; व त्याचें आणि नटाचें पुढील भाषण रंगभूमीवरील पात्रांच्या प्रमाणेंच समजावयाचें. नाटकाच्या कथानकास आरंभ करावयाचा हा प्रकार किती साधा व सुंदर आहे हेंही आमच्या मर्मज्ञ वाचकांस येथें प्रसंगवशात् सांगितल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

२ नाटकाविषयीं बोलणे असतां ' कवि ' असा सामान्यार्थवाचक शब्द घालण्याचें कारण हें कीं, उक्तप्रकार अन्यदेशीय कवि होमर व मिल्टन् यांच्या महाकाव्यांच्या आरंभीं आढळतो. दोघांही कवींनीं कवित्वदेवतेची स्वानुकूलतेस्तव प्रार्थना करीत असतां तसाच एकदम काव्याच्या कथानकास आरंभ केला आहे. असें करण्यांत मुख्य खुबी ही असते कीं, नदीमुखानें अफाट समुद्रांत जसें शिरावें, तसे वाचकांस होऊन एकदम भर गोष्टींत आपण कसे आलों असा विस्मय त्यांस वाटावा.

ण्याकरितां तें आपल्या कृतींत आणलें आहे, यास्तव हवें त्यानेंही तसें केल्यास चालण्यासारखें आहे, असें म्हणतां येईल खरें; तथापि एकच युक्ति पुष्कळांनीं अनेक प्रकारांनीं आधींच लढविली असल्यावर तींत अगदीं रस रहात नाहीं; आणि जरी यथाकथंचित् श्लेष साधण्याकरिता वगैरे खटपट करून **भवभूतीनें** तसा विष्कंभकाचा चमत्कार केलाच असता, तरी तें केवळ पूर्वींच्या कवींचें अनुकरण केल्यासारखें मात्र दिसतें. या दोहों कारणांवरून, आमच्या मतें, **भवभूतीनें** आपल्या नाटकांतील विष्कंभक असे अकृत्रिम रचिले; व हीच रीत मूळची असावी हेंही स्पष्ट दिसतें. इंग्रजी नाटकांत तर मंगलाचरण, विष्कंभक वगैरे कांहींच नसून खुद्द नाटकासच एकदम आरंभ केलेला असतो, व रंगभूमीवर येणारीं पात्रें कोण हें समजण्यास एका हस्तपत्रकाशिवाय दुसरा मार्गच नसतो. आरंभीं व शेवटीं श्रोत्यांस उद्देशून सूत्रधारानें भाषण करावें अशी त्यांच्यांत चाल आहे खरी; पण हीं भाषणें व संस्कृत नाटकांतील विष्कंभक व भरतवाक्य यांत फारच अंतर आहे. नाटकप्रयोगाचा आरंभ व त्याचा शेवट हीं एकदमच केलीं असता ओकें दिसतें, तें न दिसावें; आणि श्रोत्यांचें लक्ष पुढील नाटकाकडे लागावें, किंवा नाटक झाल्यावर त्यांचे आभार मानून सबहुमान त्यांचे विसर्जन करावे; येवढाच इंग्रजी नाटककारांचा तीं भाषणे नाटकास जोडण्यांत उद्देश असतो. यास्तव अर्थातच हीं नाटकाचीं टोपणे नाटकापासून अगदीं विलग असून, कधीं कधीं तीं दुसऱ्या एकाद्या प्रख्यात कवीपासूनही नाटककार लिहून घेतात. असो; याप्रमाणें विष्कंभकरचनेच्या संबंधें पाहतां **भवभूतीचा** इतर संस्कृत नाटककारांहून जरी तृतीय पंथ दिसतो, तरी त्याचीच रीत वस्तुतः पाहतां खरी असून मूळची होय हें स्पष्ट आहे. व दुसरा असाही एक विचार आहे की, ज्या कारागिराच्या मनांत आपल्या कसबाविषयीं अशी पक्की खातरी वागत आहे, कीं आपण बांधिलेल्या मंदिराचा जो जो भाग लोक बघतील त्या त्याकडे ते पाहतच राहतील, तो दरवाज्यावर मेहेरपी व नक्षी करण्याखालींच आपली अर्धी करामत कशास खर्चील ?

**भवभूती**च्या नाटकांविषयीं दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, तीं तिन्ही उत्कृष्ट असून एकाच सारखीं एक अशीं नाहीत. तिघांतही निरनिराळे रस असून रचनेचे सर्व प्रकार वेगवेगळे. हें विशेष रीतीनें सांगण्याचें कारण असें कीं, हा प्रकार इतर नाटककारांपैकीं कोणाचेही ठायीं दृष्टीस पडत नाहीं. प्रत्यक्ष **कालिदासा**विषयींच पहा. कवि व नाटककार यांचे विसदृश गुण एकाचेच ठायी पूर्णत्वानें एकवट झाल्याचें उदाहरण **कालिदासा**हून दुसरे कदाचित् कोणत्याही देशांत व कोणत्याही काळांत सांपडणे नाहीं; तरी त्याच्या तीन नाटकांची परस्पर तुलना केली असतां अगदीं वरवर वाचणारास सुद्धां असें आढळून येईल कीं, पहिल्यांत जो रंग आहे तो दुसऱ्यांत नाहीं, व दुसऱ्यांत आहे तो तिसऱ्यांत नाहीं. शिवाय रसाविषयीं वगैरे पाहतां **भवभूती**चीं नाटकें परस्परांहून जशीं अगदीं भिन्न आहेत तशींही तीं नाहींत. दुसरें उदाहरण **श्रीहर्षा**चें घ्या. याचें पहिलें नाटक ' रत्नावली ' संविधानकचातुर्य, पदलालित्य, श्लेषप्रयोग इत्यादि गुणांनीं रमणीय झालें आहे; पण त्याचीच दुसरी कृति ' नागानंद ' हें तसें न साधून सामान्य प्रतीच्या नाटकांतच तें मोडतें. अशी त्याची गति होण्यास एक मोठें कारण असें झालें आहे कीं, पहिल्या नाटकाशीं त्याचें कित्येक ठिकाणीं अत्यंत सादृश्य आहे. याप्रमाणेंच आणखीही इतर कवींचीं उदाहरणें कदाचित् देतां येतीं—पण हें म्हणणें आतां व्यर्थ होय ! कालगतीच्या सपाट्यांत नाश झाल्यानें म्हणा, अगर दुसऱ्या कारणांनीं म्हणा, संस्कृत कवींचे ग्रंथ पाहूं गेलें असतां प्रायः असें आढळतें कीं, काव्यावरून ज्यांची ख्याति चालत आली आहे त्यांचीं नांवें नाटककारांत नाहींत; व कित्येकांनीं उत्कृष्ट नाटकें रचलीं असतांही त्यांच्या एका नाटकाशिवाय त्यांच्या नांवें दुसरें कांहींएक प्रसिद्ध नाहीं. **भारवि, माघ, [1]बाण, मयूर, जगन्ना-**

---

१ ' पार्वतीपरिणय ' म्हणून एक नाटक **बाण** कवीच्या नांवाचें आमच्या पाहण्यांत आलें आहे. हें त्या विख्यात कवीनेंच रचलें किंवा कसें याचा लांब वाद करणें नलगे. जो यांतील एकादा अंक वाचील त्यास त्याच्या अप्रयोजकपणाचा व ग्रंथकर्त्याच्या साहसाचा चमत्कार वाटल्यावांचून राहणार नाही **बाण** कवीचें नांव, व ' कुमारसंभवा ' तून अजीबात चोरलेला एकंदर मजकूर, हीं यांत वजा केलीं असतां ग्रंथकाराचा मूर्खपणा व धाडसाची शर्थ हीच खालची निवळ बाकी !

**थराय** हे पहिल्या प्रकारचे होत; व दुसऱ्या प्रकारचे **शूद्रक** ( ' मृच्छकटिक ' ) **विशाखदत्त** ( ' मुद्राराक्षस ' ), **नारायणभट्ट** ( ' वेणीसंहार ' ) **कृष्णमिश्र** ( ' प्रबोधचंद्रोदय ' ) ' **रामभद्र दीक्षित** ( ' जानकीपरिणय ' ) इत्यादि होत. वरील दोहों प्रकारचे ग्रंथ ज्यांचे अजून प्रसिद्ध आहेत असे कवि **कालिदासा**खेरीज आणखी दोघेच कायते आहेत असें वाटतें. एक **श्रीहर्ष**,—ज्याच्या नांवानें पूर्वोक्त दोन नाटकांशिवाय, अतिशयोक्तिरूपवर्णनादि दोष व मृदुत्वातिशयादि गुण यांनीं युक्त असें नैषध' नामक विख्यात काव्य प्रसिद्ध आहे, तो; व दुसरा ' गीतगोविंद ' व ' प्रसन्नराघव नाटक ' याचा कर्ता **जयदेव**. तेव्हां एकंदरींत पाहतां उत्कृष्ट असून परस्परांशीं अत्यंत विसदृश, व एकाहून अधिक, अशीं नाटकें **भवभूती**चींच मात्र.

वरील विसदृशतेविषयींचा उल्लेख नाटकांच्या एकंदर रचनेच्या संबंधें जसा केला आहे, तसाच तो त्यांतील प्रत्येक विचारांविषयीं केल्यास ही बहुधा चालणार आहे; म्हणजे एके ठिकाणीं जो विचार आला तोच दुसरे ठिकाणींही आलेला **भवभूती**च्या नाटकांत प्रायः आढळणार नाहीं असें वाटतें. **कालिदासा**चीं काव्यें अंमळ लक्षपूर्वक ज्यांनीं समग्र वाचिलीं असतील त्यांच्या लक्षांत ही गोष्ट अवश्य आलीच असेल कीं, त्या कवीचे कित्येक विचार अनेक स्थलीं अगदीं सारखे किंवा थोडा फेर केलेले असे आढळतात. उदाहरणार्थ पुढील श्लोकः—

**प्रजागरात्खिलीभूतस्तस्याः स्वप्ने समागमः**
**बाष्पस्तु न ददात्येनां द्रष्टुं चित्रगतामपि ॥**

शाकुंतल ६

तेंच पुनः—

**हृदयमिषुभिः कामस्यांतः सशल्यमिदं ततः**
**कथमुपलभे निद्रां स्वप्ने समागमकारिणीम् ।**
**न च सुवदनामालेख्येऽपि प्रियां समवाप्य तां**
**मम नयनयोरुद्बाष्पत्वं सखे न भविष्यति ॥**

विक्रमोर्वशी २

वरील श्लोकांच्या उत्तरार्धांतील अर्थ पुनः 'मेघदूतां'तही वर्णिला आहे—

> त्वामालिख्य प्रणयकुपितां धातुरागैः शिलाया-
> मात्मानं ते चरणपतितं यावदिच्छामि कर्तुम् ।
> अस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे
> क्रूरस्तस्मिन्नपि न सहते संगमं नौ कृतांतः ॥
>
> उत्तरमेघ.

याप्रमाणें दुसरींही उदाहरणें देतां येतील. एकंदर सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, वरच्यासारखें अर्थाचें ऐक्य भवभूतीच्या ग्रंथांत सांपडत नाहीं; तर त्याचे विचार प्रत्येक ठिकाणीं निरनिराळे व नवे असतात. शिवाय, त्याविषयीं येथें दुसरी अशीही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, ते नेहेमी कवीचेच स्वतःचे असून इतर काव्यग्रंथांचा त्यास बिलकुल आधार दिसत नाहीं.[1]

येथवर भवभूतीच्या नाटकांविषयीं बाह्यतः व इतर कवींच्या संबंधें विचार झाला आतां खुद्द त्याविषयींच–म्हणजे त्यांतील गुणांविषयीं–विचार करूं. मागें कालिदासाच्या कवितेंतील पदरचनेविषयीं लिहितांना असें म्हटलें होतें कीं, तिचे गुण सामान्यतः पाहिले

---

१ वर कालिदासाचे समानार्थक तीन श्लोक लिहिल्यावर तसाच एक भवभूतीचाही श्लोक येथे लिहिल्यावांचून राहवत नाहीं —

> वारंवारं तिरयति दृशोरुद्गमं बाष्पपूर-
> स्तत्संकल्पोपहितजडिमस्तंभमभ्येति गात्रम् ।
> सद्यः स्विद्यन्नयमविरतोत्कंपलोलांगुलीकः
> पाणिर्लेखाविधिषु नितरां वर्तते किं करोमि ।
>
> मालतीमाधव, अंक १

ह्या श्लोकास वरील श्लोकांचा आधार आहे कीं नाहीं याचा निश्चय करणें अगदी अशक्य होय. सध्यां इतकेंच सुचवायाचें कीं, जरी तसा आधार आहे म्हटलें, तरी ज्या अर्थी तोच हृदयोद्गार वरील श्लोकांत इतका फैलावून व खुलवून वर्णिल्याने गुरूवरही शिष्यानें ताण केली आहे, त्या अर्थी वर मूळग्रंथांत भवभूतीविषयीं जो उल्लेख केला आहे त्यास विशेष बाध येणार नाहीं अशी खातरी आहे.

असतां अत्यंत माधुर्य व कोमलत्व हे होत. हे गुण **भवभूतीनें**ही प्रसंगविशेषीं–म्हणजे शृंगार व करुण हे रस साधतांना–आणले आहेत; पण या कवीची एकंदर धाटणी म्हटली म्हणजे झोंकदार लिहिण्याची. हा झोंक **भवभूती**च्या नाटकात सर्वत्र दृष्टीस पडतो–गद्य असो, पद्य असो; भाषण उदात्त व गंभीर किंवा सामान्य व विनोदाचें असो, कोठेंही या गुणांत कमतरपणा दिसत नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं वीररस आणला आहे त्या त्या ठिकाणीं तर

**धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम्**[1]

या श्लोकपादात वर्णिलेल्या कुशाच्या मर्दुमकीच्या चालीप्रमाणें शब्दांचा ओघही फारच झोंकाचा दिसून येतो; व हा वरील चरणच **भवभूती**च्या पदरचनाप्रकाराचें एक उदाहरण असून तसाच तद्वर्णनपरही होय !

**भवभूती**च्या नाटकांत निरनिराळया प्रसंगीं भिन्न भिन्न रसांचा परिपाक उतरविला आहे. त्यांत अगोदर शृंगाराविषयीं. हा रस पूर्वोक्त तीन नाटकापैकीं मुख्यत्वें 'मालतीमाधवां'तच विशेषेकरून आहे; राहिल्या दोहोंपैकीं 'महावीरचरिता'त त्याची उगीच झाक मात्र आहे, व 'उत्तररामचरिता'त तो अगदीं शुद्ध रूपानें नसून करुणरसाशीं मिश्रित आहे. यास्तव आपल्या कवीच्या हातून तो कितपत उतरला आहे हें पूर्णतेनें पाहणें झाल्यास तें 'मालतीमाधवांत'च पाहिलें पाहिजे. या नाटकांविषयीं पूर्वी लिहितांना याच संबंधें आम्हीं जें म्हटलें होतें तें आमच्या वाचकांस बहुधा आठवतच असेल; त्यावरच येथें अंमळ विस्तार करूं. **भवभूती**च्या नाटकांत जी शृंगाराची तऱ्हा आहे ती कोणत्याही इतर नाटकांत व काव्यांत प्रायः सांपडणें नाहीं. आपल्या **कालिदासादि** कवींस कविवृंदांत अग्रभागीं गणून युरोपातील कित्येक पंडितांनीं त्यांस कीर्तिमंदिरांत एकदम अत्युच्चपदीं अढळ बसविलें, हें

---

१ 'याची ( कुशाची ) चाल वीराप्रमाणें मोठ्या ऐटीची असून तीबरोबर भूमि खालीं दडपतेच आहे काय असे वाटतें !'—

उत्तररामचरित्र अंक ६.

ज्यांस पाहवत नाहीं असे कित्येक इंग्रज ग्रंथकार एकंदर संस्कृत कवितेस असा दोष लावतात कीं, तींतलि शृंगाराचा उद्भव शुद्ध प्रेमरसापासून तादृश नसून कामवासनेपासूनच पुष्कळ असतो. हें म्हणणें हठवाद्यांच्या मताप्रमाणें अर्थात् अंशतः मात्र खरें आहे संस्कृत कवितेचें आद्य शुद्ध स्वरूप जेव्हां भ्रष्ट होऊं लागलें तेव्हांच्या कित्येक कृतींत व अलीकडे ज्यांची प्रवृत्ति विशेष पडली असे बीभत्स भाणें यांवर मात्र वरील दोष येतो खरा; पण येवढ्यावरून एकंदर कवितेस दोष देणें हें किती सयुक्तिक आहे हे सांगायास नको! बरें, पूर्वोक्त दोष एके संस्कृत कवितेसच लागतो काय? ग्रीक व रोमन कवींसही यासंबंधे नांव ठेवण्यास कोठेंच जागा नाहीं काय?—पण इतकेंही लांब जाणें नको; इंग्लिश भाषेचें रससर्वस्व ज्यांत सांठविलें आहे असे जे **शेक्सपीयर** कवीचे ग्रंथ ते तरी वर सांगितलेल्या दोषापासून सर्वथा मुक्त आहेत काय? जर असते, तर कुटुंबांतील माणसांनीं—म्हणजे पुरुष, बायका, मुलें या सर्वांनीं एकत्र वाचण्यालायक अशा त्या कवीच्या संक्षिप्त आवृत्ति निराळ्या कशास निघतात? असो. सध्यां प्रकृत विषयाच्या संबंधे आम्हांस येथें शेवटीं इतकेंच सांगणें आहे कीं, पूर्वदेशीय म्हणजे फारशी, संस्कृत इत्यादि भाषांतल्या कवींचीं काव्यें व निर्बंधरहित शृंगारवर्णन यांचा परस्पर नित्यसंबंध आहे अशी जी पूर्वापार समजूत चालत आली आहे ती सर्वथा खरी आहे असें नाहीं, अशी ज्यास पूर्ण खात्री करून घेणें असेल त्यांनी आमच्या **भवभूती**च्या नाटकांचें पर्यालोचन करावें. तें केलें असतां त्यांतील शृंगार किती खुबीदार, किती नाजूक व किती प्रौढ आहे तें त्यांच्या लक्षांत सहज येईल.

या शृंगाराचीं उदाहरणें देण्यापूर्वीं येथें त्याविषयीं एक गोष्ट वाचकांस समजाविली पाहिजे ती ही कीं, मागें **कालिदासा**च्या ग्रंथांतून तीं

---

१ 'भाण' म्हणून एक नाटकाचाच प्रकार आहे. त्यांत पात्र एकच असतें. तें त्यांतलि नायक होय. हा नायक कांहीं आपणाशीं व कांहीं दुसऱ्यांस अनुलक्षून बोलत असतो. 'वसंततिलक', 'मुकुंदानंद' इत्यादि कांहीं लोकांत विशेष प्रसिद्ध आहे.

जशीं पृथक्त्वानें व थोडक्यांत देतां आलीं तशीं तीं येथें देणें पुष्कळ ठिकाणीं अशक्य होय. कारण मागील उदाहरणें बहुतेक काव्यांतीलच असल्यामुळें तीं पूर्वापरसंदर्भजन्य स्वारस्याची हानि न होतां वेगळीं काढतां आलीं. पण नाटकांची रचना कृत्रिम व संविधानकपर असते, यास्तव त्यांतील कोठचाही भाग निराळा केला असतां तो लागलीच विलग दिसूं लागतो; व यथाकथंचित् काढलाच, तर तो बराच मोठा काढल्याविना चालत नाहीं. जसा सोन्याचा पत्रा कितीही लांब असला तरी त्यांतून हवा तेथें व हवा तेवढा तुकडा तोडण्यास सवड असते; पण तेंच एकाद्या उत्कृष्ट चित्रास किंवा पुतळ्यास करतां येत नाहीं. असो. यास्तव भवभूतीच्या कृतींतील रसांचा ज्यास अनुभव घेणें असेल त्यानीं त्याच्या तिन्ही नाटकांतील उत्कृष्ट स्थलें जीं जीं वर सांगण्यांत आलीं तीं शोधून पाहिलीं पाहिजेत,—म्हणजे तीं नाटकेंच प्रायः समग्र वाचलीं पाहिजेत असेंच सरासरी झालें. तरी असे करण्यास ज्यांस सवड नाहीं किंवा सवड असूनही ग्रंथांतील गुणांचें यथास्थित आकलन करण्याजोगें ज्यांच्या बुद्धीस रसास्वादनपटुत्व अद्यापि आलें नाहीं, अशा वाचकांकरितां पुढील वेंचे जसे काढता येतील तसे येथे सादर करतों.—

मालतीनें माधवास मदनोद्यानांत प्रथमतः पाहतांच तिच्या शृंगार-चेष्टांनीं त्याची जी अवस्था झाली तिचें तोच स्वतः मकरंदापाशीं वर्णन करतो—

अत्रांतरे किमपि वाग्विभवातिवृत्त-
वैचित्र्यमुल्लसितविभ्रममुत्पलाक्ष्याः ।
तद्भूरिसात्त्विकविकारमपास्तधैर्य-
माचार्यकं विजयि मान्मथमाविरासीत् ॥

ततश्च ।

स्तिमितविकसितानामुल्लसद्भ्रूलतानां
मसृणमुकुलितानां प्रांतविस्तारभाजाम् ।
प्रतिनयननिपाते किंचिदाकुंचितानां
विविधमहमभूवं पात्रमालोकितानाम् ॥

तैश्च ।

अलसवलितमुग्धस्निग्धनिष्पंदमंदै-
रधिकविकसदंतर्विस्मयस्मेरतारैः ।
हृदयमशरणं मे पक्ष्मलाक्ष्याः कटाक्षै-
रपहृतमपविद्धं पीतमुन्मूलितं च ॥

मालतीमाधव १

तसेंच दुसऱ्या दोन प्रसंगांचें वर्णन—

सभ्रूविलासमथ सोऽयमितीरयित्वा
सप्रत्यभिज्ञमिव मामवलोक्य तस्याः
अन्योन्यभावचतुरेण सखीजनेन
मुक्तास्तदा स्मितसुधामधुराः कटाक्षाः ॥

---

यांत्या मुहुर्वलितकंधरमाननं तत्
आवृत्तवृंतशतपत्रनिभं वहंत्या ।
दिग्धोऽमृतेन च विषेण च पक्ष्मलाक्ष्या
गाढं निखात इव मे हृदये कटाक्षः ॥

मालतीनें काढलेली माधवाची तजबीर कलहंसकाने त्याजपाशीं दिल्यावर त्यानेंही मकरंदाच्या आग्रहावरून तेथें मालतीचें चित्र काढिलें, व तसाच खालीं एक श्लोकही तत्क्षणीं रचून लिहिला—

जगति जयिनस्ते ते भावा नवेंदुकलादयः
प्रकृतिमधुराः संत्येवान्ये मनो मदयंति ये ।
मम तु यदियं याता लोके विलोचनचंद्रिका
नयनविषयं जन्मन्येकः स एव महोत्सवः ॥

आपल्या हृदयंगमेच्या चित्रफलकावर अत्यंत सरस अशा पदांचें व अर्थाचें सुभाषित ज्या रसिकास लिहावयाचें असेल त्यास ते वरच्याहूनही उत्कृष्ट कोठेंही सांपडेलसें आम्हांस वाटत नाहीं !

मालती कामदेवायतनाहून सपरिवार निघाली असतां तिची एक सखी ( लवंगिका ) फुलें वेंचण्याच्या मिषानें माधवाजवळ येऊन त्याजपाशींचा बकुलहार मागूं लागली, तो वृत्तांत माधव मकरंदास सांगतो—

माधवः—सखे। श्रूयताम्। अथ तस्याः करेणुकारोहणसमय एव महतः सखीकदंबकादन्यतमा वारयोषिद्विलंघ्य बालबकुलकुसुमावचयक्रमेण नेदीयसी भूत्वा प्रणम्य कुसुमापीडव्याजेन मामेवमुक्तवती। " महाभाग सुश्लिष्टगुणतया रमणीय एष वः **सुमनसां** सन्निवेशः कुतूहलिनी च नो भर्तृदारिका वर्तते तस्यामभिनवो विचित्रः कुसुमेषुव्यापारः। तद्भवतु कृतार्थता वैदग्ध्यस्य फलतु निर्माणरमणीयता **विधातुः** आसादयतु **सरस** एष भर्तृदारिकायां कंठावलंबनमहार्घ्यतामिति "। १

मकरंदः—अहो वैदग्ध्यम्!

हा वरील मकरंदाचा उद्गार जसा लवंगिकेस उद्देशून आहे तसाच तो नाटककर्त्या कवीविषयीं कोण सहृदय वाचक करीत नाहीं!

हे वेंचे सर्व पहिल्याच अंकातील झाले, व हा या नाटकातील श्रृंगाराचा केवळ आरंभ होय. पण याचीच जेथें अत्यंत पूर्णता झाली आहे तेथें या कवीचा वर सांगितलेला श्रृंगाराविषयींचा विशेष अगदीं स्पष्ट रीतीनें दिसून येतो. असा अंक आठवा होय. यात स्थल, समय व प्रसंग हीं फारच मजेचीं आणलीं आहेत. स्थल वनप्रवेश; समय वसंतमासांतील मध्यरात्र व नुकताच चंद्रोदय झालेला; आणि प्रसंग ही तसाच—नायक, नायिका व एक सखी इतकींच काय तीं तेथें. शिवाय त्या दिवशीं एकामागून एक घडून आलेल्या चमत्कारिक गोष्टी—म्हणजे मदनोद्यानांत झालेली दृष्टादृष्ट, वाघ सुटल्याचा व कपालकुंडलेनें मालतीस नेल्याचा भयंकर प्रसंग आणि दोन्हीं वेळीं माधवानें दाखविलेला पराक्रम, तसाच ग्रामदेवतेच्या देवळात नुकताच

---

१ अवतरणचिन्हांत जेवढें भाषण आहे तेवढें श्लिष्ट आहे, म्हणजे बकुलहारास व माधवास तें निरनिराळ्या अर्थांनीं लागतें. असे द्व्यर्थी शब्द मोठ्या अक्षरांनीं वर दाखविले आहेत. ' विधातुः ' व 'सरसः' हे शब्दही श्लिष्टच म्हटले आहेत हें सर्वांस बहुधा नवीन वाटेल; पण भाषणाच्या एकंदर रोंखावरून श्लेष शेवटपर्यंत असावा असें दिसतें.

झालेला विनोद करण्याजोगा वृत्तांत—यांचेंही त्या वेळच्या शृंगाराचें विशेष उद्दीपन करण्यास साहित्य असतां कवीनें आपला नेहमींचा क्रम सोडला नाहीं. शृंगारांत फार न भडकतां नायिकेस परमभूषणरूप जी शालीनता ती या चुटक्यांत फार उत्कृष्ट दाखविली आहे, व प्रस्तुत नाटकांत त्या रसाचा कळस जरी याच ठिकाणीं झाला आहे तरी इतर नाटकांतून तो ज्या रीतीनें दृष्टीस पडतो त्यापेक्षां येथें तो फारच वेगळ्या प्रकारचा आहे. असो; शेवटीं त्यासंबंधें वाचकांस येथें इतकेंच सांगणें आहे. कीं, तो सगळा उतारा येथें घेणें स्थलसंकोचास्तव अशक्य होय. यास्तव ज्यांस आपली इच्छा तृप्त करणे असेल त्यांनीं मूळ ग्रंथ किंवा त्याचें मराठी भाषांतर[१] पाहावें.

वर सर्व शुद्ध शृंगाराविषयीं झालें. आता तो जेथें रसांतरमिश्रित आहे तेथेच वेंचे घेऊं.

मागें याच नाटकाच्या वर्णनांत सांगितलें आहे कीं, पांचव्या अंकांत शृंगार उदात्तरूप असून वीरकरुणादि इतर रसांशीं संयुक्त आहे. यास्तव पुढील पद्यें समजण्यास त्या अंकाचें संविधानक वाचकांनीं लक्षांत आणावें.

माधवः—महाभागे ! न भेतव्यम् ।

मरणसमये शंकां त्यक्त्वा प्रतापनिरर्गल-
प्रकटितनिजस्नेहः सोऽयं सखा पुर एव ते ।
सुतनु विसृजोत्कंपं संप्रत्यसाविह पाप्मनः
फलमनुभवत्युग्रं पापः प्रतीपविपाकिनः ॥

मालतीमाधव ५.

---

१ कांहीं वर्षांपूर्वीं दक्षिणा प्राईज कमिटीच्या विद्यमानें संस्कृत नाटकांचीं जीं भाषांतरें प्रसिद्ध झालीं त्या सर्वांत वरील नाटकाचें भाषांतर सर्वानुमतें सर्वोत्कृष्ट ठरलें आहे. हेंच इतकें चांगलें उतरण्याचें कारण त्या वेळच्या चिटणिसांनीं तें चांगलें तपासून कित्येक पद्यें तर नवींही करून घातलीं हें होय. वरील सर्व नाटकें दिवसानुदिवस दुर्मिळ होऊन अनेक पंडितांच्या दीर्घकालिक श्रमाचें फळ नष्ट होत चाललें आहे ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे !

--( सलज्जम् )

त्वत्पाणिपंकजपरिग्रहपुण्यजन्मा
भूयासमित्यभिनिवेशकदर्थ्यमानः ।
भ्राम्यन्नृमांसपणनाय परेतभूमा-
वाकर्ण्य भीरु रुदितानि तवागतोऽस्मि ॥

---

--दुरात्मन् ! पाषंड ! चांडाल !

असारं संसारं परिमुषितरत्नं त्रिभुवनं
निरालोकं लोकं मरणशरणं बांधवजनम् ।
अदर्पं कंदर्पं जननयननिर्माणमफलं
जगज्जीर्णारण्यं कथमसि विधातु व्यवसितः ॥

---

चामुंडेस बळी देण्याकरितां अघोरघंट मालतीस सिद्ध करीत असतां तिनें किंकाळी फोडली. ती माधवाच्या कानीं स्मशानांत येऊन त्याची तत्क्षणीं झालेली अवस्था--

माधवः--( सकूनमाकर्ण्य )

नादस्तावद्विकलकुररीकूजितस्निग्धतारः
चित्ताकर्षी परिचित इव श्रोत्रसंवादमेति ।
अंतर्भिन्नं भ्रमति हृदयं विह्वलत्यंगमंगं
देहस्तंभः स्खलति च गतिः कः प्रकारः किमेतत् ॥

---

पुढें तिजवरचें तें थोर प्राणसंकट प्रत्यक्ष पाहिल्यावर तें किती थोड्यानें चुकलें हें मनांत येऊन तो म्हणतोः--

माधवः--अहो न खलु भोः । तदेतत्काकतालीयं नाम । संप्रति हि

राहोश्चंद्रकलामिवाननचरीं दैवात्समासाद्य मे
दस्योरस्य कृपाणपातविषयादाच्छिंदतः प्रेयसीम् ।
आतंकाद्विकलं द्रुतं करुणया विक्षोभितं विस्मयात्
क्रोधेन ज्वलितं मुदा विकसितं चेतः कथं वर्तताम् ॥

---

त्या चमत्कारिक प्रसंगीं नानाप्रकारचे जे कल्होळ माधवाच्या मनांत एकदम उठले त्यांचें वर्णन वरील श्लोकांत किती उत्कृष्ट केलें आहे ! असे प्रसंग कल्पून ते वाचकाच्या किंवा प्रेक्षकाच्या समोर जसे काय हुबेहूब उठवून देण्यास मानवी स्वभावाचें म्हणजे मनुष्याच्या हृद्गतांचें मार्मिक ज्ञान ग्रंथकर्त्यास पूर्ण असावें लागतें. तें **भवभूतीनें** या स्थलीं उत्कृष्ट रीतीनें दाखविल्यावरून **विलसन्** साहेब प्रस्तुत नाटकावर अभिप्राय लिहितांना असें म्हणतात कीं, यासंबंधें **कालिदासा**वरही या कवीची कडी झाली आहे !

पुढील पद्यात करुणमिश्रित शृंगार आहे--

**निकामं क्षामांगी सरसकदलीगर्भसुभगा**
**कलाशेषा मूर्तिः शशिन इव नेत्रोत्सवकरी ।**
**अवस्थामापन्ना मदनदहनोद्दाहविधुरा—**
**मियं नः कल्याणी रमयति मनः कंपयति च ॥**

मालतीमाधव २.

मालतीचा नंदनाशीं विवाह ठरून जेव्हां माधव तिच्या प्राप्तीविषयीं अगदीं निराश झाला तेव्हांचे त्याचे दुःखोद्गार—

**चिरादाशातंतुस्त्रुटतु नलिनीसूत्रभिदुरो**
**महानाधिर्व्याधिर्निरवधिरिदानीं प्रसरतु ।**
**प्रतिष्ठामव्याजं व्रजतु मयि पारिप्लवधुरा**
**विधिः स्वास्थ्यं धत्तां भवतु कृतकृत्यश्च मदनः ॥**

अथवा ।

**समानप्रेमाणं जनमसुलभं प्रार्थितवतो**
**विधौ वामारंभे मम समुचितैषा परिणतिः ।**
**तथाप्यस्मिन् दानश्रवणसमयेऽस्याः प्रविगल-**
**त्प्रभं प्रातश्चंद्रद्युति वदनमंतर्दहति माम् ॥**

मालतीमाधव ४.

विनोदपर शृंगाराचें उदाहरण—

लवंगिका—**इयं तथा नाम यदात्थ किं वदा-**
**म्ययं त्वकस्माद्विकलः कथांतरे ।**

**कदंबगोलाकृतिमाश्रितः कथं**
**विशुद्धमुग्धः कुलकन्यकाजनः ॥**

मालतीमाधव ७.

चित्रपट पाहून पूर्ववृत्तांतांचे स्मरण झालें असतां निरनिराळ्या ठिकाणचें पूर्वानुभूत सुख राम वर्णितो--

**अलमलुलितमुग्धान्यध्वसंजातखेदात्**
**अशिथिलपरिमर्दैर्दत्तसंवाहनानि ।**
**परिमृदितमृणालीदुर्बलान्यंगकानि**
**त्वमुरसि मम कृत्वा यत्र निद्रामवाप्ता ॥**

उत्तररामचरित १.

**किमपि किमपि मंदं मंदमासत्तियोगात्**
**अविरलितकपोलं जल्पतोरक्रमेण ।**
**अशिथिलपरिरंभव्यापृतैकैकदोष्णो-**
**रविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ॥**[1]

---

पुष्पकविमानांत बसून राम अयोध्येस परत यावयास निघाला असतां सीतेचे प्रथम अभिज्ञान जें उत्तरीय तें सापडून जो त्यास हर्ष झाला त्याचें तो वर्णन करतो.--

**दृशोः शरच्छीतकरप्रकाशः**
**कायेऽपि कर्पूरपरागपूरः ।**
**स्वांतेऽपि साद्रामृतकुंभसेक-**
**स्तदा यदासीत् किल दृष्टमत्रम ॥**

महावीरचरित ७.

इतके वेचे पुरेत. इतक्यावरून **भवभूतीच्या** शृंगाराचे पूर्वोक्त स्वरूप वाचकांच्या ध्यानात आलेच असेल. आतां याच गोष्टीवरून **भवभूतीच्या** जीवनस्थितीविषयीं जो एक तर्क सुचतो तो येथें लिहून

---

१ ह्या श्लोकाविषयीं पंडितप्रसिद्ध जी आख्यायिका आहे ती आरंभीं सांगण्यांत आलीच आहे.

या रसाचें निरूपण समाप्त करूं. बाकीच्या सर्व संस्कृत कवींहून याच कवीचे ठायीं जो शृंगारवर्णनाच्या संबंधानें विशेष आढळतो त्याचें तसेंच कांहीं कारण असल्यावांचून तो संभवत नाहीं. हें कारण कवीचा जन्मसिद्ध स्वभावच मुख्यतः होय. पण ज्या अर्थी मनुष्याचा मूळचा स्वभाव शेवटपर्यंतही तसाच प्रायः न राहून संसारांतील नानाविध प्रसंगांनीं पुष्कळ अंशीं उणा अधिक होत असतो, त्याअर्थी त्यांचाही विचार करणें अगदीं अवश्य होय. भवभूतीचा कुलवृत्तांत आरंभीं दिला आहे त्यावरून तो घरचा संपन्न असेल असें मुळींच वाटत नाहीं. पुढे त्याची कावत्वशक्ति प्रगट झाल्यावर चोहोकडे कीर्ति होऊन त्याचा भाग्योदय व्हावयाचा,—म्हणजे प्राचीन राजांच्या सांप्रदाया-प्रमाणे कवित्वगुणास भुलून किंवा केवळ कीर्तीसाठीं एकाद्या राजानें त्यास आपल्या पदरीं ठेवून त्याची मानमान्यता वाढवावयाची. पण आपल्या कवीस लोककीर्ति किंवा राजसत्कार यापैकीं कोणतेंही मिळालें नाहीं हे वर सांगण्यात आलेंच आहे. अशी दुर्भाग्याची स्थिति आपणास येण्यास तरी तोच स्वतः कारण झाला असावा यांतही तिळमात्र संदेह नाहीं. अलीकडे मात्र इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे ज्ञानसंपन्न देशांत गुणी मनुष्यास कोणाचांही हाजी हाजी करणे न पडून गुणास विशेष शोभा देणारा जो निःस्पृहपणा तो भोगता येण्यास सवड झाली आहे. कारण लोकात ज्ञानाचा पुष्कळ प्रसार झाल्यामुळें गुणाचे चाह-तेही बहुत होऊन ग्रंथकर्त्यांस त्याच्या योग्यतेनुरूप लोकांपासूनच आश्रय मिळतो. पण अशी स्थिति आजपर्यंत कोणत्याही देशात नव्हती. ज्या कोणास प्रसिद्धीस येणे असे त्याच्या आगीं केवढाही मोठा गुण असला तरी लज्जोत्सर्ग करून आत्मश्लाघा केल्याखेरीज व आपल्या प्रभूंच्या मनोधारणार्थ वाग्देवीस नर्तकीप्रमाणें नाचविल्याखेरीज त्यास दुसरा उपायच नसे. सध्याच्या काळीं सारज्ञ पुष्कळ असल्यामुळें जरी कांहीं मत्सरी असले तरी सगळेच तसे नसतात, व एकंदर लोकांसही गुणाची थोडाबहुत परीक्षा असतेच. यास्तव गुणिजनांची हेळसांड सहसा होत नाहीं. पण प्राचीन काळीं असें कांहींच नसे. तेव्हांची दुःखकारक स्थिति भर्तृहरीनें स्वतःच्या अनुभवावरून अगदीं बरोबर वर्णिली आहे:—

**बोद्धारो मत्सरग्रस्ताः प्रभवः स्मयदूषिताः ।**
**अबोधोपहताश्चान्ये जीर्णमंगे सुभाषितम् ॥**

" ज्यांस गुणाची परीक्षा आहे ते हेवेखार; राजे तर गर्वाखालीं मरणार; व इतर लोक काय! त्यांस कांहीं कळतच नाहीं; यास्तव कवित्वशक्ति उदयास न येतां आतल्याआंतच जिरून जाते! " असो. याप्रमाणें ग्रंथकारांचे गुण प्रसिद्ध होण्यास त्या काळीं फार अडचणी असत; व हांजी हांजी करणें ज्यांस साधत नसे, किंवा तसें करण्याचा ज्यांस मनापासून त्रास असे, त्यांवर लक्ष्मीची कृपा होण्याचा मार्ग मुळींच खुंटला म्हणून समजावयाचें. हीच गति **भवभूती**ची झाली असावी असें वाटतें. कारण त्या वेळेस सर्व देश हिंदु राजांच्या सत्तेतच असल्यामुळें **भवभूती**सारख्या कविमणीचाही अव्हेर करून घरीं चालत आलेलें भाग्य कोणी दवडता असें वाटत नाहीं! पण आपल्या कवीच्या गंभीर व उदार मनास राजाचें अंकित होऊन वैभव भोगण्यापेक्षां दारिद्रावस्थेंतच स्वतंत्र राहून आपल्या वाग्देवतेस निष्कलंक ठेवणें अधिक रुचलें असावें असें दिसतें. हा त्याचा दृढ निश्चय निंदकाच्या अवज्ञेनें किंवा आपल्या कृतींची हवी तशी प्रसिद्धि न झाल्यामुळें पुढें त्या कदाचित् बुडतील या भयानेंही तिळमात्र देखील ढळला नाहीं; व स्वकवित्वाच्या गुणाची त्यास इतकी पक्की खात्री होती, व इतका विलक्षण धिमेपणा आंगीं होता कीं, आपल्या वेळच्या लोकांच्या निंदेनें खचून न जातां पुढील काळावरच त्यानें सारखी नजर ठेविली व स्वकृतींचें अभिनंदन तेव्हा होईल असा भविष्यवाद केला. या गोष्टी परम आश्चर्याच्या होत, व यांवरून आपल्या कवीचें मन केवढें थोर असावें याची सहज कल्पना होते! असो; याप्रमाणें **भवभूतीस** राजदरबारचा संपर्क कधींच न लागल्यामुळें त्याच्या मनाच्या आद्य स्थितींत कधींही फेर पडला नाहीं व म्हणूनच त्याच्या शृंगारवर्णनांत इतकी अपूर्व शुद्धता दृष्टीस पडते असें आमचें अनुमान होतें.

वीररस हा **भवभूतीनें** तिन्ही नाटकांत साधला आहे. 'महावीरचरितां'त तर तो प्रधानच आहे. व बाकीच्या दोहोंत तो कोणकोणत्या प्रसंगीं आणला आहे हेंही वर त्यांच्या संविधानकांत सांगण्यांत

आलेंच आहे. हीं पुढील या रसाचीं कांहीं उत्कृष्ट उदाहरणें होत:—

जामदग्न्य:—अहो दुरात्मन: क्षत्रियबटोरनात्मज्ञता !

न त्रस्तं यदि नाम भूतकरुणासंतानशांतात्मन-
स्तेन व्यारुजता धनुर्भगवतो देवाद्भवानीपते: ।
तत्पुत्रस्तु मदांधतारकवधाद्विश्वस्य दत्तोत्सव:
स्कंद: स्कंदवदप्रियोऽहमथवा शिष्य: कथं न श्रुत: ॥

एष मे प्रशमस्य कर्कश: परिणाम: ।

यत्क्षत्रियेष्वपि पुन: स्थितमाधिपत्यं
तैरेव संप्रति धृतानि पुनर्धनूंषि ।
उन्माद्यतां भुजबलेन मयाऽपि कष्ट-
मुच्छृंखलानि चरितानि पुन: श्रुतानि ॥

महावीरचरित २.

——आ: क्षत्रियबटो अति नाम प्रगल्भसे ।
प्रहर नमतु चापं प्राकप्रहारप्रियोऽहं
मयि तु कृतनिघाते किं विदध्या: परेण ।
धिगितिविततवन्ह्युद्गारभास्वत्कुठार-
प्रविघटितकठोरस्कंधबंध: कबंध: ॥

——

——एतस्य राघवशिशो: कृतचापलस्य
लूत्वा शिरो मयि वनाय पुन: प्रयाते ।
स्वस्थाश्चिराय रघवो जनकाश्च संतु
मा भूत् पुनर्बत कथंचिदतिप्रसंग: ॥

महावीरचरित ३.

'महावीरचरितां'त पहिल्यापासून शेवटपर्यंत रामाच्या पराक्रमांचेंच वर्णन मुख्यत: असल्यामुळें तें प्राय: वीररसमयच होय. यास्तव त्यांतील उतारे जितके घ्यावे तितके थोडेच. आतां या वीररसास विशेष शोभा देणारा जो एक दुसरा गुण भवभूतीच्या नाटकांतलि भाषणांत कोठें कोठें आढळतो तो मात्र येथें सांगतों. तो हा कीं,

वरील भाषणें वीरश्रीस साजण्यासारखीं असून त्यांत दांडगेपणा नसतो, तर उलटीं विनय व चातुर्य यांनीं युक्त अशींच तीं असतात:—

वालिरामौ—( अन्योन्यमुद्दिश्य )

कामं त्वया सह श्लाघ्यो वीरगोष्ठीमहोत्सवः ।
किं त्विदानीमतिक्रांते त्वय्यवीरा वसुंधरा ॥

महावीरचरित ५.

तसेंच,

चंद्रकेतुः—भो भोः कुमार !

अत्यद्भुतादपि गुणातिशयात्प्रियोऽसि
तस्मात्सखा त्वमसि यन्मम तत्तवैव ।
तत्किं निजे परिजने कदनं करोषि
नन्वेष दर्पनिकषस्तव चंद्रकेतुः ॥

उत्तररामचरित ५.

मालतीच्या प्राणसंकटसमयीं माधव चामुंडेच्या देवळांत अकस्मात् गेला असतां तो अघोरघंटावर तरवार उचलून त्यास धिक्कारपूर्वक क्रोधानें म्हणतो—

माधवः—रे रे पाप !

प्रणयिसखीसलीलपरिहासरसाधिगतै-
र्ललितशिरीषपुष्पहननैरपि ताम्यति यत् ।
वपुषि वधाय तत्र तव शस्त्रमुपाक्षिपतः
पततु शिरस्यकांडयमदंड इवैष भुजः ॥

मालतीमाधव ५.

त्याचप्रमाणेंच अंमळ पुढें,

———अयि भीरु !

धैर्यं निधेहि हृदये हत एष पापः
किंवा कदाचिदपि केनचिदन्वभावि ।
सारंगसंगरविधाविभकुंभकूट-
कुट्टाकपाणिकुलिशस्य हरेः प्रमादः ॥

चंद्रकेतु व लव यांची गांठ पडून परस्पर वीरभाषणें झालीं. त्यांत लव रामाच्या संबंधें असूयापूर्वक उपहास करून म्हणतो—

सिद्धं ह्येतद्वाचि वीर्यं द्विजानां
बाह्वोर्वीर्यं यत्तु तत्क्षत्रियाणाम् ।
शस्त्रग्राही ब्राह्मणो जामदग्न्यः
तस्मिन् दांते का स्तुतिस्तस्य राज्ञः ॥

उत्तररामचरित ५.

वृद्धास्ते न विचारणीयचरितास्तिष्ठंतु हुं वर्तते
सुंदस्त्रीदमनेऽप्यखंडयशसो लोके महांतो हि ते ।
यानि त्रीण्यकुतोभयान्यपि पदान्यासन् खरायोधने
यद्वा कौशलमिंद्रसूनुदमने तत्राप्यभिज्ञो जनः ॥

---

आतां यापुढे करुणारस. वरील दोहोंचीं मुख्य स्थानें जशीं मालतीमाधव ' व ' महावीरचरित ' हीं अनुक्रमें होत, तसें य रसाचें मुख्य स्थल ' उत्तररामचरित ' होय. आठ रसांपैकीं मुख्य जे पहिले तीन त्यांपैकीं प्रत्येकाची बहार एकेका नाटकांत करून द्यावी असा भवभूतीचा उद्देश दिसतो. त्यांतून पहिल्या दोहोंचे उतारे वर झालेच; त्यावरून ते मनावर उठवून देण्याचें सामर्थ्य आपल्या कवीचे ठायीं किती आहे हें आमच्या रसिक वाचकांस पूर्णपणें समजलेंच असेल. तसेंच सांप्रत रसाचाही परिपाक त्यानें कितपत उतरविला आहे याचाही पुढे येणाऱ्या उताऱ्यांवरून त्यांस सहज प्रत्यय येईल अशी आमची खातरी आहे. परंतु तसें करण्यापूर्वीं वर सांगितलेलीच एक गोष्ट येथें पुनः वाचकांस एकवार कळावली पाहिजे. ती अर्थात् हीच की, नाटकांतील पद्यें वगैरे निराळीं काढलीं असतां तीं पूर्वापर संदर्भ तुटल्यामुळें बहुधा नीरस होतात; म्हणजे सगळा अंक किंवा सगळें नाटक वाचलें असतां त्यांतील एकाद्या भाषणचा वगैरे रसानुभव जसा पूर्ण व यथास्थित होतो तसा नुसतें तेंच वाचून कांहींच होत नाहीं. तथापि ज्या अर्थीं हा निबंध एके रीतीनें उपोद्घातरूप आहे—म्हणजे त्या त्या कवीच्या ग्रंथांत प्रवेश होऊन त्यांचें मार्मिका

ज्ञान कांहीं तरी वाचकास व्हावें असा याचा उद्देश होय—त्या अर्थी पूर्वक्रमास अनुसरून भवभूतीच्या नाटकांतील करुणरसाचीं कांहीं उदाहरणें येथें दाखवितो. तीं अर्थांतच अपुरतीं असतील, व त्यांवरून वरील रसाचें जें स्वरूप वाचकाच्या ध्यानांत येईल तेही तसेंच अंशतः मात्र. असो.

दुर्मुखानें सीतेविषयींचा जनापवाद रामाच्या कानांत सांगितला असतां तो तत्क्षणीं मूर्च्छित होऊन पडला. मग पुनः सावध होतांच तो आपणाशीं म्हणतो—

रामः----( आश्वस्य )

हा हा धिक् परगृहवासदूषणं यद्
वैदेह्याः प्रशमितमद्भुतैरुपायैः ।
एतत्तत्पुनरपि दैवदुर्विपाका-
दालर्कं विषमिव सर्वतः प्रसृतम् ॥

या मंदगति छंदाची योजना येथील प्रसंगास फार अनुकूल होय असें आम्हांस वाटतें. रामाच्या हृदयास जो धक्का बसला त्यामुळें त्याचा कंठ दाटून येऊन वरील हृदयोद्गार तो मोठ्या कष्टानें काढीत आहे असा केवळ श्रवणमात्रेंकरून भास होतो!

पुढें निद्रिस्त सीतेस उद्देशून तो म्हणतो--

त्वया जगंति पुण्यानि त्वय्यपुण्या जनोक्तयः ।
नाथवंतस्त्वया लोकास्त्वमनाथा विपत्स्यसे ॥

नंतर तिला वनांत सोडण्याचा क्रूर संकल्प करून त्या तजविजीस त्यानें दुर्मुखास पाठविल्यावर, हा मी घातकी आपल्या दुष्ट स्पर्शानें देवीस कशास विटाळूं असें म्हणून रामानें तिच्या आंगाखालचा हात काढून घेतला, आणि म्हणतो—

अपूर्वकर्मचांडालमयि मुग्धे विमुंच माम् ।
श्रितासि चंदनभ्रांत्या दुर्विपाकं विषद्रुमम् ॥

तसेंच,

विश्रंभादुरसि निपत्य लब्धनिद्रा-
मुन्मुच्य प्रियगृहिणीं गृहस्य शोभाम् ।

**आतंकस्फुरितकठोरगर्भगुर्वी**
**क्रव्याद्भ्यो बलिमिव निर्घृणः क्षिपामि ॥**

उत्तररामचरित १.

लोकाराधनासाठीं रामाने मनाचा मोठा हिय्या करून सीतेचाही तत्क्षणीं परित्याग केला खरा, पण ती गोष्ट पुढें सतत त्याच्या जिवास लागून राहिली. तिचा विरह आधींच दुःसह, त्यांत तिच्याशीं त्यानें जो घातकीपणा केला त्यामुळें तर तो अत्यंत तीव्र होऊन त्याच्या हृदयाशीं अगदीं भिनून गेला. रामाचा हा पुढील उद्गार किती स्वाभाविक व किती हृदयभेदक आहे !--

**रे हस्त दक्षिण मृतस्य शिशोर्द्विजस्य**
**जीवातवे विसृज शूद्रमुनौ कृपाणम् ।**
**रामस्य गात्रमसि दुर्वहगर्भखिन्न-**
**सीताविवासनपटोः करुणा कुतस्ते ॥**

उत्तररामचरित २.

ज्या दंडकारण्यांतील रम्य प्रदेशांत नुकतेच कांहीं वर्षे पूर्वी रामानें सीतेच्या समागमानें आनंदानें दिवस घालविले तेच पुनः प्रसंगवशात् दृष्टीस पडले असता जी त्याची अवस्था होऊन गेली ती पुढील पद्यांत किती उत्कृष्ट उतरली आहे !—

रामः--हंत परिहरंतमपि मामितः पंचवटीस्नेहो बलादपकर्षतीव ।

**यस्यां ते दिवसास्तया सह मया नीता यथा स्वे गृहे**
**यत्संबंधिकथाभिरेव सततं दीर्घाभिरास्थीयते ।**
**एकः संप्रति नाशितप्रियतमस्तामद्य रामः कथं**
**पापः पंचवटीं विलोकयतु वा गच्छत्वसंभाव्य वा ॥**

———२.

**यत्र द्रुमा अपि मृगा अपि बंधवो मे**
**यानि प्रियासहचरश्चिरमध्यवात्सम् ।**
**एतानि तानि बहुनिर्झरकंदराणि**
**गोदावरीपरिसरस्य गिरेस्तटानि ॥**

———३.

वर सांगितल्याप्रमाणें राम दंडकारण्यातील निरनिराळीं पूर्वपरिचित स्थलें पहात असतां त्यास तेथील वनदेवता वासंती सीतेची सखी ती भेटली. तिला सीताविवासनचा वृत्तान्त कळला होता. यास्तव त्या वनासंबंधाच्या इकडच्या तिकडच्या भाषण अगोदर झाल्यावर तिनें डोळ्यांत आसवें आणून रामास पुसलें, 'महाराज, कुमार लक्ष्मण बरा आहे ना ?' पण रामाचें चित्त ते पूर्वपरिचित स्थल पाहण्यात अगदीं चूर झालें होतें; यास्तव वासंतीशीं बोलत असताही तिचा वरील प्रश्न मुळींच न ऐकता तो आपणाशींच म्हणतो---

करकमलवितीर्णैरंबुनीवारशष्पै-
स्तरुशकुनिकुरंगान् मैथिली यानपुष्यत् ।
भवति मम विकारस्तेषु दृष्टेषु कोऽपि
द्रव इव हृदयस्य प्रस्तरोद्भेदयोग्यः ॥

उत्तररामचरित ३.

वासंतीनें तोच प्रश्न पुनः केला. तो ऐकतांच तिचा आशय[1] जाणून रामास फारच गहिंवर आला, व तो रडूं लागला.

पुढें रामानें सीतेशीं जो कठोरपणा केला त्याजबद्दल वासंती त्याचा उपालंभ करते---

त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं
त्वं कौमुदी नयनयोरमृतं त्वमंगे ।
इत्यादिभिः प्रियशतैरनुरुध्य मुग्धां
तामेव शांतमथवा किमिहोत्तरेण ॥

---

अयि कठोर यशः किल ते प्रियं
किमयशो ननु घोरमतः परम् ।

---

१ वासंतीनें आपली प्रियसखी सीता हिजविषयीं अगोदर पुसायचें, पण तिचा प्रंथच मुळीं आटपला हें जाणून तिने लक्ष्मणाविषयींच प्रश्न केला. ही एक गोष्ट रामाच्या जिवास लागून त्यास गहिंवर आला. व दुसरें असें कीं, पूर्वींचा त्याचा अत्यंत स्नेहभाव असताही अपरिचिताप्रमाण बहुमानपूर्वक 'महाराज' असें संबोधन तिनें योजलें !

**किमभवद्विपिने हरिणीदृशः**
**कथय नाथ कथं बत मन्यसे ॥**

उत्तररामचरित ३.

मागे **कालिदासा**विषयीं लिहितांना ' शाकुंतला ' च्या चवथ्या अंकांतील करुण व वत्सल रसानें थबथबलेले आणि प्राचीन काळापासून रसिकप्रिय होऊन राहिलेले चार श्लोक सांगितले होते; त्यांच्याच तोडीचे वरील दोन होत. त्यांच्या योगानें तिसऱ्या अंकास, ' उत्तररामचरित ' नाटकास, **भवभूतीं**च्या ग्रंथांस, व एकंदर संस्कृत भाषेस मोठी शोभा आली आहे !

दुःखावेग केवळ असह्य झाले असतां रामाचा हृदयोद्गार--

**हाहा देवि स्फुटति हृदयं स्रंसते देहबंधः**
**शून्यं मन्ये जगदविरतज्वालमंतर्ज्वलामि ।**
**सीदन्नंधे तमसि विधुरो मज्जतीवांतरात्मा**
**विष्वङ्मोहः स्थगयति कथं मंदभाग्यः करोमि ॥**

उत्तररामचरित ३.

सीतेचा वनांत घात झाला असें समजून जनकराजा शोक करितो:—

जनकः—हा वत्से !

**नूनं त्वया परिभवं च वनं च घोरं**
**तां च व्यथां प्रसवकालकृतामवाप्य**
**क्रव्याद्गणेषु परितः परिवारयत्सु**
**संत्रस्तया शरणमित्यसकृत् स्मृतोऽस्मि ॥**

उत्तररामचरित ४.

इतके उतारे बहुधा पुरे आहेत. तथापि आणखी एक चमत्कारिक आहे यास्तव येथं घालतों. जानकीच्या विरहाचें दुःख अंमळ हलकें व्हावें यास्तव पूर्ववृत्तांतस्मारक अशीं अनेक स्थानें राम पहात असतां

एका लतागृहांत म्हणजे कुंजात पूर्वी घडलेला वृत्तांत वासंती निवेदन करते—

वासंती—देवदेव !

**अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवस्तन्मार्गदत्तेक्षणः**
**सा हंसैः स्थिरकौतुका चिरमभूद्गोदावरीरोधसि ।**
**आयंत्या परिदुर्मनायितमिव त्वां वीक्ष्य बद्धस्तया**
**कातर्यादरविंदकुड्मलनिभो मुग्धः प्रणामांजलिः ॥**

वरील चुटक्यांत किती नाजुक व किती खुबीदार प्रसंग कवीने कल्पिला आहे ! व सर्व आयुष्यात अत्यंत मनोहर जी मुग्धावस्था ती रामाची व सीतेची वरील पद्यांत किती उत्कृष्ट शब्दांनीं रेखली आहे ![1]

**भवभूती**ची करुणरसाविषयीं हद्द आहे अशी त्याची पूर्वापार-पासून कीर्ति चालत आली आहे. आपल्या जुन्या पंडितात मोठमोठ्या

---

१ असाच एक अत्यंत हृद्य प्रसंग कल्पून कालिदासानें 'शाकुंतल' नाटकांत घातला आहे. तोही येथें लिहिल्यावाचून आमच्यानें राहवत नाहीं. तो असा:—

शकुंतलेस दुष्यंताकडे पाठविली असता तिचा तो अंगिकार करीना. तेव्हां शकुंतला राजास स्मरण देण्याकरिता त्याच्या मुद्रेची आंगठी हातांतून काढूं लागली. पण ती नाहींशी पाहून तीबद्दल पूर्वी झालेली एक ध्यानांत राहण्यासारखी गोष्ट तिनें दुष्यंतास सांगतली. ती ही—

"नन्वेकस्मिन् दिवसे नवमालिकामंडपे नलिनीपत्रभाजनगतमुदकं तव हस्ते सान्निहितमासीत् । तत्क्षणं स मे पुत्रकृतको दीर्घापांगो नाम मृगपोतक उपस्थितः । त्वया अयं तावत्प्रथमं पिबतु इत्यनुकंपिना उपच्छंदितः उदकेन न पुनस्ते अपरिचय द्धस्ताभ्यासमुपगतः । पश्चात्तस्मिन्नेव मया गृहीते सलिले अनेन कृतः प्रणयः । तदा त्वमित्थं प्रहसितोऽसि । सर्वः सगंधेषु विश्वसिति द्वावप्यत्रारण्यकाविति ।"

अंक ५.

संस्कृत कवीविषयीं कांहींना कांहीं तरी पद्य किंवा वाक्य सर्वांच्या तोंडीं असतेंच. **भवभूती**विषयीं असें आहे--

**कारुण्यं भवभूतिरेव तनुते**[1]--

"करुणरस असा **भवभूतीनेच** साधावा." आणि खरोखरीच सर्व संस्कृत कवींमध्ये यासंबंधे त्याच्या बरोबरीचे असे दोन तीनच कदाचित् निघतील, व त्याहून वरचढ असा तर कोणीच नाहीं. यास्तव मागें **कालिदासाचा** कवित्वगुणविशेष जसा उदात्तरस सांगितला होता, तसा **भवभूतीचा** हा करुणरस म्हटल्यास साजेल.

हा रस उठवून देण्याची हतोटी आपल्या कवीस इतकी अपूर्व कशी साधली हें समजण्यास तरी फार खोल विचारांत शिरलें पाहिजे असें नाहीं. कवित्वाचें तत्व सहृदयता होय,--म्हणजे सामान्यजनांत व कवींत विशेष म्हणून येवढाच कीं, हृदयाच्या नानाविध वृत्ति, ( ज्यांस ' रस ' अशी पारिभाषिक संज्ञा आहे ) त्या त्यास स्वभावतःच अत्यंत सूक्ष्मत्वानें व स्पष्टत्वाने भासतात. ही शक्ति **भवभूतीचे** ठायीं स्वभावसिद्ध असून तिला दुसऱ्याही दोन गुणांचे साहित्य होतें. ते त्याच्या मनाची कोमलता व शुद्धता हे होत. या त्याच्या गुणांच्या संबंधाने वर बराच विस्तार झाला आहे, व ते त्याच्या मनास किती अत्यंत अंगभूत होऊन राहिले होते याचें उत्कृष्ट प्रमाण हें कीं, शृंगार व वीर यांतही ते अगदीं स्पष्ट दिसत आहेत. मग करुणरसांत तर काय ! येथें अर्थातच ते आवश्यक असे. त्यामुळें या रसाच्या परमोत्कर्षास ते सहजच कारणीभूत झाले आहेत.

पूर्वोक्त तीन रसांशिवाय इतर जे रस भवभूतीच्या नाटकांत आहेत त्यांचे उतारे येथें घेण्याची गरज दिसत नाहीं. कां कीं, त्यांपैकीं कांहीं केवळ गौण म्हणजे प्रसंगवशात् साधलेले आहेत; व कांहीं स्वरूपतः म्हणजे पृथग्भूत असे न दिसून अन्यरसांतर्गतच होत. हे **भवभूतीनें** कोठें कोठें आणले आहेत हेंही प्रत्येक नाटकाच्या वर्णनांत

---

१ हें केवळ वाक्य आहे किंवा एकाद्या सगळ्या श्लोकाचे तुटक शब्द आहेत हें आमच्यानें सांगवत नाहीं. इतकें मात्र दिसतें कीं, शार्दूलविक्रीडित छंदाप्रमाणें याची रचना आहे.

वर सांगितलेंच आहे; त्यावरून तीं स्थलें आमच्या जिज्ञासू वाचकांस सहज शोधून काढतां येतील.

मागे एके प्रसंगीं सृष्टिवर्णनाचा प्रकार संस्कृत कवितेंत कितपत आढळतो याविषयीं काहीं लिहून तिजमध्यें व आलीकडाल इंग्लिश कवितेमध्यें यासबंधानें कोणता मोठा फरक दिसून येतो हे सांगितलें होतें. तथापि प्रस्तुत प्रसंगीं **भवभूती**च्या संबंधाने इतकें अवश्य लिहिलें पाहिजे कीं, पूर्वीं एकंदर संस्कृत कवींविषयीं जो आक्षेप केला आहे तो त्यासच एकास मात्र लागत नाहीं. आलीकडील इंग्लिश कवींच्या थाटावर केलेलें सृष्टिवैभवाचें वर्णन त्याच्याच ग्रंथांत मात्र आढळतें. बाकीच्या कवींनीं हें वर्णन मुळींच केलें नाहीं असें नाहीं; पण तें निराळया प्रकारचें. काहीं अत्यंत प्रसिद्ध व ठरीव गोष्टींस सोडून तें कधींहि नसावयाचें; व यावरून अशीही शंका घेण्यास जागा राहते कीं, त्यांतील कित्येकांनीं—निदान आलीकडच्यानीं तरी—स्वतः वर्णिलेल्या सृष्टिचमत्काराचा अनुभव प्रत्यक्ष न घेता केवळ प्राचीन ग्रंथांवरूनच घेतला असावा. असो. अशा कवींपैकीं **भवभूति** नव्हता असें आम्हास खास वाटतें, व सर्वांसही बहुधा असेंच वाटेल. **वर्डस्वर्थ्** कवीविषयीं अशी प्रसिद्धि आहे कीं, त्यानें आपल्या डोळ्यानीं जो पाहिला नाहीं असा सृष्टींतील पदार्थ किंवा चमत्कार त्यानें एकही वर्णिला नाहीं. हीच गोष्ट आपल्या कवीसही लागेल; कां कीं, सर्व संस्कृत कवींत विशेषेंकरून त्यानेंच जें अनेक प्रसंगीं सृष्टिसौंदर्याचें इतकें उत्कृष्ट वर्णन केलें आहे तें केवळ स्वकपोलकल्पित व अवास्तवच असेल हें म्हणणें समंजस दिसत नाहीं. बाकीच्या संस्कृत कवींच्या आणि **भवभूती**च्या ( तसेंच इंग्लिश कवींच्याही ) सृष्टिवर्णनांत दुसरा असाहि एक मोठा भेद स्पष्ट दिसून येतो कीं, पहिल्याचें वर्णन प्रायः अलंकाररूप—म्हणजे उपमा, रूपक, उत्प्रेक्षा इत्यादिगर्भित असतें; पण दुसऱ्यांचें तसें नसून नुसतें साधेंच असतें—म्हणजे त्या त्या सृष्ट पदार्थांचें केवळ स्वरूपतःच वर्णन केलेलें असतें. यावरून असें दिसतें कीं, वनश्रीचीं तऱ्हेतऱ्हेचीं रूपें पाहण्याचा **भवभूती**स जात्याच

फार छेद असावा. असो. या गोष्टीचा प्रत्यय आमच्या वाचकांस पुढील उताऱ्यांवरून सहज येणार आहे:—

दंडकारण्यांतील सृष्टिवैभवाचें वर्णन:—

इह समदशकुंताक्रांतवानीरवीरुत्-
प्रसवसुरभिशीतस्वच्छतोया वहंति ।
फलभरपरिणामश्यामजंबूनिकुंज-
स्खलनमुखरभूरिस्रोतसो निर्झरिण्यः ।

उत्तररामचरित २

एते त एव गिरयो विरुवन्मयूरा-
स्तान्येव मत्तहरिणानि वनस्थलानि ।
आमंजुवंजुललतानि च तान्यमूनि
नीरंध्रनीलनिचुलानि सरित्तटानि ॥

---

एते ते कुहरेषु गद्गदनदद्गोदावरीवारयो
मेघालंबितमौलिनीलशिखरा क्षोणीभृतो दक्षिणाः ।
अन्योन्यप्रतिघातसंकुलचलत्कल्लोलकोलाहलै-
रुत्तालास्त इमे गभीरपयसः पुण्याः सरित्संगमाः ॥

उत्तररामच. २

रामः—देवि । रमणीयमेतत्पंपासरः ।

एतास्मिन् मदकलमल्लिकाख्यपक्ष-
व्याधूतस्फुरदुरुदंडपुंडरीकाः ।
बाष्पांभः परिपतनोद्गमांतराले
संदृष्टाः कुवलयिनो भुवो विभागाः

---

' मालतीमाधवा 'चा नववा अंक सृष्टींतील निरनिराळ्या देखाव्याच्या वर्णनांनीं भरला आहे. तो आमच्या वाचकांपैकीं ज्यांस काव्यपरिचयाच्या योगानें तशा प्रकारची रसिकता प्राप्त झाली असेल त्यांनीं समग्र वाचण्यासारखा आहे. सध्यां एकंदर वाचकांसाठीं त्यांतील कांहीं वेंचे घेतो.—

सौदामिनी—भोस्तथाहमुत्पतिता यथा सकल एष गिरिनगरग्रामसरिदरण्यव्यतिकरश्चक्षुषा परिक्षिप्यते ।

( पश्चाद्विलोक्य ) साधु साधु ।

पद्मावतीविमलवारिविशालसिंधु-
पारासरित्परिकरच्छलतो बिभर्ति ।
उत्तुंगसौधसुरमंदिरगोपुराट्ट-
संघट्टपाटितविमुक्तमिवांतरिक्षम् ॥

अपि च ।

सैषा विभाति लवणा ललितोर्मिपंक्ति-
रभ्रागमे जनपदप्रमदाय यस्याः ।
गोगर्भिणीप्रियनवोलपमालभारे
सेव्योपकंठविपिनावलयो विभांति

[ अन्यतोऽवलोक्य ] अयमसौ भवगत्याः सिंधोर्दारितरसातलप्रायस्तट-प्रपातः ।

यत्रत्य एष तुमुलो ध्वनिरंबुगर्भ-
गंभीरनूतनघनस्तनितप्रचंडः ॥
पर्यंतभूधरनिकुंजविजृंभणोथ-
हेरंबकंठरसितप्रतिमानमेति ॥

एताश्चंदनाश्वकर्णसरलपाटलप्रायतरुगहनाः परिणत-भासुरसुरभयोऽरण्यगिरिभूमयः स्मारयंति खलु तरुणकदंबजंबूवनावनद्धांधकारगुरुनिकुंजगभीरगह्वरो-द्गारगोदावरीरवमुखरितविशालमेखला भुवो दाक्षिणा-रण्यभूधरान् ॥ अयं च मधुमतीसिंधुसंभेदपावनो भगवान् भवानीपतिरपौरुषेयप्रतिष्ठः सुवर्णबिंदुरि-त्याख्यायते—

मकरंदः— सखे प्रसीद । पश्य ।

वानीरप्रसवैर्निकुंजसरितामासक्तवासं पयः
पर्यंतेषु च यूथिकासुमनसामुज्जृंभितं जालकैः ।
उन्मीलत्कुटजप्रहासिषु गिरेरालंब्य सानूनितः
प्राग्भारेषु शिखंडिताडवविधौ मेघैर्वितानायते ॥

राम, सीता इत्यादि सर्व पुष्पकविमानात बसून परत अयोध्येकडे निघालीं असता मलयाचलाकडे बोट दाखवून राम लक्ष्मणास म्हणतो:—

राम:—[ अंगुल्या निर्दिशन् ] वत्स ।

एता भुवः परिचिनोषि मिलत्तमाल-
च्छायांधकारिततुषारनिकुंजपुंजाः ।
उन्मूर्च्छदच्छमलयाचलतुंगशृंग-
प्राग्भारनिष्पतितनिर्झरपूरभाजः ॥

महावीरचरित ७

लक्ष्मणासही तेथील एका पूर्ववृत्तांताची आठवण होऊन तो त्याचें वर्णन करतो. हा प्रसंग वर्षाकाळच्या एका रात्रीं त्याची जी अवस्था झाली ती होय:—

गर्ज्जाजर्ज्जरितासु दिक्षु बधिरे तत्स्फूर्जथुस्फूर्जितै-
र्व्योम्नि भ्राम्यति दुष्प्रभंजनजवादभ्रेऽप्यदभ्रे मुहुः ।
आक्षिप्यांधयति द्रुमांधतमसे चक्षुः प्रविश्य क्षपा
यत्रासीत् क्षपिता क्षरज्जलधरे त्वत्सारलक्षीकृते ॥

---

वरील सर्व उतारे बाह्यसृष्टिवर्णनपर झाले. आतां अंत:सृष्टीचें म्हणजे अंतःकरणाच्या नानाविध वृत्तींचें वर्णन भवभूतीनें ज्या ज्या स्थलीं केलें आहे त्यांतील कित्येक येथें घेतों—

सीतेचा हात स्वतःच आपल्या गळ्यांत घालून तें सुख अनुभवीत होत्साता राम म्हणतो—

विनिश्चेतुं शक्यो न सुखमिति वा दुःखमिति वा
प्रमोहो निद्रा वा किमु विषविसर्पः किमु मदः ।
तव स्पर्शे स्पर्शे मम हि परिमूढेंद्रियगणो
विकारश्चैतन्यं भ्रमयति च संमीलयति च ॥

उत्तररामचरित १

राम मूर्छित झाल्यावर सीतेनें अदृश्यरूपानें त्याच्या ललाटास स्पर्श केला असतां पुनः सावध होऊन तो म्हणतो—

स्पर्शः पुरा परिचितो नियतं स एष
संजीवनश्च मनसः परिमोहनश्च ।
संतापजां सपदि यः प्रतिहत्य मूर्छा-
मानंदनेन जडतां पुनरातनोति ॥

लवाने रामास पाहतांच त्याची शत्रुत्वाची व औद्धत्याची वृत्ति एका-एकीं मावळून जी मनाची अवस्था झाली ती तो वर्णितो--

लवः—आश्चर्यम !

विरोधो विश्रांतः प्रसरति रसो निर्वृतिघन-
स्तदौद्धत्यं क्वापि व्रजति विनयः प्रह्वयति माम् ।
झटित्यस्मिन् दृष्टे किमपि परवानस्मि यदि वा
महार्घस्तीर्थानामिव हि महतां कोऽप्यतिशयः ॥

——— ६

याशिवाय दुसऱ्याही अनेक प्रसंगीं भवभूतीनें वर्णन केलें आहे. तें भिन्न भिन्न रसांत आहे, यास्तव त्याचे चुटके येथें अनुक्रमानें येतों.

( मालतीचें वर्णन )

[ शृंगारपर ]

सा रामणीयकनिधेरधिदेवता वा
सौंदर्यसारसमुदायनिकेतनं वा ।
तस्याः सखे नियतमिंदुसुधामृणाल-
ज्योत्स्नादि कारणमभून्मदनश्च वेधाः ॥

मालतीमाधव १

( मालतीनें लवंगिकेच्या भ्रांतीनें माधवास आलिंगन दिल्याचा प्रसंग )

एकीकृतस्त्वचि निषिक्त इवावपीड्य
निर्भुग्नपीनकुचकुड्मलयाऽनया मे ।
कर्पूरहारहरिचंदनचंद्रकांत-
निष्यंदशैवलमृणालहिमादिवर्गः ॥

———६

( मालतीस मूर्छा आली असतां ती पुनः सावध होते )

भवति विततश्वासा नासा प्रसन्नपयोधरं
हृदयमपि च स्निग्धं चक्षुर्निजप्रकृतौ स्थितम् ।
तदनु वदनं मूर्छाच्छेदात्प्रसादि विराजते
परिगतमिव प्रारंभेऽन्हः श्रिया सरसीरुहम् ॥[1]

———१०

( लवकुशांवरून रामास सीतेची ओळख पटली तो प्रसंग )

अपि जनकसुतायास्तच्च तच्चानुरूपं
स्फुटमिह शिशुयुग्मे नैपुणोन्नेयमस्ति ।
ननु पुनरिव तन्मे गोचरीभूतमक्ष्णो-
रभिनवशतपत्रश्रीमदास्यं प्रियायाः ॥

उत्तररामचरित ६

( सीता वनवासांत असतां तिच्या अलंकारविरहित मुखाची मुग्ध शोभा राम आठवतो. )

श्रमांबुशिशिरीभवत्प्रसृतमंदमंदाकिनी-
मरुत्तरलितालकाकुलललाटचंद्रद्युति ।
अकुंकुमकलंकितोज्ज्वलकपोलमुत्प्रेक्ष्यते
निराभरणसुंदरश्रवणपाशसौम्यं मुखम् ॥

---

१ असाच प्रसंग 'विक्रमोर्वशी' त वर्णिला आहे———

आविर्भूते शशिनि तमसा रिच्यमानेव रात्रि-
र्नैशस्यार्चिर्हुतभुज इव च्छिन्नभूयिष्ठधूमा ।
मोहेनान्तर्वरतनुरियं दृश्यते मुच्यमाना
गंगा रोधःपतनकलुषा गच्छतीव प्रसादम् ॥

अंक १

या श्लोकावरच धोरण ठेवून वरील श्लोक बहुधा लिहिला असावा. तरी येवढ्यावरूनच भवभूतीचे पूर्वोक्त दोन गुण विशेष फार उत्कृष्ट रीतीनें दिसून येतात. एक तर त्याचा स्वतंत्र काव्यरचनेविषयींचा बाणा, व दुसरा नुकताच वर सांगितलेला विशेष कीं, त्याचें वर्णन उपमाद्यलंकाररूप नसतां केवळ यथावत असतें.

(वीरपर)

(कुशाचें वर्णन)

दृष्टिस्तृणीकृतजगत्त्रयसत्त्वसारा
धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् ।
कौमारकेऽपि गिरिवद्गुरुतां दधानो
वीरो रसः किमयमेत्युत दर्प एव ॥

उत्तररामचरित १.

(चंद्रकेतूनें युद्धास बोलावलें असतां लवाचें आचरण)

व्यपवर्तत एष बालवीरः पृतनानिर्मथनात् त्वयोपहूतः ।
स्तनयित्नुरवादिभावलीनामवमर्दादिव दृप्तसिंहशावः ॥

—— ५

[वत्सलपर]

(सीतेच्या बाल्याचें वर्णन)

अनियतरुदितस्मितं विराजत्-
कतिपयकोमलदंतकुड्मलाग्रम् ।
वदनकमलकं शिशोः स्मरामि
स्खलदसमंजसमंजुजल्पितं ते ॥[1]

उत्तररामचरित ४.

---

१ सर्व संस्कृतज्ञांस हा श्लोक वाचतांच 'शाकुंतला'तील एतत्समानार्थक श्लोकाची आठवण झाल्याविना राहणार नाहीं. तो हाः—

आलक्ष्यदंतमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन् ।
अंकाश्रयप्रणयिनस्तनयान् वहंतो
धन्यास्तदंगरजसा मलिनीभवंति ॥

अंक ७

या श्लोकास विशेष प्रसिद्धि येण्याचें कारण मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं, शेझीनामक फ्रेंच पंडितास यानें अगदीं तल्लीन करून सोडलें

[ हास्यपर ]

( अश्वाचें वर्णन )

पश्चात्पुच्छं वहति विपुलं तच्च धूनोत्यजस्रं
दीर्घग्रीवः स भवति खुरास्तस्य चत्वार एव ।
शष्पाण्यत्ति प्रकिरति शकृत्पिण्डकानाम्रमात्रान्
किंवा ख्यातैर्व्रजति स पुनर्दूरमेह्येहि यामः ॥

---

आतां फक्त एकाच रसाचीं उदाहरणें द्यावयाचीं राहिलीं आहेत. मागें कालिदासाविषयीं लिहितांना उदात्त रसाचीं उदाहरणे बरींच देतां आलीं. कारण तीं त्याच्या ग्रंथांतून जागोजाग पुष्कळ आढळतात. पण भवभूतीच्या नाटकांत तसें नाहीं. ' मालतीमाधवा ' चा नववा अंक, तसेंच ' महावीरचरिता ' चा पांचवा व सातवा अंक यांखेरीज वरील रसाचीं उदाहरणें फारशीं कोठेंही आढळत नाहींत. या गोष्टीचें कारण तरी उघडच आहे. काव्य रचणारास हव्या तितक्या विषयाचा समावेश आपल्या ग्रंथांत करण्यास जशी सवड असते तशी नाटककारास असत नाहीं. मूळचें संविधानक हवें तसे बदलून घालण्यास किंवा अगदीं नवेंच रचण्यास जरी त्यास मुभा असते, तरी पात्र, प्रसंग, स्थल इत्यादिकांच्या औचित्याकडे त्यास दुर्लक्ष करितां येत नाही— म्हणजे त्या त्या पात्रास, प्रसंगास व स्थलास जें जितकें शोभेल तितकेंच तें त्यास घालावें लागतें. शिवाय नाटक म्हणजे जगांतील व्यवहाराचें चित्र होय. यास्तव लोकांत बोलण्याचालण्याचा प्रकार जसा आढळतो तसाच सामान्यतः नाटकांत उतरावा लागतो. या सर्व निर्बंधामुळें नाटककारास आपले सर्व गुण एकाच नाटकांत प्रकट करितां येत नाहींत. सारांश, कवींच्या व विशेषतः नाटककारांच्या एकट्यादुकट्या ग्रंथावरून त्यांच्या गुणांची इयत्ता काढणें अगदीं असमंजस होय. असो. आतां वर सांगितलेल्या रसाचीं कांहीं उदाहरणे आम्ही वाचकांस सादर करितों, त्यांवरून त्यांची खात्री होईल कीं, हा रस थोड्याच ठिकाणीं जरी आणला आहे, तरी तो साधण्याची आपल्या कवीचे ठायीं चांगली शक्ति होती.

संपातिः—नूनमद्य वत्सजटायुरभिवादनाय मलयकंदरकुलायमुपसीदति ।

तथाहि—

पर्यायक्षणदृष्टनष्टककुभः संवर्तविस्तारयो-
र्नीहारीकृतमेघमोचितधुतव्यक्तस्फुरद्विद्युतः ।
आरात् कीर्णखणत्खणीकृतगुरुग्रावोच्चयश्रेणयः
श्यैनेयस्य बृहत्पतत्रधुतयः प्रख्यापयंत्यागमम् ॥

महावीरचरित ५

जटायुः—तदयमार्यो मन्वंतरपुराणगृध्रराजः संपातिः ।

अहो भ्रातृस्नेहः !

पुराकल्पे दूरोत्पतनखुरलीकेलिजनिता-
दतिपत्यासंगात् परितपति गात्राणि तपने ।
अवष्टभ्यासौ मामुपरि ततपक्षः शिशुरिति
स्वपक्षाभ्यां प्लोषादविकलमरक्षत् करुणया ॥

---

जटायुः—( उत्पत्य । गगनगमनमभिनीय )

एषोऽहं प्रलयमरुत्प्रचंडरंहः-
संक्षिप्तप्रथिम पिबन्निवांतरिक्षम् ।
क्षेपीयो मलयगिरेर्निवासभूभृत्-
संसक्तक्षितिरुहजालमभ्युपेतः ॥

---

( लंका पेटून झालेला आकांत )

॥ नेपथ्ये ॥

भ्रांतीः सप्ताधिकानां प्रविदधदरुणैरर्चिषां चक्रवालैः
द्राग्वीराणामलक्ष्यप्रसृतिरतिसमुत्तप्तरोकम्यालयेषु ।

अर्धप्लुष्टापसर्पद्रजनिचरभटोद्गाढकल्पांतशंकं
लंकां प्रौढो हुताशः सह परिदलितोऽब्धोस्त्रिकूटेन लीढे ॥

महावीरचरित ६

चंद्रकेतूनें युद्धानिमंत्रण केले असतां लव त्याकडे जाण्यास निघाला; पण सेनेचा पुन्हा आपणाभोंवतीं गराडा पडत चाललेला पाहून क्रोधानें म्हणतो:—

लवः—धिग्जाल्मान् ।

अयं शैलाघातक्षुभितवडवावक्त्रहुतभुक्
प्रचंडक्रोधार्चिर्निचयकवलत्वं व्रजतु मे ।
समंतादुत्सर्पन् घनतुमुलसेनाकलकलः
पयोराशेरोघः प्रलयपवनास्फालित इव ॥

---

उत्तररामचरित ५

**भवभूती**चे ग्रंथ म्हणजे काय तीं तीन नाटकेंच. या मानानें पाहतां वरील उतारे एकंदर पुष्कळच झाले. तरी असें करणें इष्ट नसून त्याबद्दल आम्हास वाचकांची माफी मागितली पाहिजे असें आम्हांस अगदीं वाटत नाहीं. आपल्या थोर पूर्वजांच्या विशाल बुद्धीचें प्रत्यक्ष प्रमाण होऊन राहिलेलें जें विद्यारूप महाभांडार आपणापाशीं आहे—कीं जें मात्र या देशाचें अक्षय्य वैभव होय; ज्याचें या पूर्वी मुसलमानांच्यानें हरण करवलें नाहीं, व या पुढें युरोपातील राष्ट्रांच्या तडाक्यासमोर टिकाव न निघून जरी एतद्देशीय लोकांचा बिचाऱ्या अमेरिकनांप्रमाणें कालेंकरून कदाचित् समूळ निःपात झाला, (ईश्वर करो आणि असें कधींही न होवो !) तरी जगत्प्रलयावधि जें या लोकांचें नांव घेऊन उठेलच उठेल. सध्यांच्या निकृष्ट स्थितीस्तव बाकीच्या सर्व जगास सर्वथा तिरस्कारास्पद झालों असतांही आपणांस ज्या एकाकडे पाहून सर्व अद्यापि मान देत आहेत; व इतउत्तर आपला उदय दैवयोगेंकरून पुनः झालाच तर तो जें बीजरूप झाल्याविना संभवत

नाहीं—त्याविषयीं केवळ अंधपरंपरेने सामान्यतः शुष्क अर्थवाद करण्यापेक्षां त्याचें साक्षात् स्वरूप व थोरवी हीं सर्वांच्या प्रत्ययास आणून देण्यास जो यत्न करील त्यानें पदोपदीं वाचकांची त्यांस त्रासविल्याबद्दल क्षमा मागत असलें पाहिजे हें आम्हांस अत्यंत अनुचित दिसतें. ज्याप्रमाणें एखाद्या नेणत्या मुलास त्याच्या बापाचें भुईंत पुरलेलें अपार द्रव्य पुनः दृष्टिगोचर करविणारास त्यास श्रमविल्याबद्दल मोठासा संकोच धरण्याची गरज नाहीं, त्याप्रमाणेंच आपल्या प्राचीन महाशय कर्तांच्या वाग्रत्नांचें सौंदर्य आमच्या वाचकांपैकीं मर्मज्ञतेच्या संबंधानें जे अंमळ कमतर असतील त्यांच्या बुद्धीच्या आटोक्यांत आणून देतांना वरचेवर सबबी सांगण्याची आम्हांस फारशी जरूर दिसत नाहीं असो. लिहिण्याचें एकंदर तात्पर्य इतकेंच कीं, ज्या प्रीतिपूर्वक उत्साहानें हें काम आम्हीं हातीं धरलें आहे तोच भाव आमच्या वाचकांनींही मनांत धरून आमचें साहित्य केलें पाहिजे; व ज्या अर्थी त्यांवर श्रम म्हणून वाचनाचेच काय ते पडणार त्या अर्थी ही विनंती अयोग्य होय किंवा ती मान्य केली असता त्यांस जड पडणार आहे असें खाचित कोणीही म्हणणार नाहीं असा आम्हास पूर्ण भरंवसा आहे. तरी शेवटीं येथें एका गोष्टीबद्दल वाचकाची आम्हांस माफी मागणें अवश्यच होय. ती इतकीच कीं, वरील कल्पना केवळ स्वतःच्याच अधीरपणावरून आम्हीं दुसऱ्याविषयीं कदाचित् केली असेल, व हा बहुधा खोटाही आळ असेल कसेंही असो; निदान आमचा तरी मनोगत अभिप्राय सर्वांस कळविणें अत्यंत उचित होय.

याप्रमाणें संस्कृत कवींत परम विख्यात असे जे **कालिदास व भवभूति** त्यांविषयीं आम्हास जे जे लिहावयास सुचलें तें तें आम्हीं आमच्या वाचकांस सादर केलें. आतां या निबंधाच्या आरंभीं जो उपोद्घात केला आहे त्यास अनुसरून येथें कांहीं लिहिणें अवश्य होय. **कालिदास** व **भवभूति** यांच्या जोडीस सर्व प्रकारें बसविण्यासारखा तिसरा कोणताही कवि नाहीं, यास्तव संस्कृतांतील अत्युच्च कविवृंदांत हे दोघेच कायते मोडतात. दोघांसही कवित्वाची उत्कृष्ट स्फूर्ति स्वभावसिद्ध असून भाषाही तशीच दोघांची अंकित होती. दोघां-

च्याही कल्पनेत व पदरचनेंत[1] अगदीं साधेपणा असून प्रौढता, रसिकता इत्यादि जे महाकवींचे गुण ते अगदीं पूर्णत्वानें दृष्टीस पडतात. दोघांचा काल मात्र एकच किंवा अंमळ जवळ जवळही असणें संभवत नाहीं. तथापि फार पूर्वीपासून लोकाच्या दंतकथांनीं त्यांची इतकी गट्टी घालून दिली आहे कीं, इतःपर ती कधींही निघणे नाहीं; व शोधक पंडितांनीं ती तोडण्याविषयीं कितीही वाद उभे केले व कशींही बलवत्तर प्रमाणें आणलीं, तरी हे दोघे कविमणी भोजराजाच्या सभेंतील पंडितांचीं शिरोरत्नें होतीं. त्याचे त्या गुणिजनैकपक्षपाती राजानें कंठमण्यांप्रमाणें निरंतर लालन करावें. प्रसंग कितीही हलका—विषय कितीही तुच्छ असला तरी आपल्या वाणीच्या अस्खलित रसानें त्यास त्यांनीं भूषित करावें, दोघांच्या वाक्चातुर्यांत झटापटी चालाव्या, व परस्परांच्या रसमय कृति पाहून दोघांनीं क्षणभर स्पर्धा विसरून त्याचें हृदयोल्लासभरांत अभिनंदन करावें इत्यादि असत्यमय भासांतच रंगून जाणें मनास आवडतें; व ज्या वृथासत्याभिमानी निष्ठुर शोधकांनीं वरील मनोरम भ्रमाचा निरास करण्याकडे आपली बुद्धि खर्चिली त्यांस शतशः शाप देऊन त्यांनीं सर्वथा निर्णय केलेल्या सत्याचीही ते पर्वा करीत नाहींत !

यापुढे वरच्याहून कवित्वांत खालोखाल असा जो दुसरा कविवृंद त्याविषयीं लिहूं.

---

१. **भवभूती**च्या ग्रंथांत मागें सांगितल्याप्रमाणें लांब लांब अशी समासघटक पदें आढळतात खरीं, पण तीं सहज समजण्यासारखीं असून क्वचित् प्रसंगानुरोधानें घातलीं आहेत यास्तव वरील उल्लेखास विशेष बाध येईलसें वाटत नाहीं.

# बाणभट्ट.

**रुचिरस्वरवर्णपदा रसभाववती जगन्मनो हरति ।**
**तत्किं तरुणी नहि नहि वाणी बाणस्य मधुरशीलस्य ॥**

विदग्धमुखमंडन—धर्मदास.

संस्कृत कवितेच्या मध्यमावस्थेंत झालेले कवि एकंदरींत पाहतां पुष्कळच आहेत. त्या सर्वांचा निर्देश यथास्थितपणें करणें म्हणजे सामान्य काम नव्हे; तें होण्यास पुष्कळ श्रमाची व कालाची आवश्यकता आहे. यास्तव त्यांतील मुख्यांपैकीं तीन मात्र येथें घेऊन त्याविषयीं लिहितों. हे तीन कवि **बाणभट्ट, सुबंधु** आणि **दंडी** हे होत.

मध्यमकालीन कवींत या तिघांचेंच पृथक्त्वानें वर्णन करण्याचें एक मोठें कारण असें आहे कीं, संस्कृत भाषेंत गद्यरूपानें काव्य रचण्याचा यांनींच नवा प्रकार काढला. गद्यग्रंथ म्हटले म्हणजे काव्यग्रंथामागूनच व्हावे हा निमय सर्वभाषासाधारण होय; व याचें कारणही उघड आहे. ज्याच्यात्याच्या अनुभवावरून बहुधा सर्वांस माहीत आहे कीं, लहानपणीं मनुष्याची कल्पना जशी चलाख असते तशी मोठेपणीं रहात नाहीं. जसजसें मनुष्यास कळूं लागतें तसतसा या कल्पनाशक्तीचा

---

१ 'गद्यरूप काव्य' या शब्दाचा आमच्या पुष्कळ वाचकास अर्थबोध न होऊन ते गोंधळांत पडतील. परंतु 'रसात्मकं काव्यम्' या काव्यलक्षणाकडे व 'गद्य' आणि 'पद्य' या शब्दाच्या मूलार्थाकडे अंमळ लक्ष दिलें असतां हा भ्रम तेव्हांच दूर होईल. 'गद्य' ( गद्—बोलणें ) म्हणजे जी साधारण व्यावहारिक बोलण्याची भाषा तिजसारखी रचना; व 'पद्य' ( पद्—छंदाचा चवथा भाग ) म्हणजे छंदाबद्ध कृत्रिम रचना- रस हा स्वतंत्रच आहे, त्याचा शब्दरचनेशीं बिलकुल संबध नाहीं. तो पद्यग्रंथांत असला म्हणजे त्यास जशी 'काव्य' ही संज्ञा येत, तशीच तो गद्यग्रंथांतही असतां त्यास ही संज्ञा कां येऊं नये ? तसेंच दुसऱ्या पक्षीं केवळ पद्यरचनेवरूनच ग्रंथांस कविता म्हणत नाहींत,—उदाहरणार्थ, 'अमरादि कोश,' 'मनुसंहिता' इत्यादि.

ऱ्हास होऊं लागून विचारशक्तीचा उदय होऊं लागतो. हीच गोष्ट एकंदर राष्ट्रासही लागते. तें सज्ञानदशेंत येऊं लागलें असतां पहिल्यानें त्याच्या कल्पनाशक्तीचा कवित्वरूपानें विकास होऊं लागतो. असें होतां होतां कांहीं काळानें याच कल्पनाशक्तीच्या पोटीं तत्वजिज्ञासा-म्हणजे भोंवतालच्या सृष्टींत जे अनेक चमत्कार व आश्चर्यमय पदार्थ प्रतिक्षणीं इंद्रियगोचर होत आहेत व कांहीं कालनियमेंकरून होतात त्यांचें तत्व म्हणजे वास्तविक स्वरूप काय आहे हे समजण्याची इच्छा हीही स्वभावतःच उद्भवते. पण या दुसऱ्या मानसिक शक्तीचा पहिलीशीं स्वभावविरोध आहे. कारण कल्पना म्हणजे मुळीं असत्यभासमय; तेव्हां तिचें व तत्वजिज्ञासेचें, कीं जिला निवळ सत्यच पाहिजे, अशांचें कसें जमेल ? असो. याप्रमाणें तत्वजिज्ञासा जसजशी बळावूं लागते तसतशी कल्पनाशक्ति अधिकाधिक क्षीण होऊं लागते—म्हणजे कवित्वास अनुकूळ अशी जी मनाची पहिली कोमळ अवस्था ती जाऊन सत्यासत्यविवेचनरूप जी कठोर मानसिक शक्ति तिचा पगडा होतो. तेव्हां अर्थातच काव्यग्रंथ मागें पडून उत्तरोत्तर प्रतिपादनमय विषयांकडे लोकांच्या मनाची प्रवृत्ति होते. आता अशा विषयांवरील ग्रंथास छंदोबद्ध रचना मुळींच शोभत नाहीं. लोकव्यवहारांतील भाषा हीच तिला योग्य; यास्तव गद्यग्रंथांचा परिपाठ पडतो. हा परिपाठ पडून ग्रंथरचनेची हीच रीत ठरून जाणें हें एक विद्यावृद्धीचें मोठें चिन्हही होय. कां कीं, स्वरसंयोग, तसेच शब्दालंकार, अर्थालंकार इत्यादि जीं निरानिराळीं बाह्य साधनें कवितेस मनोवेधक करण्याकरितां योजिलीं असतात, त्यांतील एकही गद्यग्रंथात नसून केवळ आतील अर्थाच्या सौंदर्यानें व समंजसपणानेंच त्यांत मनाचें रंजन होण्यासारखें असतें. असो. हें सर्व प्रस्तुत विषयास फारसें अनुलक्षून आहे असें नाहीं. तरी येथे येवढा विस्तार करण्याचें कारण इतकेंच कीं, या मनोरंजक विषयाचें आमच्या मराठी वाचकांस प्रसंगवशात् कांहींसें दिग्दर्शन व्हावें, व 'कवित्वास अज्ञानावस्था विशेष अनुकूळ असते,' 'तिचा ज्ञानसंपन्नतेच्या काळात उत्तरोत्तर ऱ्हास होत जातो,' इत्यादि जे सिद्धांत सकृद्दर्शनीं फार विलक्षण वाटतात, त्यांची कांहीं फोड

व्हावी. प्रस्तुत विषयाचा वर प्रतिपादन केलेल्या सिद्धांताशीं केवळ व्यतिरेकाचा संबंध आहे—म्हणजे वरील गोष्टींतील एकही त्यास लागू पडत नाहीं. पूर्वोक्त तीन कवींनीं जरीं गद्यरचनेचा परिपाठ घातला, तरी त्यांची ती रचना केवळ नांवानें मात्र तशी; वस्तुतः पाहिलें तर ती पहिल्या काव्यरचनेचेंच रूपांतर होय. प्राचीन ग्रीक व रोमन लोकांत ज्या प्रकारच्या गद्याची प्रवृत्ति पडली, व सांप्रतकाळीं इंग्लिश वगैरे युरोपांतील भाषांत ते ज्या प्रकारचें आहे, तसें संस्कृतांत कोणत्याही काळीं प्रचारांत आल्याचें कळत नाहीं. त्यांतील गद्याची तऱ्हा वेगळीच, तशी इतर कोणत्याही भाषेंत नसेल. या भाषेंत वर्णांच्याच ठायीं कांहीं विलक्षण माधुर्य व प्रौढत्व असल्यामुळें, रचनावैचित्र्यास शब्दचातुर्य, समास करण्याचे चमत्कारिक प्रकार व त्यांच्या दीर्घत्वाविषयीं अनिर्बंध, इत्यादि गोष्टींचे आनुकूल्य असल्यामुळें, एका छंदाव्यतिरिक्त बाकी सर्व कवितेचा थाट गद्यास देणे अगदीं सुकर झालें; व यास्तवच वरील तिघा ग्रंथकारास कवींत गणिलें आहे.

बाणभट्ट हाच बाकीच्या दोघापेक्षां विशेष प्रसिद्ध आहे, यास्तव आतां त्याजपासूनच वर्णनास आरंभ करूं.

मागील दोघा कवींपैकीं एकाचा कुलवृत्तांत मात्र समजला होता, पण स्थल व काल हीं दोन्हींही अज्ञात होतीं; व दुसऱ्याविषयीं माहिती तर त्याच्या एका नांवाखेरीज दुसरी बहुधा कोणतीच नव्हती. परंतु प्रस्तुत प्रसंगीं लिहिण्यास आनंद वाटतो कीं, प्रकृत कवीच्या संबंधें वाचकांची जिज्ञासा काहीं अंशीं तृप्त होण्याचें साधन बरेंच आहे.

बाणभट्टानें आपल्या अत्यंत प्रसिद्ध 'कादंबरी' नांवाच्या ग्रंथांत आरंभीं प्रस्तावनेंत आपल्या पूर्वजांचीं नांवें सांगितलीं आहेत; पण याखेरीज त्यांत दुसरी काहीं माहिती नाहीं. ती त्याचा दुसरा आलीकडे सांपडलेला ग्रंथ 'हर्षचरित' यावरून बरीच मिळते. या ग्रंथाच्या पहिल्या उच्छ्वासाच्या ( भागाच्या ) सरतेशेवटीं पुढील मजकूर सांपडतो:—

बाणभट्टाच्या बापाचें नांव **चित्रभानु** व आईचें नांव **राज्यदेवी**. बाण चवदा वर्षांचा असतां त्याचा बाप मरण पावला. भद्र-

**नारायण, ईशान** व **मयूरक** हे त्याचे बाळमित्र होते. त्याचें घर शोण ( सोन ) नदीच्या पश्चिमेस प्रीतिकूट नांवाच्या एका गांवीं असे. याच नदीच्या कांठीं समोरच्या बाजूस यष्टिगृह म्हणून एक गांव असे. हें गांव सोडून पुढें गेलें म्हणजे श्रीकंठनामक देश लागे. यांत हर्ष-राजाची राजधानी होती.

याप्रमाणें आपल्या कवीच्याच ग्रंथावरून त्याच्या स्थलाचा निर्णय झाला, व कुलवृत्तांतही कांहींसा समजला. पण काल समजण्यास मार्ग कोणता ? जर या देशाचा प्राचीन काळचा इतिहास आपणापाशीं समग्र असता, तर तो असल्या प्रसंगीं फार कामास येता. पण काय करावें ! तें साधन आपणापाशीं मुळींच नाहीं असें म्हटलें पाहिजे. बाकी सर्व प्रकारें प्राचीन ग्रीक व रोमन लोकांशीं टक्कर देऊन राहिले असतां व कोठें कोठें तर त्यांच्याहूनही वरचढ झाले असतां, आपल्या पूर्वजांच्या हातून विद्येचें हें एक मोठेंच अंग राहिलें. ग्रीक लोकावर जशीं मोठ-मोठीं परचक्रें आलीं, व त्यांची वीरश्री कसास लागली, तसें येथें कधींही न झाल्यानें म्हणा, अगर **हिरॉडटस्, जिनोफन्, थुसिडिडीज्** यांच्याप्रमाणें आपल्या देशचे विद्वान् प्रवासाविमुखतेमुळें देशपर्यटन कधींच करीत नसत म्हणून, किंवा त्यांनीं नरस्तुति मिथ्या कल्पिल्या-स्तव, किंवा ग्रंथ बुडाल्यामुळें,—कोणत्याही कारणानें म्हणा, येवढी गोष्ट स्पष्ट दिसते कीं, आपल्या देशाचा प्राचीन इतिहास बहुतकरून ठार बुडाला. ही महाहानि केवळ त्याच्याच संबंधानें शोचनीय आहे असें नाहीं,—तर एकंदर ग्रंथांच्या संबंधानेंही होय. ज्याप्रमाणें गाढ अंधकारांत रंग, रूप, आकारमान, अंतर इत्यादिकांचीं भानें सर्व नष्ट होतात, त्याप्रमाणें एका इतिहासाशिवाय साऱ्या ग्रंथसमूहभर गोंधळ माजला आहे. कोणता आधीं झाला, कोणता मागून झाला, कोण-त्याचा कसा प्रसंग होता, इत्यादि अनेक गोष्टी समजण्याची मनास मोठी उत्कंठा वाटत असते; व त्या समजण्यांत पुष्कळ वेळां मोठी बहार असून कधीं कधीं तर ती सगळी बहुधा त्यांतच असते. आथेन्स शहरांतील **आरिस्तोफेनीज्** नांवाच्या एका प्रहसनकाराचें 'मेघमाला' म्हणून एक प्रहसन अद्याप प्रसिद्ध आहे. तें जर आपल्या 'प्रबोधचंद्रो-

दया'प्रमाणेंच इतिहासप्रसिद्धिशून्य असतें, तर त्यांतील रस सगळा गेल्यासारखाच न होता काय? सारांश, ज्याप्रमाणें एकाद्या मृतस्त्रीच्या मुखावरून तिच्या अवयवांची ठेवण, तिचा वर्ण इत्यादि मात्र दृश्य असतात, पण जिवंतपणचा नूर व तोंडावरील एकंदर खुमारी यांचा एकदा अस्त झाला तो झाला, त्याची पुनः कल्पनाही होत नाहीं, त्याप्रमाणेंच संस्कृत भाषेंतील ग्रंथांची नूतन शोभा त्या त्या कालाबरोबरच बहुधा चिरकाल लयास गेली असें म्हणण्यास चिंता नाहीं! परंतु जर तीच शोभा इतिहासरूप तजाबिरीत आजपर्यंत जशीची तशी राहती, तर सूर्योदय होऊन दिशा फांकल्यावर नद्या, वृक्ष, पर्वत इत्यादिकांनीं चित्रविचित्र असणारें भूपृष्ठ जसें सुव्यक्त होऊन रम्य दिसूं लागतें, तसा पूर्वोक्त ग्रंथसमूह सध्यांप्रमाणे घोंटाळयांचा न भासतां नीट क्रमावर दिसता, व त्यापासून आतांपेक्षां पुष्कळपट आनंद व लाभ होता. असो. याप्रमाणें आपल्या देशाचा पुरातन इतिहास नसल्यामुळें आपली व एकंदर जगाचीही मोठी हानि झाली आहे. आता 'राजतरंगिणी'सारख्या ग्रंथाचा प्रसंगवशात् कांहीं उपयोग होतो खरा, पण त्यासही इतिहास हें नाव वस्तुतः शोभत नाहीं. कारण एक तर त्यांची धाटणी शुद्ध इतिहासासारखी नसून केवळ काव्यासारखी असते, व दुसरें असें कीं, इतिहासाचे दोन मोठे आधार जे कालक्रम व भूगोल (देशज्ञान) त्याकडे यांत फार लक्ष दिलेलें नसतें. हिंदुस्थान देश विस्तीर्ण पडला, त्यामुळें निरनिराळ्या प्रांतांच्या राजांनीं निरनिराळे शक चालवावे यामुळेंही काळाचा निश्चय करण्यास अडचण पडते.

---

१ हा विस्तीर्ण ग्रंथ चार भाग मिळून आहे. पहिला भाग कल्हण पंडित यानें करून त्यांत काश्मीर देशाचा इतिहास इ० सन ११४८ पर्यंत लिहिला आहे. दुसरा जोनराजकृत असून त्यांतील वृत्त इ० स० १४१२ पर्यंत आहे. तिसरा श्रीवरपंडित (जोनराजाचा शिष्य) यानें रचून त्यांत इ० स० १४७७ पर्यंत झालेली हकीकत लिहली आहे. आणि चवथा प्रजयभट्टकृत असून त्यांत अकबरानें काश्मीर जिंकल्याचा वृत्तांत व पुढीलही थेट शाहाअलम बादशहापर्यंत लिहिला आहे. काव्यरीत्याही हा ग्रंथ फार प्रशंसनीय आहे.

शिवाय, आपल्या लोकांत पूर्वीपासून एक मोठी गैदी चाल पडलीशी दिसते ती ही कीं, शक म्हणून लिहावयाचा नाही. इतके पुरातन ग्रंथ आजपर्यंत चालत आले आहेत; पण त्यांतून शक घातलेले असे कांहीं निघालेच तर फारच थोडे निघतील यांत संशय नाहीं. फार लांब कशाला ? अजूनही मराठी पत्रांत पाहिलें तर महिना व तिथि येवढीं मात्र घातलेली आढळतात, वर्षांचा शक म्हणून कधीं मिळावयाचा नाहीं. तेव्हां एकंदर म्हणण्याचें तात्पर्य हेच कीं, आपल्या प्राचीन ग्रंथकारांचा काळ शोधून काढण्याचीं साधनें आपणापाशीं बहुतकरून मुळींच नाहींत तथापि प्रस्तुत प्रसंगीं एक मोठ्या चमत्काराची व अंमळ लज्जेची गोष्ट आमच्या वाचकांस कळविणें आहे—ती ही कीं, बाणकवि केव्हां झाला याविषयींची आपली उत्कंठा, जी आपले स्वतःचे ग्रंथ तृप्त करण्यास समर्थ झाले नाहींत, ती एका चिनी ग्रंथानें सहज केली ! !

येवढी आश्चर्याची गोष्ट कशी घडली, व चिनी ग्रंथाचा आणि बाणकवीच्या काळाचा संबंध काय हें नीट लक्षांत येण्यास थोडें ऐतिहासिक वृत्त येथें सांगणें अवश्य होय. आमच्या सर्व वाचकांस येवढी गोष्ट तरी खास माहित असेल कीं, मुसलमानांची सत्ता आपल्या लोकांच्या बुद्धीच्या प्रसारास प्रतिबंधक होऊन तिची वाढ तिनें मुळींच खुंटाविल्याच्या अगोदर शेंकडों वर्षें धर्माच्या संबंधानें या देशांत कांहीं मोठ्याच उलथापालथी झाल्या होत्या. आर्य लोकांचा मूळचा जो वैदिक धर्म त्यावर पहिला मतभेद बुद्ध यानें काढला. याच्या मतास कालगत्या पुष्कळ लोक अनुसरून धर्मांत दुफळी झाली, व हे नवे लोक आपणास बौद्ध असें म्हणवूं लागले. यांचीं नवीं मतें कोणतीं होतीं, यांचा उदय, प्रसार व लय केव्हां झाला व कशामुळें झाला, वगैरे गोष्टी इतिहासकारास मोठा मनोरंजक विषय होत्या; पण आतां बोलून उपयोग काय ? मागलीच दिलगिरीची गोष्ट पुनः एकवार येथें सांगितली पाहिजे कीं, इतिहासाच्या अभावास्तव या महालाभास आपण एकंदर जगासह अंतरलों. असो. बुद्धाविषयीं जरी आपणास कांहीं माहिती नाहीं, तरी येवढी गोष्ट स्पष्ट दिसते कीं, त्याची बुद्धि

लोकोत्तर असावी. कां कीं, त्याच्या प्रतिपक्ष्यांनीं म्हणजे ब्राह्मणांनींही त्यास ईश्वराचा साक्षात् नववा अवतार गणला ! **जयदेवानें** 'गीतगोविंदा'च्या आरभीं म्हटलें आहे.—

**निंदसि यज्ञविधेरहह श्रुतिजातं ।**
**सदयहृदय दर्शितपशुघातं ॥**
**केशव धृतबुद्धशरीर जय जगदीश हरे ॥ ( ध्रुप ८ )**

यांत **बुद्धाचें** मुख्य प्रतिपाद्य मत सांगितलें आहे, कीं, 'यज्ञांत वेदाज्ञेवरून पशुहिंसा जी करीत तिचा त्यानें सदय अंतःकरणानें निषेध केला.' या धर्मसंस्थापकाचा मरणकाल इंग्रेज ग्रंथकारांनीं ख्रिस्ती शकापूर्वीं ६४३ वर्षें म्हणून काढला आहे. यापुढें हा धर्म पुष्कळ उत्कर्ष पावला. ख्रिस्ती शकाच्या पूर्वीं सुमारे ३०० वर्षें त्या धर्माचा **अशोक** म्हणून एक विख्यात राजा राज्य करीत होता. त्यानें आपल्या सर्व राज्यांतून पश्वादिकांची हिंसा बंद करून टाकली होती असें म्हणतात. या काळाचे साक्षिभूत असे कित्येक अक्षरें खोदलेले खांब, कोरींव लेणीं वगैरे अजून कोठें कोठें आहेत. असो. परंतु हें बौद्धांचें वैभव पुढें कांहीं काळाने समूळ लयास गेलें. ख्रिस्ती शकाच्या आरंभाच्या सुमारास बौद्धांचे व ब्राह्मणांचे मोठे वाद होऊन त्यांत **शंकराचार्यांनीं** बौद्धधर्माचें खंडन केले, व पुनः ब्राह्मधर्माची स्थापना केली.[1] याप्रमाणे बौद्धांचा मोड झाल्यावर ते आपल्या खुषीनेंच म्हणा, किंवा राजाज्ञेनें, देशत्याग करून कोणी तिबेटांत, कोणी चिनांत, कोणी लंकेत असे जाऊन राहिले. पुढें पुष्कल काळपर्यंत त्यांस आपल्या मूळच्या देशाची आठवण होती, व मधून मधून कोणी स्वधर्मी लोकांचीं पूर्वीची स्थाने व विशेषतः त्यांच्या धर्मसंस्थापकाची भूमि पाहण्यास हिंदुस्थानांत येत असत. असा एक चिनी यात्रेकरू **हुएन-**

---

१. हा एकंदर लोकांचा समज **विलसन्** साहेबांस मान्य पडत नाहीं. त्यांनीं आपल्या कोशाच्या प्रस्तावनेत एके ठिकाणीं असें लिहिलें आहे की, **माधवाचार्यांच्या** 'शंकरविजय' ग्रंथावरून व आचार्यांच्याच खुद्द ग्रंथांवरून या मतास कांहीं आधार सांपडत नाहीं. वरील ग्रंथांवरून पाहतां त्यांचा स्वभाव केवळ सौम्य दिसतो.

संग नांवाचा मागें आला होता. तो इ. स. ६२९ पासून ६४५ पावेतों म्हणजे सुमारें साळा वर्षे हिंदुस्थान फिरला. त्यानें आपल्या ग्रंथांत त्या वेळच्या हिंदु राजाचें व जितका देश त्यानें पाहिला त्याचें वर्णन इतकें उत्कृष्ट केलें आहे कीं, हल्लींचे युरोपांतील प्रसिद्ध संस्कृतज्ञ **मोक्षमुल्लर** यांनीं त्याची फार तारीफ केली आहे. असो; सध्यांच्या प्रसंगीं सांगावयाची गोष्ट हीच कीं, याच **हुएनसंगानें** आपल्या ग्रंथांत हर्षराजाचें वर्णन केलें आहे. तेव्हां यावरून असें निश्चित समजतें कीं, इ. स. ६५० च्या सुमारास **बाण**कवि ह्यातींत होता. हा महत्वाचा शक शोधून काढल्याचा मान डाक्तर **हॉल** म्हणून एक विद्वान साहेब मागें कलकत्त्याकडे होता त्याचा आहे. ह्या साध्या गोष्टीवरून जे आमचे नवीन विद्वान् विद्येचें साफल्य म्हणजे पल्लवाग्राहि पांडित्य व शुष्क तर्क, आणि जीविताचें साफल्य म्हणजे चैन व स्तुति, असें आपल्या आचरणावरून लोकांस प्रायः दाखवितात, त्यांनीं हा मान घेतला असतां बराच बोध होण्यासारखा आहे!

**बाणकवीचा** अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ म्हटला म्हणजे 'कादंबरी' होय; व हा एकच आजपर्यंत त्याच्या नांवानें गाजत असे, परंतु आलीकडे 'हर्षचरित' म्हणून एक दुसरा त्याचा ग्रंथ सांपडला आहे म्हणून वर लिहिलेंच आहे. हा तरी अजून चोहोकडे प्रसिद्ध झाला नाहीं तथापि त्याच्या नांवावरून हें स्पष्ट दिसतें कीं, ज्या **हर्ष**राजानें **बाणभट्टास** आपल्या पदरीं ठेविलें होतें त्याचें यांत त्यानें वर्णन केलें असेल. 'चंडिकाशतक' म्हणून आणखीही एक लहानसें काव्य याच कवीच्या नांवावर मोडणारें आलीकडे माहित झालें आहे. याविषयीं एक चमत्कारिक गोष्ट सांगतात. नुकतेंच वर लिहिण्यांत आलें आहे कीं, **बाणभट्टाच्या** लहानपणच्या मित्रांत **मयूर** म्हणून एक होता. हा पुढें प्रसिद्ध कवि झाला, व यानें आपल्या अंगावरचा महारोग जावा म्हणून सूर्यप्रीत्यर्थ 'सूर्यशतक'[1] नांवाचें एक काव्य केलें. या पुण्यकर्माच्या योगानें त्याचा रोग जाऊन तो पुनः पहिल्यासारखा

---

१. हें प्रौढ काव्य अद्याप प्रसिद्ध आहे.

झाला. **बाण**कवीस या देवताप्रसादाचा मोठा हेवा वाटून त्यानें आपले हातपाय तोडून घेतले. ते पुनः या वर सांगितलेल्या काव्याच्या योगानें त्यास प्राप्त झाले. अशा लोकवार्तांविषयीं आम्ही मागें **भव-भूति** व **कालिदास** यांच्या आख्यायिकेच्या संबंधें लिहितांना आपलें मत दर्शविलेंच आहे. तथापि वरील गोष्टींत समंजसपणा व सौंदर्य हे दोन्ही गुण कमी आहेत असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. **बाण**कवीच्या नावानें एक नाटकही प्रसिद्ध आहे, तें ' पार्वतीपरिणय ' होय. या नाटकाविषयीं आम्ही मागें ( फेब्रुवारीचा निबंधमालाअंक पृष्ठ २२१ टीप ) एकदां लिहिलेंच आहे. त्याशिवाय आणखी येथें कांहीं ज्यास्त लिहिण्याचें कारण दिसत नाहीं. परंतु वरच्यांशिवाय आणखीही एका ग्रंथाचे कर्तृत्व आपल्या कवीकडे येऊं पाहतें आहे. तें अशातशाचें नव्हे, तर प्रसिद्ध नाटक ' रत्नावली ' याचें होय. हें मत वर ज्याचा संबंध आला आहे त्या **डाक्तर हॉल्** साहेबाचें होय. ' रत्नावली ' चा प्रसिद्ध कर्ता **श्रीहर्ष** आहे; परंतु आपला कवि ज्याच्या आश्रयास होता तो **हर्ष** व हा एकच असल्यास या प्रसिद्धीचें कारण सहज सांगता येईल. तें अर्थात् हेंच कीं, **बाण**-कवीस द्रव्य देऊन त्या राजानें आपल्याच नावावर तें नाटक लिहून घेतलें असेल, व एकदां प्रसिद्धि पडून तीच तशी आजपावेतों चालत आली असेल. हा अंदेशा तरी वरील साहेबास यण्यास असें कारण झालें कीं, ' रत्नावली ' तील कांहीं श्लोक वगैरे ' हर्षचरिता ' तील श्लोकांशीं जमले. आम्ही ' हर्षचरित ' पाहिलें नाहीं, यास्तव या-संबंधें आम्हांस खात्रीनें येथें कांहींच म्हणवत नाहीं. तथापि इतकें लिहिणें अवश्य आहे कीं, ज्या अर्थीं हें मत शेंकडों वर्षें चालत आलेल्या प्रसिद्धीस खोडणार, त्याअर्थीं चांगलीं बलवत्तर प्रमाणें असल्याखेरीज वरील वादात निर्णय करणें असमंजस होय.

' कादंबरी ' हाच **बाण**कवीचा अत्युत्तम ग्रंथ होय; व हा त्यानेंच स्वतः जेथपर्यंत लिहिला तेथपर्यंतही घेतला असता बराच मोठा आहे. यास्तव त्याच्या कवित्वगुणाचा यांत पुष्कळ समावेश झाला असेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. याकरितां त्याचे आणखी कितीही ग्रंथ

असले तरी ते एकीकडे ठेवून सध्यांच्या एकावरूनच त्याच्या कवित्वाची परीक्षा करूं. हें मान फार करून चुकणार नाहीं असें आम्हांस खास वाटतें.

पूर्वागत क्रमास अनुसरून म्हटलें म्हणजे येथे प्रस्तुत ग्रंथाचें संविधानक द्यावयाचें होतें. पण तसें सांप्रत प्रसंगीं आमच्यानें करवत नाहीं. याचें एक मोठें कारण असें कीं, तें थोड्याथोडक्यांत आटपण्यासारखें नव्हे. एकदां तें लिहावयाचें म्हटलें म्हणजे अगदीं यथास्थितपणीं लिहिलें तर उपयोग; नाहीं तर फार लांबत चाललें म्हणून शेवटीं आवराआवर करण्यांत शोभा नाहीं. यास्तव हें कथानक लिहिणें हें एका स्वतंत्र ग्रंथाचें काम होय असें समजून तें आम्ही मुळींच गाळतों; व या ग्रंथाविषयीं सामान्यतः जें पूर्वक्रमानुसार लिहावयाचें त्यास एकदम आरंभ करतों.

'कादंबरी' हा ग्रंथ ज्यांस इंग्रेजींत "रोमान्स्" म्हणतात अशा अद्भुत कथांच्या वर्गांत मोडेल. यांत कादंबरी ही नायिका होय. ही गंधर्वकुलांतील असून उज्जयिनी नगरच्या राजाचा पुत्र चंद्रापीड याशीं हिचें लग्न झालें आहे. हा राजपुत्र दिग्विजयाच्या प्रसंगानें हिमालयावर कैलासाच्या जवळ तळ देऊन राहिला असतां एके दिवशीं मृगयेच्या नादांत गंधर्वांच्या प्रदेशांत एकटाच शिरला. पुढें महाश्वेतेशीं व कादंबरीशीं त्याची गांठ पडली आहे. महाश्वेता ही कादंबरीची सखी असून या कथेंतील उपनायिका होय. हिनें पुंडरीकनामक ऋषिकुमारास वरलें होतें. हाच जन्मांतरीं चंद्रापीडाचा मित्र वैशंपायन झाला; आणि महाश्वेतेच्या शापास्तव पुढें आणखी पोपट झाला. कथेच्या आरंभीं मांगाची मुलगी ज्या पोपटास घेऊन शूद्रक राजाकडे आली आहे तो हाच पोपट होय. शूद्रकही जन्मांतरींचा चंद्रापीड होय. असो. या कथासंक्षेपावरून यांतील संविधानक केवढें मोठें आहे व किती चमत्कारिक आहे याची कांहीं कल्पना आमच्या वाचकांस सहज होईल. संविधानकचातुर्य म्हणजे हें होय कीं, कथेचें बहुधा पर्यवसान होईपर्यंत पुढे काय काय होणार तें वाचकांस कळूं न देतां त्यांचें कुतूहल सतत जागृत ठेवणें. ही खुबी बाण-

कवीनें प्रस्तुत ग्रंथांत फार उत्कृष्ट ठेविली आहे. पहिल्यापहिल्यानें तर काय पण गोष्ट अगदीं भरांत येऊन गेल्यावरही पुष्कळ वेळपर्यंत तिचें एकंदर धोरण कांहींच उमगत नाहीं. आजपर्यंत सहस्रावधि लोकांनीं ही कथा वाचली असेल, पण त्यांपैकीं जे अत्यंत कल्पक असतील त्यांच्या सुद्धां ध्यानांत ही गोष्ट आली असेल---कीं शूद्रक व पोपट हे कथेंतील नायक व उपनायक होत--असें आम्हांस वाटत नाहीं. जीवरून ग्रंथास नांव मिळालें ती मुख्य नायिकाच सुमारें अर्धा ग्रंथ वाचून जावा तेव्हां दृष्टीस पडूं लागते; तोंपर्यंत ' कादंबरी ' हें नांव देण्याचें कारण काय तें वाचकांस कांहींच कळत नाहीं. पुढें गोष्ट जसजशी लांबत जाते तसतसा त्यांस असा संदेह उत्पन्न होतो---निदान एकास तरी तसा झाला--कीं ग्रंथकार कथेचा आरंभ ( म्हणजे पोपट राजाशीं व जाबालि मुनि आपल्या शिष्यांशीं बोलत आहे हें ) विसरून तर गेला नसेलना ! पहिल्या पहिल्या पृष्ठांत मांगाची मुलगी एकदां येऊन जी नाहींशी होते ती अगदीं शेवटल्या शेवटल्या पृष्ठांत पुनः दृष्टीस पडते; व जातीनें मांगाची असतां तिचें अप्रतिम सौंदर्य वगैरे आरंभीं इतकें कां वर्णिलें आहे, व तिनें पोपटास राजाच्या स्वाधीन कां केला, वगैरे गोष्टींचा खासा उलगडा अगदीं सरतेशेवटीं पडतो. असो. याप्रमाणें हें संविधानक मोठ्या चातुर्यानें बांधलें आहे; व मराठी वगैरे कोणत्याही अन्य भाषेंत या काव्याची जी गोडी उतरणार ती या संविधानकापलीकडे उतरणें केवळ अशक्य होय.

पण हें संविधानक म्हणजे वरील सुंदर इमारतीचा केवळ पाया मात्र झाला. यांतील मधुर व प्रौढ वर्णरचना, श्लेषांची खुबी, जागोजागचीं विचित्र व हुबेहुब वर्णनें, भाषणाचा ओघ, इत्यादिकांनीं या ग्रंथास जी विलक्षण शोभा आली आहे ती कोठवर सांगावी ! गीर्वाण भाषा अगोदर जात्याच अनेक गुणांहीं मनोहर; मग बाणभट्टासारख्या सहृदय, चतुर व कल्पक कवीशीं गांठ पडून ती त्यास अगदीं वश झाल्यावर काय पुसावें ! जे जे चमत्कार होतील ते थोडेच ! खरोखर, ज्यांनीं ज्यांनीं आपल्या कवींची वाचकांस आपल्या सहज वाग्विस्तारानें थक्क करून सोडण्याची व मनास पदोपदीं चकित करण्याची

शक्ति प्रत्यक्षतः अनुभविली असेल, त्यांपैकीं कोणता रसिक पुढील **गोवर्धनो**क्तीचें यथार्थत्व मनांत आणून मान डोलवणार नाहीं व आचार्यांस दुवा देणार नाहीं !--

**जाता शिखंडिनी प्राक् यथा शिखंडी तथाऽवगच्छामि।**
**प्रागल्भ्यमधिकमवाप्तुं वाणी बाणो बभूवेति ॥**

" ज्याप्रमाणें पूर्वी शिखंडिनी ही शिखंडी झाली, त्याचप्रमाणें वाणी ( सरस्वती ) अंगीं धीटपणा येण्यास **बाण** झाली असें मला वाटतें. " या[1] आर्येंत आचार्यांचें सहृदयत्व आणि चातुर्य यांतून कशाची जास्त तारीफ करावी हें आम्हांस समजत नाहीं !

याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथ अनेक गुणांनीं रमणीय झाला आहे. ज्या कोणास हिंदु लोकांचा कल्पकपणा, संस्कृत भाषेचें शब्दार्थरूप अक्षय भांडार, श्लेषादि विचित्र चमत्कार करतां येण्याची तिच्या अंगची अप्रतिम शक्ति, तिच्या कवित्वाचें अत्यंत उज्ज्वल स्वरूप, हीं सर्व एकवट झालेलीं पहावयाचीं असतील, त्याचीं इच्छा सांप्रत ग्रंथ पूर्ण करील. तसेंच प्राचीन काळचे रीतरिवाज वगैरेही यावरून लक्षांत येतात; आणि मुसलमान आदिकरून परस्थ लोकांनीं दुर्दशा करून सोडल्याचा अगोदर या सुवर्णभूमीचें जें अपार वैभव फार दूरदूरच्या देशांतही गाजत होतें त्याची कल्पना या ग्रंथावरून जितकी मनात येईल तितकी कदाचित् दुसऱ्या कोणत्यावरूनही येणार नाहीं!

' कादंबरी'च्या रचनेच्या संबंधानें एक चमत्कारिक गोष्ट घडण्यांत आली तीही येथें सांगणें अवश्य होय. या ग्रंथाचे दोन भाग

---

१ भारतांतील उद्योगपर्वाच्या शेवटीं शिखंडीची कथा सांगितली आहे. काशिराजाची कन्या अंबा भीष्माचा सूड उगवण्याकरितां दुसऱ्या जन्मीं पांचाल्यानें शिखंडिनी झाली. मग एका यक्षानें तिला आजन्म आपलें पुंस्त्व दिल्यावरून तीच शिखंडी झाली. नंतर भीष्माच्या वधास हा शिखंडी कारण झाला. तेव्हां या कथेस अनुलक्षून **गोवर्धनाचार्य** म्हणतात, कीं याप्रमाणेंच वाणीचा **बाण** ( बवयोरभेदः ) झाला असें मी समजतों !

आहेत,—पण ते कविकृत नव्हेत, तर कालकृत आहेत ! **बाणभट्टानें हें** काव्य सुमारें अर्धापर्यंत पोंचविलें न पोंचविलें तोंच एकाएकीं मृत्यूनें त्यावर झडप घातली. पूर्वार्धाच्या शेवटीं म्हणजे जेथें कथाविच्छेद झाला आहे तेथें,——आरंभलेलें ( कादंबरीचें ) भाषणही शेवटास न जातां तसेंच तुटक राहिलें आहे; तें पुढील भागात पुरें केलें आहे. अशी अप्रतिम कृति ज्यानें तिचा नकाशा पहिल्यानें मनांत आणिला त्याच्याच हातून शेवटपर्यंत उतरली नाहीं हें पाहून मनास फार खेद वाटतो; व ही संस्कृत भाषेची एक मोठी हानीच झाली ! असो. गेली गोष्ट ती गेलीच; पण प्रस्तुत प्रसंगीं येवढी तरी मोठ्या समाधानाचीच गोष्ट होय, कीं एकाद्या अर्ध्याच होऊन राहिलेल्या सुंदर इमारतीप्रमाणें पाहणारास आनंद व शोक एकाच काळीं सर्वथा न होऊं देण्याची तजवीज **बाणभट्टाच्या** पुत्रानें करून ठेविली आहे. यानें रचलेला उत्तरार्ध जरी पूर्वार्धाच्या केवळ जोडीसच बसवितां येणार नाहीं, तरी इतकें निर्धास्तपणे खचित म्हणतां येईल कीं, ही रसिकवर्गाची सेवा इतर कोणाच्याही हातून त्याच्यासारखी होणे केवळ अशक्य होतें. बापाशीं निरंतर सहवास असल्यामुळें, व विशेषतः तो बापापाशींच लहानपणापासून शिकला असेल यास्तव त्याच्या कवित्वगुणांची झांक त्यावर पडण्याचा जितका संभव होता तितका अर्थातच दुसऱ्यावर पडण्याचा नव्हता,—मग या दुसऱ्याची बुद्धि कितीही अचाट, व 'कादंबरी'शीं परिचय कितीही प्रसक्त कां असेना ! **बाणभट्टानेंच हें** काव्य स्वतः तडीस नेलें असतें तर तें आहे त्याच्या दिढीनें तरी खास वाढले असतें, व उत्तरार्धांत सध्यां आहे त्याहून रसही पुष्कळ येता यांत संशय नाहीं. तथापि बापानें अंतकाळीं सांगितलेल्या अल्पमात्र संविधानकावरून मूलग्रंथाशीं विसंगत न होईल अशा रीतीनें पुत्रानें कथापरिशेष लिहिला ही गोष्ट काहीं सामान्य नव्हे ! महान् महान् ग्रंथकारांसही आपल्या सर्व कृतींत तर काय, पण कधीं कधीं एकाच कृतींतही, सारखा रस आणवत नाहीं—कारण कोणत्याही शिल्प-कामांत पाहिलें असतां रंग येणें हें जितके वेळेच्या गुणावर असतें तितकें कारागिराच्या मेहेनतीवर असत नाहीं. पहा कीं, **मिल्टन्**

कवीची बुद्धि येवढी अचाट असतांही त्यास 'प्याराडैज् लास्ट' हें काव्य जसें साधलें तसें त्याचाच उत्तर भाग 'प्याराडैज् रिगेन्ड्' हें साधलें नाहीं. तसेंच असेंही अनेक वेळां घडून आलें आहे कीं, ग्रंथकारांनीं आपली एकदा झालेली कीर्ति आणखी वाढवावी या आशेनें आपल्या मूळ ग्रंथांत फेरफार केले; पण भलतेंच होऊन पहिला रस मात्र उतरला. यास्तव जे शहाणे आहेत ते एकादा काव्यादि ग्रंथ उत्कृष्ट साधला असतां त्यास पुनः हात लावींत नाहींत. हें तर स्वतःच्याच ग्रंथाविषयीं झालें. मग दुसऱ्याच्या ग्रंथांत हात घालून त्यांत फेरफार करणें किंवा जुळवाजुळव करणे हें तर केवढें कठीण व केवढें जोखमीचें काम आहे हें काय सांगावें! ज्याप्रमाणें मनुष्यामनुष्याचा स्वभाव, चेहेरा, स्वर वगैरे अगदीं सारखीं कधींही मिळत नाहींत, त्याचप्रमाणें एकासारखे एकाचे बुद्धिगुणही सांपडत नाहींत. शिवाय मोठमोठ्या बुद्धिमानांसही बहुत काळ सतत परिश्रम करून या गुणांपैकीं एकाद्यांतच अत्यंत नैपुण्य प्राप्त होतें, व बाकीचे अर्थात् सरासरीच राहतात. कोणाचा कल गद्याकडे, कोणाचा पद्याकडे, कोणाचा इतिहासाकडे, कोणाचा निरनिराळ्या शास्त्रांकडे, इत्यादि जसजसा असतो, व त्यांत त्याचा व्यासंग जसजसा झालेला असतो, त्या त्याप्रमाणें त्या त्या विषयांत तो वस्ताद होऊन जातो. अनेक गुण एकाचेच ठायीं एकवट झाल्याचीं उदाहरणें **सीझर**, **आरिस्टॉटल**, **कालिदास** यांच्यासारखीं लक्षावधि मनुष्यांत एकाद्यांचींच! सामान्यतः म्हटलें म्हणजे एकेक गुणच पूर्णतेनें साध्य होण्यास जन्मचे जन्म घालवावे लागतें. असो. तेव्हां लिहिण्याचें एकंदर धोरण हें कीं, ज्या अर्थीं एकाचें मन दुसऱ्याशीं सर्वथा सारखें मिळत नाहीं, त्या अर्थीं एकाच्या कृतींत दुसऱ्यानें हात घालणें म्हणजे मोठेंच साहस होय. याविषयीं प्राचीन काळचें एक अत्यंत प्रसिद्ध उदाहरण फार समर्पक आहे. वर सांगितलेला चतुरस्र **सीझर** हा मोठा रणधुरंधर होता. यानें लढाईंत फावलेल्या वेळांत आपल्या निरनिराळ्या मोहिमांचें संक्षिप्त टिपण करून ठेविलें; तें अजून प्रसिद्ध आहे. तें टिपण लिहिण्यांत त्याचा हेतु असा होता कीं, आपणामागें एकाद्या महान्

इतिहासकारानें त्या वेळचा वृत्तांत लिहितांना आपला लेख आधार घेऊन त्यावर विस्तार करावा. पण चमत्कार काय कीं, तसें कांहींच न होतां तें टिपण अजून जसेचें तसेंच आहे; व त्या वेळच्या इतिहासावर अत्युत्कृष्ट व प्रमाणभूत ग्रंथ असा तोच होऊन बसला आहे. सीझर बादशहाच्या मागें अनेक नामांकित इतिहासकार झाले, पण त्यांतून एकासही असा भरंवसा आला नाहीं कीं, त्याची उत्कृष्ट मूलरचना मोडल्यासारखें आपल्या हातून कांहीं होईल. सारांश, स्वतः नवीच रचना करणें इतकें कठीण नाहीं. पण दुसऱ्याच्या ग्रंथास जोड लावून दोघांचा एक जीव करून देणें म्हणजे प्रतिसृष्टि करण्याप्रमाणेंच बहुधा परम दुर्घट होय. अशा साहस कृत्यात अपयश न येतां सिद्धि झाली म्हणजेच अगोदर मोठी मिळविली म्हणून समजावें. बाणपुत्राच्या 'कादंबरी' परिशेषाविषयीं निदान इतकें तरी खास म्हणतां येईल असें आम्हांस वाटतें!

असें सांगतात कीं, 'कादंबरी'चा राहिलेला भाग बापाच्या पहिल्या श्राद्धापूर्वी, म्हणजे एका वर्षाच्या आंत, संपविण्याचा यानें संकल्प केला होता, व त्याप्रमाणें केलें.

याचे खुद्द नांव काय होतें तें माहीत नाहीं, व तें यानें 'कादंबरी'च्या उत्तरार्धांतही सांगितले नाहीं. याचे कारण उघडच आहे. बापाच्या अंतकाळचा नियोग त्याने पूर्ण केला इतकेच; त्यांत त्यानें कांहीं नवें व स्वतःचेंच असे केले नाहीं. शिवाय ज्याप्रमाणें 'चंद्रकांताचा द्रव केवळ चंद्राधीन,' त्याप्रमाणे बाणभट्टाच्या पूर्वार्धाचीच कातोटी उचलून उत्तरार्ध सर्वथा रचला आहे. यास्तव सर्व ग्रंथ आपल्या बापाच्याच नांवानें प्रसिद्ध असावा या उद्देशाने याने आपलें नांव प्रगट न करतां बुध्याच नाहींसें होऊं दिलें असावें असें वाटतें. या गोष्टीवरून त्याची पितृभक्ति दिसून येते; व उत्तरार्धाच्या आरंभीं जी त्यानें थोडीशी प्रस्तावना केली आहे तिजवरून त्याचा स्वाभाविक व बुद्धिसंस्कारजन्य विनयही स्पष्ट दिसतो. ही प्रस्तावना वाचतांना मनाची कांहीं चमत्कारिकच अवस्था होते! कथेच्या नायिकेपर्यंत नुकताच पोंचून आपला कवि ऐन भरांत जों येतो आहे तोंच त्याच्या आयु-

ण्याची मर्यादा संपून हा अप्रतिम ग्रंथ तसाच अर्धा राहिला हें पाहून मन फार उदास होतें, व पुढील मंगलाचरणही अमंगलवत् भासूं लागतें. पुढील पद्यें प्रस्तावनारूप असताही कर्त्याविषयीं विलापपर असल्याप्रमाणें लागतात, व त्यांतील वृत्तांचा मंदपणा ही वृत्ति मनांत विशेष उत्पन्न होण्यास कारण होते. तसेच वंशपरंपरेनें फार क्वचित् येणारे जे बुद्धिगुण ते या बापलेकांत येऊन बहुधा कधींही न झालेली जी गोष्ट—म्हणजे बापानें केलेल्या कृतीचें पुत्राच्या हातून परिपूरण होणें—ती या प्रसंगीं झालेली पाहून मनास मोठें कौतुक वाटतें; व एवढ्या साहसकृत्यांत त्यास कसें यश येईल तें येवो असा मोठा धाक पडतो. पण ग्रंथ जसजसा वाचावा तसतसा तो कमी होत जाऊन शेवटीं त्याची धन्य वाटते!

'कादंबरी' तील मुख्य रस काय तो शृंगार होय. त्याच्या खालोखाल अद्भुत व करुण हे मधे मधे साधले आहेत; आणि बाकीच्यांची कोठें काठें प्रसंगवशात् उगीच झांक मात्र आली आहे. या ग्रंथांतील पदरचनेचा विशिष्ट प्रकार त्याच्या प्रत्येक पृष्ठांत स्पष्ट दिसतो, तो लांब लांब समास घालण्याची रीत हा होय. ही **कालिदास**, **भर्तृहरि** वगैरे प्राचीन कवींच्या ग्रंथांतून बिलकुल दिसत नाहीं. चार पांच पदें समस्त केलीं म्हणजे पराकाष्ठा असें त्यांच्या काव्यांत बहुधा आढळतें. पण कालक्रमानें ही मूळची साधी रीत सुटून जेव्हां कवितेस सजविण्याचा यत्न सुरू झाला, तेव्हां समास लांब लांब घालून पदरचनेस विचित्रता आणण्याची कल्पना सहजच सुचली; व असें करणें पद्यापेक्षां गद्यांत फार सोईचें व विशेष शोभणारें असल्यावरून गद्यरचनेचा परिपाठ पडला असावा असेंही दिसतें. सध्यां जे संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध आहेत त्यांवरून पाहता असें वाटतें कीं, ही नवीन पद्धति **सुबंधु** कवीनें प्रथमतः काढिली असावी. तीच पुढें **बाणभट्ट** व **दंडी** यांनीं उचलली. [1] **भवभूती**नेंही हा थाट कोठें कोठें प्रस॰

---

१ हा निबंध जेव्हां प्रथम लिहिला तेव्हां आमचे असें मत होतें, हें पुढील दंडीच्या निबंधावरून चुकीचें आहे असें लक्षांत येईल.

गानुसार केला आहे हें मागे सांगितलेंच आहे. आतां ही रचना सदोष किंवा अदोष होय याविषयींही येथें कांहीं लिहिणें अवश्य होय. ज्या वेळेस संस्कृत भाषेचा सर्वथैव प्रचार होता त्या वेळीं अशी रचना किती विलक्षण वाटती हें आतां समजणें कठीण आहे. तथापि तिच्या तर्फेनें एक दोन गोष्टी वाचकांस कळविणें जरूर वाटतें. एक तर हीच कीं, ज्या अर्थी **बाण**, **भवभूति** अशा विख्यात कवींनींही ती आपल्या ग्रंथांत आणली आहे त्या अर्थी निदान त्या वेळच्या पंडितांस तरी ती सदोष वाटली नाहीं हें सिद्ध आहे; कां कीं, तसें असतें तर या कवींची कीर्तीच न होती. त्या वेळीं संस्कृत भाषेचा एकंदर प्रचार बुडून ती वरिष्ठ पदवीचे लोक, विद्वान् वगैरे मात्र बोलत असतील हें खरें; तरी येवढें खचित आहे कीं, वरील पदरचनेस विलक्षण म्हणून ठरविण्यास त्या काळच्या लोकांस जो कांहीं थोडाथोडका अधिकार होता तो त्यावरही आणखी बाराशें वर्षें लोटून गेल्यामुळें आम्हांस तर बिलकुल राहिला नाहीं. तेव्हां हिच्याविषयीं सध्यां व यापुढें केवळ बाह्यतः मात्र मत देण्यास कोणास अधिकार आहे,— म्हणजे ही रचना कानास कशी लागते व हिच्या योगानें मनास चमत्कार व आल्हाद वाटतो कीं नाहीं. आतां या दुसऱ्या संबंधानें तरी नवें मत देण्यास फारशी जागा राहिली आहे असें नाहीं. हा **बाण**-कवीचा ग्रंथ आज बाराशें वर्षें विद्वद्वृंदासमोर आहे, व **गोवर्धन**प्रभृति सहृदयाधुरीण रसिकांच्या कसास लागून उत्कृष्ट ठरला आहे. तेव्हां द्वीपांतरस्थ लोकांचे किंवा ब्रह्मांडातले आणखी कोठचेही नवे कस आणले तरी त्यास धास्तीचें कारण इतःपर उरलेंच नाहीं. यास्तव हें आमचें पुढील मत त्यांच्याचेंच पुनरुच्चारण होय असें आम्ही समजतों. ‘ कादंबरी ’ त शृंगाररसच प्रधान असल्यामुळें तींतील पदरचनेंत कवीनें मार्दव व लालित्य हे गुण विशेष साधले आहेत. तसेंच प्रसाद हाही गुण या काव्यांत सर्वत्र आढळतो. हें येथें विशेषेंकरून

---

१ ‘ कवि ’ या शब्दानें **बाणभट्ट** व त्याचा पुत्र हे दोघेही घ्यावयाचे हें सांगावयास नकोच.

सांगण्याचें कारण उघडच आहे कीं, यांत मोठमोठे समास व विशेषतः मधून मधून पुष्कळ श्लेषही साधले आहेत; पण वाचण्याबरोबर त्या सर्वांचा तेंव्हांच उलगडा पडतो. अर्थाची यत्किंचितही हानि न होऊं देतां किंवा त्यास क्लिष्टता न आणतां **बाणभट्टानें** श्लेषादि विचित्र शब्दरचना केली, यावरून संस्कृत भाषा त्यास किती वश होती हें स्पष्ट दिसतें. वर आलेल्या **गोवर्धनाचार्यांच्या** आर्येचा व "बाणोच्छिष्टं जगत्सर्वम्"[1] ह्या पंडितप्रसिद्ध वाक्याचा मुख्यार्थही तोच आहे. प्रस्तुत ग्रंथ वाचतांना दोन प्रकारचे मात्र श्रम मनास होतात एक हा कीं, जेथें जेथें लांब लांब वर्णनें आहेत तेथें अन्वय नीट लक्षांत येण्याकरितां त्याच्या निरनिराळ्या टप्प्यांवर धोरण ठेवावें लागतें; व दुसरा हा कीं, अशा वर्णनांत अनेक कल्पनांची एकेच ठिकाणीं गर्दी असल्यामुळें त्यांतील प्रत्येक मनांत नीट भरेतोंपर्यंत थांबावें लागतें. पण हे श्रमही वाचण्याच्या बहारींत समजल्या न समजल्यासारखेच होतात.

आतां या ग्रंथांतील कांहीं उत्कृष्ट स्थलांचे उतारे वाचकांच्या परीक्षेकरितां घेतों.

पहिल्यानें शृंगाररसाचे. हाच रस सांप्रत काव्यांत प्रधान आहे हें मागें सांगितलेंच आहे; व याकडे आपल्या कवींचा केवढा ओढा आहे हें त्याच्या नुसत्या प्रस्तावनेवरूनही दिसून येतें. खलांची निंदा व सज्जनांची स्तुति हा कवींचा बहुधा संप्रदाय ठरूनच गेला आहे, त्यास अनुसरून प्रस्तुत कवि लिहितोः—

**कटु क्वणंतो मलदायकाः खलास्तुदंत्यलं बंधनशृंखला इव ।**
**मनस्तु साधुध्वनिभिः पदे पदे हरंति संतो मणिनूपुरा इव ॥**

"दुर्जन हे पायांतील बिड्यांसारखे कर्णकटु शब्द ( भाषण ) करतात, आणि मलाची ( पातकाची ) जोड करून देतात; पण सज्जन हे रत्नांच्या पैंजणांप्रमाणें पदोपदीं मंजुल शब्दानें ( मधुर भाषणानें ) मनास रिझवितात."

---

१ 'सर्व जग बाणकवीचें उष्टें आहे,' म्हणजे त्यानें कांहींएक सोडलें नाहीं.

वरील पद्याच्या उत्तरार्धांत कवीच्या मनाची झांक कशी स्पष्ट दिसते आहे! मागें (संस्कृत कवींच्या वर्णनाच्या आरंभीं) 'हृदयवसतिः पंचबाणस्तु बाणः' म्हणजे 'कवितावधूच्या हृदयांत वास करणारा साक्षात् पंचबाण (मदन) च बाणकवि होय' असें जें जयदेवानें म्हटले आहे त्यांतीलही आशय हाच. असो. या वरील पदांची सार्थकता पुढील उताऱ्यांवरून सहज प्रत्ययास येईल.—

आरंभींच्या शूद्रक राजाच्या स्नानसमारंभाचें वर्णनः—

**अवतीर्णस्य जलद्रोण्यां वारविलासिनीकरमृदितसुगंधामलकोपलिप्तशिरसो राज्ञः समंतात् समुपतस्थुरंशुकनिबद्धस्तनपरिकराः दूरसमुत्सारितवलयबाहुलताः समुत्क्षिप्तचरणाभरणाः कर्णोत्संगोत्सारितालकाः गृहीतजलकलशाः स्नानार्थमभिषेकदेवता इव वारयोषितः। ताभिश्च समुन्नतकुचमंडलाभिः वारिमध्यप्रविष्टः करिणीभिरिव वनकरी परिवृतस्तत्क्षणं रराज राजा। द्रोणीसलिलादुत्थाय च स्नानपीठममलस्फटिकधवलं वरुण इव राजहंसमारुरोह। ततस्ताः काञ्चन मरकतकलशप्रभा-**

---

१ धर्मदासनामक कवीनें आपल्या 'विदग्धमुखमंडन' ग्रंथांतही अशाच अर्थाची एक छेकापन्हुति (श्लेषाचा एक प्रकार) घातली आहे. ती ही:—

रुचिरस्वरवर्णपदा रसभाववती जगन्मनो हरति।
तत्किं तरुणी नहि नहि वाणी बाणस्य मधुरशीलस्य॥

कोणी म्हणतो; "अहाहा! तिच्या स्वराचें, वर्णाचें व पदांचें सौंदर्य काय सांगावें! रस व भाव हे तिच्या अंगीं खेळत असल्यामुळें ती सर्वांच्या मनात अगदीं भरून जाते!" हें ऐकून दुसरा त्यास विचारितो, "कोणरे ही! कोणी तरुणी काय?" तो उत्तर करतो, "छे छे! तरुणी नव्हे. हें वर्णन रसाळ जो बाणकवि त्याच्या वाणीचें मीं केलें!"

'स्वर,' 'वर्ण,' 'पद,' 'रस,' 'भाव,' या पदांवर श्लेष आहे हें सांगणें नकोच. त्याचे दुहेरी अर्थही उघडच आहेत.

श्यामायमाना नलिन्य इव मूर्तिमत्यः पत्रपुटैः काश्चिद्र-
जतकलशहस्ता रजन्य इव पूर्णचंद्रमंडलविनिर्गतेन ज्यो-
त्स्नाप्रवाहेण काश्चित् कलशोत्क्षेपश्रमस्वेदार्द्रशरीरा जल-
देवता इव स्फाटिकैः कलशैस्तीर्थजलेन काश्चित् मलय-
सरित इव चंदनमिश्रेण सलिलेन काश्चिदुत्क्षिप्तकलशपा-
र्श्वविन्यस्तहस्तपल्लवाः प्रकीर्यमाणनखमयूखजालकाः प्र-
त्यंगुलिविवरविनिर्गतजलधाराः सलिलयंत्रदेवता इव
काश्चित् जाड्यमपनेतुमाक्षिप्तबालातपेनेव दिवसश्रिय इव
कनककलशहस्ताः कुंकुमजलेन वारांगनाः क्रमेण राजा-
नमभिषिषिचुः ॥

कादंबरीची व चंद्रापीडाची पहिली भेट झाल्यावर त्यास राहण्या-
रितां क्रीडापर्वतावरील बंगला देववून महाश्वेता कादंबरीच्या बापास
भेटण्याकरितां निघून गेली. हा क्रीडापर्वत कादंबरीच्या महालाजवळच
होता. मग भोंवतालच्या उपवनांची शोभा पाहण्याकरितां चंद्रापीड
बाहेर आला आहे असें पाहून मदनपरवश झालेली कादंबरी कुलीन-
तोचित लज्जा सोडून त्यास पाहण्याकरितां आपल्या गच्चीवर उभी
राहिली. त्या वेळचें वर्णन--

कादंबरी तु तं दृष्ट्वा चिरयतीति महाश्वेतायाः किल
वर्त्मावलोकयितुं विमुच्य तं गवाक्षं अनंगाक्षिप्तचित्ता
सौधस्योपरितनं शिखरमारुरोह । तत्र च विरलपरिजना
सकलशशिमंडलपांडुरेणातपत्रेण हेमदंडेन निवार्यमा-
णातपा चतुर्भिर्बालव्यजनैश्च फेनशुचिभिरुद्धूयमानैरुप-
वीज्यमाना शिरसि कुसुमगंधलुब्धेन भ्रमता भ्रमरकुलेन
दिवापि नीलावगुंठनेव चंद्रापीडाभिसरणवेशाभ्यासमिव
कुर्वती कैलासशिखर इव गौरी मुहुश्चामरशिखां समा-
सज्य मुहुश्छत्रदंडमवलंब्य मुहुस्तमालिकास्कंधे करौ वि-
न्यस्य मुहुर्मदलेखां सखीं परिष्वज्य मुहुः परिजनांतरित-
सकलदेहा नेत्रत्रिभागेण मुहुरावलितत्रिवलीवलया परि-

वृत्य मुहुः प्रतीहारीवेत्रलताशिखरे कपोलं निधाय मुहुर्निश्चलकरविधृतामधरपल्लवे वीटिकां विनिवेश्य मुहुरुद्धूर्णकर्णोत्पलप्रहारपलायमानपरिजनानुसरणदत्तकतिपयपदा विहस्य तं विलोकयंती तेन च विलोक्यमाना महांतमपि कालमतिक्रांतं नाज्ञासीत् ॥

तोच प्रसंग पुनः—

ततः क्रीडापर्वतकगतं उदयगिरिगतमिव चंद्रमसं चंदनदुकूलहारधवलं चंद्रापीडं द्रष्टुं उत्सारितवेत्रच्छत्रचामरचिह्ना निषिद्धाशेषपरिजनानुगमना तमालिकाद्वितीया चित्ररथसुता पुनरपि तदेव सौधशिखरमारुरोह । तत्रस्था च पुनस्तथैव विविधविलासतरंगितैर्विलोकितैर्जहारास्य मनः । तथा हि मुहुर्नितंबबिंबन्यस्तवामहस्तपल्लवा अंसप्रावृतांशुकानुसारप्रसारितदक्षिणकरा निश्चलतारकालिखितेव मुहुर्जृंभिकारंभदत्तोत्तानकरतलतया तद्गात्रस्खलनभिया निरुद्धवदनेव मुहुरंशुकपल्लवताडितनिःश्वासाोद्दुद्भ्रमधुकरमुखरतया प्रस्तुताह्वानेव मुहुरनिलगलितांशुकसंवरणसंभ्रमाद्द्विगुणीकृतभुजयुगलप्रावृतपयोधरतया दत्तालिंगनसंज्ञेव मुहुः केशपाशाकृष्टकुसुमपूरितांजलिसमाघ्राणलीलया कृतनमस्कारेव मुहुरुभयतर्जनीभ्रमितमुक्ताप्रलंबतया निवेदितहृदयोत्कलिकोद्गमेव मुहुरुपहारकुसुमस्खलनविधुतकरतलतया कथितकुसुमायुधशरप्रहारवेदनेव मुहुर्गलितरशनानिबिडनियमितचरणतया संयम्यार्पितेव मन्मथेन मुहुश्चलितोरुविधृतशिथिलदुकूला क्षितितलदोलायमानांशुकैकदेशाच्छादितकुचा चाकितपरिवर्तनत्रुट्यत्त्रिवलीलता अंसस्रस्तचिकुरकलापसंकलनाकुलकरकमला कटाक्षक्षेपधवलीकृतकर्णोत्पलं विलक्ष्यास्मितसुधाधूलिधूसरितकपोलं साचीकृतवदनमनेकरसभंगिभंगुरं विलोकयंती तावदवतस्थे यावदुपसंहतालोको दिवसो बभूव ॥

वरील दोन चुटक्यांत कादंबरीच्या मुग्ध लीलांचें वर्णन किती खुबीदार केलें आहे ! याचप्रमाणें आणखीहि जागोजागचे हवे तितके उतारे घेतां येतील; पण प्रस्तुत ग्रंथांतील शृंगाराची ओळख करून देऊन रसिक वाचकांस चटक लावण्यास वरील तीनच उतारे अगदीं बस आहेत. तथापि आणखीही एका स्थलाचा येथें विशेषतः निर्देश केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. मागें इतकें लिहिलेंच आहे कीं, चंद्रापीड मृगयेच्या नादांत गंधर्वांच्या प्रदेशांत एकटाच शिरला. पुढें त्यास एकाहून एक अद्भुत असे प्रसंग कवीनें घडवून आणले आहेत. पहिला अच्छोदनामक विस्तीर्ण वं रम्य सरोवराचें दर्शन, दुसरा त्या निर्जन वनांत दूरवर ऐकूं आलेला मधुर गायनस्वर, व तिसरा शिवालयांत बसून शिवगीत गाणाऱ्या दिव्य कन्येचें दर्शन. ही कन्या महाश्वेता होय. पुढें राजपुत्राचें तिनें आदरातिथ्य केल्यावर त्यानें तिला आपला वृत्तांत विचारला. तेव्हां तिनें आपलें गंधर्वकुलातील जन्म वगैरे सांगून पुंडरीकनामक एका दिव्य ऋषिकुमाराची व तिची अकस्मात् गांठ कशी पडली, दोघांचें प्रेम तत्क्षणीं कसें जडलें, व शेवटीं रात्रीच्या समयीं त्याचें अभिसरण[1] करण्यास निघाली असतां त्यास मदनवेदनेनें गतप्राण झालेला पाहून तिची अवस्था कशी झाली, वगैरे सर्व आपली कथा तिनें त्यास इत्थंभूत निवेदन केली. हा कथाभाग फारच चित्तवेधक आहे. यांत शृंगार, करुण व अद्भुत या तीन रसांचें मिश्रण आहे. त्यांतून शृंगाराचा प्रकार अत्यंत शुद्ध असल्यामुळें व महाश्वेतेच्या मनाचा थोरपणा दाखविल्यामुळें तर या गोष्टीस विशेष शोभा आली आहे. स्थलौचित्याची तरी यांत उणीव आहे असें नाहीं,— हिमालयाचे अत्युच्च प्रदेश येथील स्थल होत. सारांश, चंद्रापीडास या प्रदेशीं प्रथम येतांच अत्यंत विस्मय व हर्ष झाला त्याप्रमाणेंच वाच-

---

१ ' अभिसरण ' हा पारिभाषिक शब्द आहे. साहित्यशास्त्रांत नायिकाचे आठ प्रकार वर्णिले आहेत, त्यांतीलच एक ' अभिसारिका ' होय. जी स्त्री अत्यंत कामातुर होत्साती काळोख्या रात्रीं निळें वस्त्र परिधान करून आपल्या वल्लभाकडे चोरून जाते तिला ही संज्ञा लावतात.

काम होतें, व पुढें काय बरें असेल अशी त्यांस विलक्षण उत्कंठा लागते. पण त्यांच्या कल्पनेची मोठी मोठी धांवही खऱ्या गोष्टीपर्यंत पोंचत नाहीं. असो. या स्थलाचा उतारा येथें घेण्याची सोय नाहीं यास्तव आमच्या वाचकांनीं तो मुळांतच पहावा.

शृंगाराखेरीज इतर रसही या ग्रंथांत कोठें कोठें आहेत, पण ते अप्रधान असल्यामुळें त्यांचे उतारे येथें घेणें इष्ट दिसत नाहीं. यास्तव या ग्रंथांत जीं जागोजाग रसभरित वर्णनें आहेत त्यांचेच उतारे आतां वाचकांस सादर करतो.

कथारंभींचा पोपट ज्या विस्तीर्ण शाल्मली वृक्षावर राहत होता त्याचें तो वर्णन करतो:—

**तस्यैव पद्मसरसः पश्चिमे तीरे राघवशरप्रहारजर्जरितजीर्णतालतरुखंडस्य च समीपे दिग्गजकरदंडानुकारिणा जरदजगरेण सततमावेष्टितमूलतया बद्धमहालवाल इव तुगस्कंधावलंबिभिरनिलवेल्लितैराहिनिर्मोकैर्धृतोत्तरीय इव दिक्चक्रवालपरिमाणमिव गृह्णता भुवनांतरालविप्रकीर्णेन शाखासंचयेन प्रलयकालतांडवप्रसारितभुजसहस्रमुडुपतिशकलशेखरमिव विडंबयितुमुद्यतः पुराणतया पतनभयादिव गगनस्कंधलग्नः निखिलशरीरव्यापिनीभिरतिदूरोन्नताभिर्जीर्णतया शिराभिरिव परिगतो व्रततिभिः जरातिलकबिंदुभिरिव कंटकैराचिततनुः इतस्ततः परिपीतसागरसलिलैर्गगनागतैः पत्ररथैरिव शाखांतरेषु निलीयमानैः क्षणमंबुभारालसैरार्द्रीकृतपल्लवैर्जलधरपटलैरप्यदृष्टशिखरदेशः तुंगतया नंदनवनश्रियमिवावलोकयितुमभ्युद्यतः समीपवर्तिनामुपरि संचरतामंबरतलगमनखेदायासितानां रविरथतुरंगमाणां सृक्कपरिस्रुतैः फेनपटलैः संदेहिततूलराशिभिर्धवलीकृतशिखरशाखः वनगजकपोलकंडूयनलग्नमदानिलीनमत्तमधुकरमालेन लोहशृंखलाबंधनिश्चलेनेव कल्पस्थायिना मूलेन समुपेतः कोटराभ्यंतरनिविष्टैः स्फुरद्भिः**

**सजीव इव मधुकरपटलैः दुर्योधन इवोपलक्षितशकुनि-पक्षपातः नलिननाभ इव वनमालोपगूढः नवजलधरव्यूह इव नभसि दर्शितोन्नतिः अखिलभुवनतलावलोकनप्रासाद इव वनदेवताना अधिपतिरिव दंडकारण्यस्य नायक इव सर्ववनस्पतीनां सखेव विंध्यस्य शाखाबाहुभिरुपगूह्येव विंध्याटवीमवस्थितो महान् जीर्णः शाल्मली-वृक्षः ।**[1]

पोपटाचा एकंदर इतिहासच फार अद्भुत आहे. त्यांतून तो शाल्मली वृक्षावर होता त्या वेळचा वृत्तात—म्हणजे शबरानीं त्या अरण्यांत पारध केली, शेवटीं एकानें त्या वृक्षावर चढून पुष्कळ राघूमाना मोडून खालीं टाकून दिले; त्या कहरातून हा चमत्कारिक रीतीनें दैववशात् निभावला वगैरे गोष्टी तर फारच चमत्कारिक असून त्यांचें वर्णन फार छानदार केलें आहे. त्या वाचतांच मोठें कौतुक वाटून पुढील ग्रंथाच्या एकंदर उत्कृष्टपणाविषयीं त्या जणूं काय आश्वासनच देतात. त्यांचाच एक लहानसा मासला वरील वर्णन होय. यांतील रस उदात्त होय. या रसाचीं आणखीही उदाहरणें या ग्रंथांत कित्येक ठिकाणीं आहेत. त्यापैकीं हें एक दुसरें;—वर सांगितलेल्या अच्छोद नामक सरोवराचें वर्णनः—

**प्रविश्य च तस्य तरुखंडस्य मध्यभागे मणिदर्पणमिव त्रैलोक्यलक्ष्म्याः स्फटिकभूमिगृहमिव वसुंधरादेव्या निर्गमनमार्गमिव सागराणां निष्यंदमिव दिशां अवतारमिव जलाकारं गगनतलस्य कैलासमिव द्रवतामापन्नं तुषारगिरिमिव विलीनं चंद्रातपमिव रसतामुपेतं हराट्टहासमिव जलीभूतं त्रिभुवनपुण्यराशिमिव सरोरूपेणावस्थितं वैदूर्यगिरिजालमिव सलिलाकारेण परिणतं शरदभ्रवृंदमिव द्रवीभूयैकत्र निष्यंदितं आदर्शभवनमिव प्र-**

---

१. वरील उताऱ्याचें मराठी भाषांतर पाहणें असल्यास ' निबंधमाला ' अंक १२ पहावा.

चेतसः स्वच्छतया मुनिमनोभिरिव सज्जनगुणैरिव हरिणलोचनप्रभाभिरिव मुक्ताफलांशुभिरिव निर्मितं आपूर्णपर्यंतमपि अंतःस्पष्टदृष्टसकलवृत्तांततया रिक्तमिवोपलक्ष्यमाणं अनिलोद्धूतजलतरंगशीकरधूलिजन्मभिः सर्वतः समुत्थितैः संरक्ष्यमाणमिवेन्द्रचापसहस्रैः प्रतिमानिभेनांतःप्रविष्टसकलकाननशैलनक्षत्रग्रहचक्रवालं त्रिभुवनमुद्भिन्नपंकजेनोदरेण नारायणमिव बिभ्राणं आसन्नकैलासावतीर्णस्य च शतशो भगवतः खंडपरशोर्मज्जनोन्मज्जनक्षोभचालितचूडामणिचंद्रखंडच्युतेनामृतरसेन जलक्षालितवामार्धकपोलगलितलावण्यप्रवाहानुकारिणा संमिश्रितजलं उपकूलतमालवनप्रतिबिंबांधकारिताभ्यंतरैः दृश्यमानरसातलद्वारैरिव सलिलप्रदेशैः गंभीरतरं दिवाप्युपजातनिशाशंकैश्चक्रवाकमिथुनैः परिन्हियमाणनीलोत्पलवनगहनं असकृत्पितामहपरिपूरितकमंडलुपरिपूतजलं अनेकशो वालखिल्यकदंबककृतसंध्योपासनं बहुशः सलिलावतीर्णसावित्रीभग्नदेवतार्चनकमलं सहस्रशः सप्तर्षिमंडलस्नानपवित्रीकृतं सर्वदा सिद्धवधूधौतकल्पलतावल्कलपुण्यीकृतोदकं उदकक्रीडादोहदागतानां च गुह्यकेश्वरांतःपुरकामिनीनां मकरकेतुचापचक्राकृतिभिरतिविकटैरावर्तिभिर्नाभिमंडलैरापीतसलिलं क्वचिद्वरुणहंसाक्रांतविकचकमलवनखंडं क्वचिद्दिग्गजमज्जनजर्जरितजरन्मृणालजालदंडं क्वचित् त्र्यंबकवृषभविषाणकोटिखंडिततटशिलाखंडं क्वचिद्यममहिषशृंगशिखरविक्षिप्तफेनपिंडं क्वचिदैरावतमिव मृणालवलयालंकृतं महापुरुषमिव मीनमकरकूर्मचक्रप्रकटलक्षणं षण्मुखचरितमिव श्रूयमाणक्रौंचवनिताविलापं भारतमिव पांडुधार्तराष्ट्रकुलपक्षकृतक्षोभं अमृतमथनसमयमिव तीरावस्थितशितिकंठपीयमानविषं कृष्णबालचरितमिव तटकदंबशाखाधिरूढहरिकृतजलप्रपातक्रीडं मदनध्वज-

मिव मकराधिष्ठितं दिव्यमिवानिमिषलोचनरमणीयं अरण्यमिव विजृंभमाणपुंडरीकं उरगकुलमिवानंतशतपत्रपक्षोद्भासितं कंसबलमिव मधुकरकुलोपगीयमानकुवलयापीडं कद्रुस्तनयुगलमिव नागसहस्रपीयमानपयोगंडूषं मलयमिव चंदनाशिशिरवनं असत्साधनमिवादृष्टांतं अतिमनोहरमाल्हादनं दृष्टेरच्छोदं नाम सरो दृष्टवान्।

वर सांगितलेल्या शबरांनीं विंध्याटवींत शिकारीची धुमाळी करून दिल्यानंतर त्यांचा सेनापति वर वर्णिलेल्या सांवरीच्या झाडाखालीं विश्रांति घेण्यास बसला; त्या प्रसंगाचें वर्णनः—

ततः स शबरसेनापतिरटवीपरिभ्रमणसमुद्भवं श्रममपनिनीषुरागत्य तस्यैव शाल्मलितरोरधश्छायायामवतारितकोदंडः त्वरितपरिजनोपनीते पल्लवासने समुपाविशत्। अन्यतमस्तु शबरयुवा ससंभ्रममवतीर्य तस्मात् करयुगलपरिक्षोभितांभसः सरसो वैडूर्यद्रवानुकारि प्रलयदिवसकरकिरणोपतापादंबरैकदेशमिव विलीनं इंदुमंडलादिव प्रस्यंदितं द्रुतमिव मुक्ताफलनिकरं अत्यच्छतया स्पर्शानुमेयं हिमजडं अरविंदकोषरजःकषायमंभः कमलिनीपत्रसंपुटेन प्रत्यग्रोद्धृताश्च धौतपंकनिर्मला मृणालिकाः समुपाहरत्। आपीतसलिलश्च शबरसेनापतिस्ता मृणालिकाः शशिकला इव सैंहिकेयः क्रमेणादशत्। अपगतश्रमश्चोत्थाय परिपीतांभसा सकलेन तेन शबरसैन्येनानुगम्यमानः शनैः शनैरभिमतं दिगंतरमयासीत्॥

चंद्रापीडचा सर्व विद्याभ्यास पुरता झाल्यावर त्याच्या बापानें त्यास उज्जयिनीस माघारा आणला, आणि त्यास यौवराज्याभिषेक करण्याचा विचार ठरविला. तव्हां एके दिवशीं त्यास त्याच्या बापाचा मंत्री जो शुकनास यानें त्या प्रसंगास उचित असा सविस्तर उपदेश

केला. हा सामान्य पुस्तकाचीं आठ दहा पृष्ठें भरण्याइतका मोठा आहे. यांत तारुण्य, राजलक्ष्मी, हांजी हांजी करणारे दुष्ट धूर्त लोक, इत्यादिकांपासून राजपुत्रांस जे जे अनर्थ प्राप्त होतात त्यांचें कविसंप्रदायानुरूप अलंकारिक वर्णन केलें आहे. या स्थलीं बाणकवि अगदीं भरांत आला असून त्यानें आपला शब्दार्थांचा अक्षय कोश पूर्णतेनें प्रगट केला आहे. यांतील राज्यलक्ष्मीचें वर्णन आमच्या रसिक वाचणारांकरितां येथें उतरून घेतों:--

"—आलोकयतु तावत् कल्याणाभिनिवेशी लक्ष्मीमेव प्रथमम्। इयं हि सुभटखड्गमंडलोत्पलवनविभ्रमभ्रमरी लक्ष्मीः क्षीरसागरात् पारिजातपल्लवेभ्यो रागं इंदुशकलादेकांतवक्रतां उच्चैःश्रवसश्चंचलतां कालकूटान्मोहनशक्तिं मदिराया मदं कौस्तुभमणेरतिनैष्ठुर्यं इत्येतानि सहवासपरिचयवशाद्विरहविनोदचिह्नानि गृहीत्वेवोद्गता। न ह्येवंविधमपरमपरिचितमिह जगति किंचिदस्ति। यथेयमनार्या लब्धापि खलु दुःखेन परिपाल्यते दृढगुणपाशसंदाननिष्पंदीकृताऽपि अपक्रामति उद्दामदर्पभटसहस्रोल्लासितासिलतापंजरविधृताऽपि अपक्रामति मदजलदुर्दिनांधकारगजघटितघनघटाटोपपरिपालिताऽपि प्रपलायते न परिचयं रक्षति नाभिजनमीक्षते न रूपमालोकयते न कुलक्रममनुवर्तते न शीलं पश्यति न वैदग्ध्यं गणयति न श्रुतमाकर्णयति न धर्ममनुरुध्यते न त्यागमाद्रियते न विशेषज्ञतां विचारयति नाचारं पालयति न सत्यमनुबुध्यते न लक्षणं प्रमाणीकरोति गंधर्वनगरलेखेव पश्यत एव नश्यति। अद्याप्यारूढमंदरपरिवर्तावर्तभ्रांतिजनितसंस्कारेव परिभ्रमति कमलिनीसंचरणव्यतिकरलग्ननलिननालकंटकक्षतेव न क्वचिन्निर्भरमाबध्नाति पदं अतिप्रयत्नविधृताऽपि परमेश्वरगृहेषु विविधगंधगजगंडमधुपानमत्तेव परिस्खलति पारुष्यमिवोपशिक्षितुम-

सिधारासु निवसति विश्वरूपत्वमिव ग्रहीतुमाश्रिता नारायणमूर्तिं अप्रत्ययबहुला च दिवसांतकमलमिव समुपचितमूलदंडकोषमंडलमपि मुंचति भूभुजं लतेव विटपकानध्यारोहति गंगेव वसुजनन्यपि तरंगबुद्बुदचंचला दिवसकरगतिरिव प्रकटितविविधसंक्रांतिः पातालगुहेव तमोबहुला हिडिंबेव भीमसाहसैकहार्यहृदया प्रावृडिव अचिरद्युतिकारिणी दुष्टपिशाचीव दर्शितानेकपुरुषोच्छ्राया स्वल्पसत्वमुन्मत्तीकरोति सरस्वतीपरिगृहीतं ईर्षयेव नालिंगति जनं गुणवंतमपवित्रमिव न स्पृशति उदारसत्वममंगलमिव न बहु मन्यते सुजनमनिमित्तमिव न पश्यति अभिजातमहिमिव लंघयति शूरं कंटकमिव परिहरति दातारं दुःस्वप्नमिव न स्मरति विनीतं पातकिनमिव नोसर्पति मनस्विनमुन्मत्तमिव हसति परस्परविरुद्धं च इंद्रजालमिव दर्शयंती प्रकटयति जगति निजं चरितम्। तथा हि सततमूष्माणमारोपयंत्यपि जाड्यमुपजनयति उन्नतिमादधानाऽपि नीचस्वभावतामाविष्करोति तोयराशिसंभवाऽपि तृष्णां संवर्धयति ईश्वरतां दधानाप्यशिवप्रकृतित्वमातनोति बलोपचयमाहरंत्यपि लघिमानमापादयति अमृतसहोदराऽपि कटुविपाका विग्रहवत्यपि अप्रत्यक्षदर्शना पुरुषोत्तमरताऽपि खलजनप्रिया रेणुमयीव स्वच्छमपि कलुषीकरोति यथा यथा चेयं चपला दीप्यते तथा तथा दीपशिखेव कज्जलमलिनमेव कर्म केवलमुद्वमति॥ ”

चंद्रापीड दिग्विजयास निघाला असतां त्याच्या सैन्याच्या योगानें जो धुराळा उडाला त्याचें वर्णनः—

शनैः शनैश्च बलसंक्षोभजन्मा क्षितेरनेकवर्णतया कचिज्जीर्णशफरक्रोडधूम्रः क्वचित् क्रमेलकसटासन्निभः क्वचित् परिणतरल्लकरोमपल्लवमलिनः क्वचित् पत्रोर्णतंतुपांडरः क्वचिज्जरठमृणालदंडधवलः क्वचिज्जरत्कपिकेश-

रकपिलः क्वचिद्धरवृषभरोमंथफेनपिंडपांडुरः त्रिपथगाप्रवाह इव हरिचरणप्रभवः कुपित इव मुंचन् क्षमां आरब्धपरिहास इव रुंधन्नयनानि तृषित इव पिबन् करिकरशीकरजलानि पक्षवानिवोत्पतन् गगनतलं अलिनिवह इव चुंबन्मदलेखां मृगपतिरिव रचयन् करिकुंभस्थलीषु पदं उपात्तविजय इव गृह्णन् पताकाः जरागमपांडरीकुर्वन् शिरांसि मुद्रयन्निव पक्ष्माग्रसंस्थितो दृष्टि आजिघ्रन्निव मकरंदमधुबिंदुलग्नः कर्णोत्पलानि मदकलकरिकर्णतालताडनत्रस्त इव विशन् कर्णशंखोदरविवराणि पीयमान इव उन्मुखीभिरवनिपातिमुकुटमणिभंगमकरिकाभिः अभ्यच्यर्मान इव तुरगमुखविक्षेपविधुतैः फेनपल्लवकुसुमस्तबकैः अनुगम्यमान इव मत्तगजघटाकुंभभित्तिसंभवेन धातुधूलिवलयेन आलिंग्यमान इव चलच्चामरकलापविधुतेन पटवासपांसुना प्रोत्साह्यमान इव नरपतिशेखरसहस्रपरिच्युतैः कुसुमकेसररजोभिः उत्पातराहुरिव दिवसकरमंडलमकांड एव पिबन् नृपप्रस्थानमंगलप्रतिसरवलयमालिकासु गोरोचनाचूर्णायमानः क्रकचकृतचंदनक्षोदधूसरो रेणुरुत्पपात । अपरिमाणबलसंघट्टसमुपचीयमानश्च शनैः शनैः संहरन्निव विश्वमशेषं अकालकालमेघपटलमेदुरो विस्तारमुपगंतुमारेभे ॥

वरील वर्णनपर उताऱ्यांवरून आपल्या कवीची वर्णन करण्याची शैली, व श्लेष, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांचा चमत्कार, यांची बरीच कल्पना आमच्या वाचकांच्या मनांत आली असेल आतां निराळ्या प्रकारचे दोन उतारे घेतों म्हणजे बस झाले

महाश्वेतेचा वर सांगितलेला दुःखवृत्तांत ऐकून कादंबरीनें असा निश्चय केला होता कीं, जोंपर्यंत महाश्वेता पतिविरहित असेल तोंपर्यंत मी लग्न करणार नाहीं. या तिच्या आग्रहापासून तिचें मन फिरविण्यास तिच्या आईबापांनीं पराकाष्ठा केली; पण ती एकेना. शेवटीं महाश्वेतेलाच त्यांनीं असा निरोप धाडला कीं, तूं तरी कांहीं सांगून

हिचें मन वळीव. त्याप्रमाणें तिनें आपली सखी तरलिका कादंबरीकडे पाठविली असतां ती पुढील उलट निरोप घेऊन माघारी आली:--

" भर्तृदारिके महाश्वेते, देवी कादंबरी दृढदत्तकंठग्रहा त्वां विज्ञापयति । यदियमागत्य मामवदत्तरलिका तत्कथय किमयं गुरुजनवचनानुरोधः किमिदं मच्चित्तपरीक्षणं किं गृहनिवासापराधनिपुणोपालंभः किं प्रेमविच्छेदाभिलापः किं भक्तजनपरित्यागोपायः किंवा प्रकोपः । जानास्येव मे सहजप्रेमनिष्पंदनिर्भरं हृदयम् । एवमतिनिष्ठुरं संदिशंती कथमसि न लज्जिता तथा मधुरभाषिणी केनासि शिक्षिता वक्तुमप्रियं परुषमभिधातुं वा । स्वस्थोऽपि तावत् कइव सहृदयः कनीयस्यवसानविरसे कर्मणीदृशे मतिमुपसर्पयेत् किमुतातिदुःखाभिहतहृदयोऽस्मद्विधो जनः । सुहृदुःखखेदिते हि मनसि कैव सुखाशा कैव निर्वृतिः कीदृशाः संभोगाः कानि वा हसितानि । येनेदृशीं दशामुपनीता प्रियसखी कथमतिदारुणं तमहं विषमिवाप्रियकारिणं कामं सकामं कुर्याम् । दिवसकरास्तमनविधुरासु नलिनीषु सहवासपरिचयाच्चक्रवाकयुवतिरपि समागमसुखानि परित्यजति किमतु नार्यः । अपि च यत्र भर्तृविरहविधुरा अपहृतपरपुरुषदर्शना दिवानिशं निवसति प्रियसखी कथमिव तन्ममहृदयमपरः प्रविशेज्जनः । यत्र च भर्तृविरहविधुरा तीव्रव्रतकर्षितांगी प्रियसखी महत् कृच्छ्रमनुभवति तत्राहमवगणय्यैतत् कथमात्मसुखार्थिनी पाणिं ग्राहयिष्यामि कथं वा मम सुखं भविष्यति । त्वत्प्रेम्णा चास्मिन् वस्तुनि कुमारिकाजनविरुद्धं स्वातंत्र्यमालंब्यांगीकृतमयशः समवधीरितो विनयः गुरुवचनमतिक्रमितं न गणितो लोकापवादः वनिताजनस्य सहजमाभरणमुत्सृष्टा लज्जा सा कथय कथमिव पुनरत्र प्रवर्तते । तदयमंजलिरुपरचितः प्रणामोऽयं इदं च पादग्रहणं अनुगृहाण मां वनमितो गतासि मे

**अचिंतितेन सहेति मा कृथाः स्वप्नेऽपि पुनरिममर्थं मनसि "—इत्यभिधाय तूष्णीमभूत् ॥**

वरील उताऱ्याची निराळी तारीफ करणें नको. या ठिकाणीं कवीनें कथेंतील नायिकेशीं वाचकांचा प्रथम प्रवेश किंचित् करून दिला आहे, आणि तिचा गंभीरपणा, तिची उदारता, स्नेहलता, चातुर्य हे गुण दाखविले आहेत. यांच्या योगानें ती त्यांच्या मनांत भरून त्यांचें अंतःकरण पुढील कथेविषयीं उत्कंठित होतें.

वरचे सर्व उतारे 'कादंबरी' च्या पूर्वार्धांतील म्हणजे खुद्द बाणकवीचेच झाले. आतां हा शेवटचा मात्र त्याच्या पुत्रानें रचलेल्या उत्तरार्धांतला होय. या एकट्यावरूनच त्याच्या कवित्वाची व पूर्वार्धपूरण करण्याविषयींच्या त्याच्या योग्यतेची वाचकांस सहज परीक्षा होईल.—

कथारंभींचा पोपट आदल्या जन्मीं चंद्रापीडाचा मित्र म्हणजे मंत्री शुकनास याचा पुत्र वैशंपायन होता. तो दिग्विजयार्थ निघालेल्या सैन्याच्या बरोबर असून, ते जेव्हां चंद्रापीडाचा माग काढीत महाश्वेतेच्या आश्रमाजवळ येऊन राहिले त्या वेळेस तोही त्यांच्या बरोबर होताच. यापुढें एक फारच चमत्कारिक प्रसंग घडून आला आहे, तसा बहुधा कोठेंही नसेल. वैशंपायन हा पूर्वींच्या जन्मींचा ऋषिकुमार पुंडरीक होय. यास्तव आदल्या जन्मीं महाश्वेतेचा व त्याचा शृंगारवृत्तांत ज्या ठिकाणीं घडला होता त्याच प्रदेशीं तो पुनः कर्मधर्मसंयोगानें आला. असें असतां एके दिवशीं असें घडलें:—

**अन्यस्मिन्नहनि आहतायां प्रयाणभेर्यां सज्जीक्रियमाणे साधने प्रातरेवारमान् वैशंपायनोऽभ्यधात्। अतिपुण्यं तदच्छोदसरः पुराणे श्रूयते। तदस्मिन् स्नात्वा**

---

१ याचें एका पक्षीं कारण उघडच आहे, कीं पुनर्जन्माचें प्रतिपादन केवळ हिंदुधर्मांत मात्र आहे. यूरोपखंडांत हें मत एका पैथागोरियन्-नामक पंथाखेरीज कोणी मानीत नाहींत. या पंथाचें हिंदुधर्माशीं दुसऱ्याही एका मोठ्या गोष्टींत चमत्कारिक साम्य आहे;—तें मांसाहारनिषेधाविषयीं होय.

प्रणम्य चास्यैव तीरभाजि सिद्धायतने भगवंतं भवामवप्रभुं महेश्वरं शशांकशकलशेखरं व्रजामः दिव्यजनसेविता केन कदा पुनः स्वप्नेऽपि भूमिरियमालोकितेत्यभिधाय चरणाभ्यामेवाच्छोदसरस्तीरमयासीत्।

तत्र चातिरम्यतयैव सर्वतो दत्तदृष्टिः संचरन्नमरकामिनीश्रोत्रशिखरारोहणप्रणयोचितैः तरंगानिलाहतिविलोलवृत्तिभिः किसलयैः अविरलकुसुममकरंदलोभपुंजितानां च मत्तमधुलिहां मंजुना शिंजितरवेण दूराद्वह्वयंतमिव मरकतमणिश्यामया प्रभयाऽनुलिंपंतमिव समं दशदिग्भागान् अदत्तदिवसकरकिरणप्रवेशतया दिवाऽप्यंतर्निशीथमिव बिभ्राणं चिरपरिचितैरपि मेघोद्गमाशंकया मुहुर्मुहुरुन्मुक्तमधुरकेकारवैः वनशिखंडिभिरुत्कंधरैरवलोक्यमानं पदमिव जलदकालस्य प्रतिपक्षमिव सर्वसंतापानां निजावासमिव जडिम्नः निर्गममार्गमिव सुरभिमासस्य आश्रयमिव मकरध्वजस्य उत्कंठाविनोदस्थानमिव रतेः आस्पदमिव सर्वरमणीयानां अनवरतचलितसुरभिशीतलाच्छोदसरस्तरंगमारुताभिर्वीजिताभ्यंतरशिलातलं अन्यतमं तटलतामंडपमद्राक्षीत्।

दृष्ट्वा च तमतिचिरांतरितदर्शनं भ्रातरमिव तनयमिव सुहृदमिव चानन्यदृष्टिः विस्मृतनिमेषेण चक्षुषा विलोकयन् स्तंभित इव लिखित इव सुचिरमूर्ध्व एव स्थित्वा अपारयन्निवांगानि धारयितुमाक्रम्यमाण इव मूर्च्छयोन्मुच्यमान इवेन्द्रियैर्झटित्युन्मुक्तांगः समुपविश्य भूमौ किमप्यंतरात्मना स्मरन्निवानुध्यायन्निव निर्विकारहृदयो गलितलोचनपयोधारासंतानस्तूष्णीमधोमुखस्तस्थौ। तथावस्थितं तमवलोक्यास्माकमुदपादि चेतसि चिंता येन केनचिदपाह्रियंत एव रसिकहृदयाः परिणामधीरमतयोऽपि किं पुनः कुतूहलास्पदे प्रथमे वयसि वर्तमानाः। त-

स्मान्नियतमियमस्येमामतिमनोहरां भूमिमालोक्य भावयतो हृदयविकृतिरीदृशी जातेति। न चिराच्च तमेवमवदाम वयं दृष्टा दर्शनीयानामवधिरेषा तदुत्तिष्ठ संप्रति निर्वर्तयामः स्नानविधिं अतिमहती वेला जाता सज्जीभूतं साधनं प्रयाणाभिमुखः सकलः स्कंधावारस्त्वां प्रतिपालयन्नास्ते किमद्यापि विलंबितेनेति। स त्वेवमुक्तोऽप्यस्माभिरश्रुतास्मदालाप इव जड इव मूक इव अशिक्षित इव वक्तुं न किंचिदपि प्रत्युत्तरमदात्। तमेव केवलमनिमेषपक्ष्मणा निश्चलस्तब्धतारकेण संतताश्रुस्रोतसालिखितेनेव चक्षुषा लतामंडपमालोकितवान्।

अशी त्याची एकाएकीं अवस्था झालेली पाहून सैन्यांतील लोकांस फार आश्चर्य वाटलें. नंतर त्यांनीं त्यास तेथून निघण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला, परोपरीनें विनंती केली, शेवटीं निर्भर्त्सनाही केली, तरी त्यास तेथून उठावेंसें वाटेना. शेवटीं तो त्यांस म्हणतोः—

'किमेतावदपि न वेत्सि यद्गमनाय मां भवंतः प्रतिबोधयंति। अपि च चंद्रापीडेन विना क्षणमप्यहमन्यत्र न पारयामि स्थातुं एषैव मे गरीयसी परिबोधना। तथापि किं करोम्यनेनैव क्षणेन सर्वत्र विगलितं मे प्रभुत्वम्। तथा हि स्मरदिव किमपि मनो नान्यत्र प्रवर्तते पश्यंतीव किमपि न दृष्टिरन्यतो वलति आसक्तमिव क्वापि हृदयं किमपि न जानाति निगडितामिव अन्यत्र पदमपि न दातुं चरणावुत्सहेते कीलितेव चास्मिन्नेव स्थाने तनुः तदात्मना त्वहमसमर्थो यातुम्। * * *'

मुहूर्तादिव चोत्थाय तेषु तेषु रम्यतरेषु तरुतलेषु लतागृहेषु सरस्तीरेषु तस्मिंश्च देवायतने किमपि नष्टमिवान्विष्यन्ननन्यदृष्टिर्बभ्राम। भ्रांत्वा च चिरमिव खिन्नांतरात्मा सनिर्वेदमूर्ध्वं च निःश्वस्यान्यतरस्मिन् लतागहने पुनरुपविश्य तस्थौ।

वरील अंतामंडपाचें वर्णन किती रम्य आहे ! तसेंच त्या ठिकाणीं आदल्या जन्मीं घडलेल्या विरहवृत्तांताचें काहीं स्मरण वैशंपायनाच्या मनांत अस्पष्ट रीतीनें उद्भवून[1] त्याच्या वृत्तींत जो एकाएकीं फेर पडला त्याचें व एकंदर प्रसंगाचें वरील वर्णन वाचतांना मन वेधून जाऊन त्याची वृत्ति किती चमत्कारिक होते ! प्रस्तुत प्रसंग कांहीं सामान्य नव्हे. या ठिकाणीं एकंदर कथानकाचा रोख फिरून फार वेळानें आरंभींच्या कथाभागाचें खरें स्वरूप किंचित् दृष्टीस पडूं लागतें. वास्तव अशास सांभाळून नेण्यास मूळच्या कवीचीच शक्ति अपेक्षित होती. तीच पूर्वार्ध रचणारानें प्रकृत स्थलीं सर्वथा प्रकट केली आहे.

यापुढें बाणभट्टाविषयीं लिहिण्यासारखें कांहीं विशेष उरलेंसें दिसत नाहीं. तथापि या कवीचा निरोप घेण्यापूर्वी त्यावर येऊं पाहणाऱ्या एका मोठ्या दोषारोपाचा निकाल करणें येथें अवश्य दिसतें. ज्यांचा संस्कृत कवितेशीं चांगला परिचय झाला नाहीं अशा परस्थ लोकांच्या दृष्टीनें, व त्यांच्या पलीकडे पाहण्याची ज्यांस इच्छा नाहीं, किंवा शक्ति नाहीं ' किंवा दोन्हीही नाहींत, अशा एतद्देशीय अनन्यशरण कित्येक संस्कृतज्ञांस, वरील ग्रंथांतील पुष्कळ जागचें वर्णन फार विलक्षण वाटेल, पण ते असा विचार करीत नाहींत कीं, कोणत्याही दोन भिन्न राष्ट्रांचे कोणतेही सांप्रदाय एकाशीं एक अगदीं सारखे कधींही मिळत नाहींत, व तसें होणें हें शक्यही नव्हे;—कां कीं, व्यक्तिव्यक्तींत जसा मनोधर्मांचा भेद नेहमीं दृष्टीस पडतो, तसाच तो राष्ट्राराष्ट्रांतही अवश्य असायचाच. तेव्हां इंग्लिश वगैरे अत्यंत

---

१ या अद्भुत प्रसंगाची कल्पना ' शाकुंतला ' वरून बाणभट्टास सुचली असावी असें वाटतें. त्या नाटकाच्या पांचव्या अंकाच्या आरंभीं एक मधुर गीति ऐकून राजाचें अंतःकरण ( त्याच्या मतें ) कांहीं एक कारण नसतां अत्यंत विरहोत्कंठित झालें. हें काय असावें याविषयीं संदेहांत पडून तो म्हणतो:--

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्
पर्युत्सुकीभवति यत्सुखितोऽपि जंतुः ।
तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं
भावस्थिराणि जननांतरसौहृदानि ॥

भिन्न राष्ट्रांचे काव्यसंप्रदाय. संस्कृताच्या काव्यसंप्रदायांशीं सर्वथा कसे मिळावे ! यास्तव देश, काल, आचार इत्यादिकांच्या मानानें दोघां-नींही एकमेकांचें स्वरूप यथास्थित लक्षांत आणण्यास समंजसपणें व प्रांजलपणें यत्न केला पाहिजे. असें केलें असतां हार घेऊन खालीं पाहण्याची पाळी आम्हांस येईल ही शंका सुद्धां नको; व लिहिण्यास मोठा उत्साह वाटतो कीं, याविषयीं येवढी खात्री होण्यास बुद्धीनें व अंतःकरणानें थोर अशा महान् यूरोपस्थ पंडितांचेच लेख कारणभूत झाले आहेत. असो. हें सर्व एकंदर संस्कृत कवींच्या पक्षानें झालें. त्यांतून **बाण**कवीसारख्या कादंबरीकाराच्या तर्फेनें तर आणखीही एक विचार कळविण्यासारखा आहे. वरील ग्रंथांत वस्तुस्थितीस विरुद्ध अशा अनेक गोष्टी आणल्या आहेत खऱ्या;—जसें हंसादिकांचें कादं-बरीच्या महालांतून वगैरे परिचिताप्रमाणें वागणें, ती कोठेंही गेली असतां तिच्या मुखास सुवासास्तव भ्रमरांनीं झटणें, शबरांच्या सेना-पतीनें पुष्कळ सावजें व पाखरें मारलीं असतां पल्लवासनावर बसून कमलवेलीच्या पानांच्या द्रोणानें पाणी पिऊन कमलांचीं पांढरीं शुभ्र देठेंच ( ' राहूनें चंद्रकलांप्रमाणें ' ) चावून खावीं, इत्यादि. पण या-संबंधे उक्त ग्रंथास सदोष ठरविण्यापूर्वीं गुणदोषविवेचकांचा बहाणा कर-णारांनीं ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, **बाण**कवीचा उद्देश इतिहास लिहिण्याचा नव्हता, तर काल्पित अद्भुत कथा लिहिण्याचा होता; यास्तव त्याच्या कल्पनानिर्मित अपूर्व सृष्टीस व्यवहारि जगां-तील गोष्टी सर्व प्रकारें लावूं पाहणें म्हणजे अरसिकतेची पराकाष्ठा असून कविवाग्देवतेचा मोठा उपमर्द करणें होय !

---

# संस्कृत कवि.

## सुबंधु.

**कविनामगलद्दर्पो नूनं वासवदत्तया ।**
**शक्त्येव पांडुपुत्राणां गतया कर्णगोचरम् ॥**[1]

हर्षचरित–बाणभट्ट.

या कवीची कीर्ति त्यानें रचलेल्या 'वासवदत्ता' नामक एकट्या ग्रंथावरच कायती आहे. हा ग्रंथ नुसताच उपलब्ध असता तर त्यावरून या कवीविषयींची इतर माहिती बहुधा कांहींच देतां न येती. पण लिहिण्यास आनंद वाटतो कीं, **डॉक्टर हॉल्** साहेबांनीं पुष्कळ वर्षांमागें 'बिब्लिओथिका इंडिका' या नांवाच्या संस्कृत ग्रंथमालेंत 'वासवदत्ता' प्रसिद्ध केली आहे. ही 'वासवदत्ते'ची आवृत्ति फार परिश्रम घेऊन तयार केली असून **सुबंधु** कवीच्या काव्याच्या संबंधानें वगैरेही यांत बराच मजकूर आहे. असो. याप्रमाणें पुढील लेखास पुष्कळ अंशीं आधारभूत जो **हॉल्** साहेबांचा ग्रंथ त्या-विषयींची आमची कृतज्ञताबुद्धि येथें प्रकट करून मुख्य विषयास आरंभ करितो.

ग्रंथाचा कालनिर्णय करण्याचे दोन मार्ग आहेत:--एक अंतः-प्रमाणावरून व दुसरा बाह्यप्रमाणावरून. अंत:प्रमाण म्हणजे खुद्द ग्रंथांतच जें सांपडतें तें; व बाह्यप्रमाण म्हणजे त्या ग्रंथाविषयीं किंवा ग्रंथकाराविषयीं कोणाचा प्रमाणभूत लेख अथवा कर्णोपकर्णीं चालत आलेल्या दंतकथा वगैरे. हे दोन्ही प्रकार प्रस्तुत ग्रंथाच्या संबंधें सांपडतात. **सुबंधूनें** आपल्या लोकांच्या एकंदर सांप्रदायाप्रमाणें

---

१ "ज्याप्रमाणें इंद्रानें दिलेली शक्ति कर्णाजवळ जातांच पांडवांचा गर्व गळाला, त्याप्रमाणेंच 'वासवदत्ता' कर्णगोचर होतांच कवींनीं बहुधा गर्व सांडला !"

आपल्या ग्रंथाचा शक स्वतः तर लिहिला नाहींच, व स्वतःविषयींची माहितीही एका नांवाखेरीज दुसरी कोणतीही बिलकुल दिली नाहीं, हें खरें; तथापि त्याच्या प्रस्तावनेंतील एक आर्या त्याच्या कालाविषयीं अंतःप्रमाणभूत आहे. ती ही:—

**सा रसवत्ता[1] विहता नवका[2] विलसंति चरति नो कं कं।**
**सरसीव कीर्तिशेषं गतवति भुवि विक्रमादित्ये ॥**

"**विक्रमादित्य** राजा कीर्तिशेष होऊन (मरण पावून) सांप्रतकाळीं नवेच क्षुद्र राजे आपलें प्रभुत्व मिरवीत आहेत; पण तें मागचें तेज त्याच्या बरोबरच गेलें; सध्या कोण कोणाला दडपीत नाहीं ?"

वरील आर्येत महाप्रतापी व विद्वज्जनांचा आदरकर्ता जो **विक्रमादित्य** राजा त्याच्याविषयीं विलाप करून पुढील राजांचा दुर्बळपणा व त्यांच्या राज्यांतील अंदाधुंदी **सुबंधूनें** वर्णिली आहे. यावरून तो **विक्रमादित्याच्या** मागें पुष्कळ वर्षांनीं झाला असावा हें स्पष्ट दिसतें. 'वासवदत्ते'ची कृत्रिम रचना ही वरील कल्पनेस अनुकूळ पडते.

या कवीच्या काळाविषयींचीं बाह्यप्रमाणें हीं वरच्या सारखींच निर्णायक आहेत. **बाणभट्टानें** आपल्या 'हर्षचरिता'च्या आरंभीं आपल्या आधींच्या अनेक कवींचें वर्णनें केलें आहे. त्यांत तो सुबंधूविषयीं म्हणतो:—

**कवीनामगलद्दर्पो नूनं वासवदत्तया ।**
**शक्त्येव पांडुपुत्राणां गतया कर्णगोचरम् ॥**

" ज्याप्रमाणें वासवदत्ता (इंद्रानें दिलेली) शक्ति कर्णाजवळ

---

१ वरील आर्येत विक्रमादित्याचें व सरोवराचें सादृश्य वर्णिलें आहे; व 'रसवत्ता' आणि 'नवकाः' हीं पदें श्लिष्ट आहेत. 'रसवत्ता' म्हणजे पराक्रमीपणा' ( ' रसिकपणा ' ही ध्वनित होतो ) आणि ' जलयुक्तता '; ' नवकाः ' म्हणजे ' नवे ' ( 'क' कुत्सार्थी ) आणि ' न वकाः ' ( विलसंति ) म्हणजे ' बगळे ' ( शोभत ) नाहींत. एकंदर श्लेषार्थ असा:—

२ " ज्याप्रमाणें एखादें सरोवर आटलें असतां पाणी नाहींसें होतें, बगळ्यांची शोभा नष्ट होते, आणि मोठाले जलचर धाकट्यांस खाऊं लागतात, " त्याप्रमाणें राज्याची दुर्दशा होऊन गेली आहे.

जातांच पांडवांचा 'गर्व' गळाला, त्याप्रमाणेंच 'वासवदत्ता' कर्णगोचर होतांच ( ऐकतांच ) कवींनीं बहुधा गर्व सांडला !"

वरील प्रशंसापर पद्यावरून स्पष्ट दिसतें कीं, **सुबंधु** इ० स० ६५० याच्या बराच पूर्वी झाला असावा.

**सुबंधू**विषयीं **कविराजा**नें ही असें लिहिलें आहे:--

**सुबंधुर्बाणभट्टश्च कविराज इति त्रयः ।**
**वक्रोक्तिमार्गनिपुणश्चतुर्थो विद्यते न वा ॥**

"वक्रोक्तींत म्हणजे श्लेषादि चमत्कार करण्यांत **सुबंधु**, **बाणभट्ट** आणि **कविराज** या तिघांचाच मात्र हक्क;–त्यांच्या जोडीचा चवथा कोणी असेल, नसेल !"

या पद्यावरून **सुबंधु कविराजा**च्याही अगोदरचा असावा हें सहजच दिसत आहे.

असो. याप्रमाणें आपल्या कवीच्या काळाचा बराच सुमार लागला असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां त्यांच्या नांवानें प्रसिद्ध जी एकच कृति 'वासवदत्ता' तिजविषयीं विचार करूं.

'वासवदत्ता' हें नांव प्राचीन काळीं लोकांचें फार आवडतें असावें असें दिसतें. नायिकेस हें नांव दिलेले ग्रंथ सध्यांही कित्येक माहीत आहेत. **पाणिनी**च्या व्याकरणसूत्रांवर वार्तिकें केलेला जो प्रसिद्ध **कात्यायन** त्यानें एके ठिकाणीं 'वासवदत्ता' नामक एका प्राचीन कथेस अनुलक्षून लिहिलें आहे. **कालिदासा**नें 'मेघदूतां'त उज्जयिनीचें वर्णन करितांना, व **भवभूती**नें ( मागें आलेल्या ) एके स्थलीं, तसेंच 'कथासरित्सागर' नामक **सोमदेव**कृत विस्तीर्ण कथासमूहांत वासवदत्ता व वत्सराज यांची त्या काळीं अत्यंत प्रसिद्ध अशी कथा वर्णिली आहे. **श्रीहर्षा**च्या 'रत्नावलीं'तही राणीचें नांव वासवदत्ता आहे. असो. परंतु या वरील सर्व कथांतून एकीचाही

---

१ हें नांव 'राघवपांडवीय' ग्रंथाच्या कर्त्यानें आपणास घेऊन आपलें खरें नांव मुळींच नाहींसें करून टाकलें. 'राघवपांडवीय' हें काव्य श्लेषमय असून त्यांत रामायण व भारत यांतील कथा सारख्याच पदांत बांधली आहे !

प्रस्तुत 'वासवदत्ते'शीं बिलकुल संबंध नाहीं. एक नांव मात्र सारखें आहे; व तें लोकप्रिय असल्यामुळें सुबंधूनें उचललें असावें असें दिसतें. बाकी सारी गोष्ट त्यानेंच बहुधा स्वकल्पित रचिली असावी.

पण वरील गोष्टींच्या निर्णयांत तरी फारसें हांशील आहेसें नाहीं. कां कीं, प्रस्तुत ग्रंथाची मजल त्याच्या बाह्यस्वरूपावर जितकी आहे तितकी अंतःस्वरूपावर नाहीं. हा रचण्यांत कर्वीचा उद्देश 'कादंबरी' प्रमाणें दुहेरी नव्हता; म्हणजे रचनेचे तऱ्हेतऱ्हेचे चमत्कार व सौन्दर्य साधून कथेचें संविधानकही चित्तवेधक करावयाचें. त्यानें आपला उद्देश प्रस्तावनेच्या शेवटीं स्पष्ट लिहिला आहे.—

**सरस्वतीदत्तवरप्रसादः**
**चक्रे सुबंधः सुजनैकबंधुः ।**
**प्रत्यक्षरश्लेषमयप्रबंध—**
**विन्यासवैदग्ध्यनिधिर्निबंधम् ॥**

"सरस्वतीनें आपला वरदहस्त ज्याच्या मस्तकीं ठेवला आहे, व त्यामुळें प्रत्यक्षरीं श्लेष साधून शब्दरचना करण्याचें ज्याच्या ठायीं अपार चातुर्य वसतें आहे, असा सज्जनैकबंधु सुबंधु पुढील निबंध रचिता झाला."

हा त्याचा उद्देश कोठवर सिद्धीस गेला हें पुढें येणाऱ्या उताऱ्यांवरून लक्षांत येईल. सध्यां प्रस्तुत कथेच्या संविधानकादिकांविषयीं विचार करूं.

हींतील संविधानक वर सांगितल्याप्रमाणें केवळ गौण असल्यामुळे तें फार थोडकें आहे. तें येणेंप्रमाणें:—

पूर्वी चिंतामणि नामेंकरून एक मोठा प्रतापी व पुण्यशील राजा होऊन गेला. त्यास कंदर्पकेतु या नांवाचा मदनासारखा देखणा व सर्वगुणसंपन्न असा एक पुत्र होता. या राजपुत्रानें एके दिवशीं पहांटेस स्वप्नांत एक कन्या पाहिली. तिचें वय अठरा वर्षांहून कांहींसें कमी होतें, व ती सौन्दर्याची जणूं काय खाणच होती. नंतर हा तिचें लावण्यामृत डोळ्यांनीं यथेच्छ प्राशन करीत असतां, निद्रेनें जसें काय सवतीमत्सर वाटूनच त्यास एकदम सोडलें; व ती मनोरम मूर्ति अर्धो-

त्च दिसेनाशी झाली. तेव्हां विरहशोकानें अगदीं वेडा होऊन जाऊन झोप पुन: येण्याकरितां त्यानें प्रयत्न केला; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं महालाचीं दारें बंद करून तो तेथें तसाच पडून राहिला; कोणासही आंत येऊं देईना, व अन्नग्रहणही करीना. अशा रीतीनें तो सगळा दिवस व ती सगळी रात्र निघून गेली, तरी राजपुत्राच्या इच्छेप्रमाणें घडून आलें नाहीं.

इतकें झाल्यावर कंदर्पकेतूचा बाळमित्र मकरंद मोठ्या प्रयत्नानें आंत जाऊन त्यास बोध करूं लागला. पण अशा प्रसंगीं बोधाचें काय चालणार ? शेवटीं निरुपाय होऊन त्यास कंदर्पकेतूच्या मसलतीस रुकार द्यावा लागला; ती ही कीं, दोघांनीं चोरून शहरांतून बाहेर पडावें.

त्याप्रमाणें करून दोघेही मार्ग क्रमूं लागले. जातां जातां विंध्यपर्वताजवळ येऊन तेथील एका रानांत ते रात्रीकरितां उतरले. मग फलमूलांवरच भुकेचा निर्वाह करून डाहाळे आंथरून त्यांजवर निजले. पण फार वेळ झाला नाहीं तोंच ज्या वृक्षाखालीं ते निजले होते त्यावर एक पोपट व मैना एकमेक भांडतांना कंदर्पकेतूनें ऐकिलें. मग त्यानें मकरंदास उठवून दोघेही त्यांच्या संवादाकडे कान देऊन ऐकूं लागले. मैना रागावून म्हणते, "ठका, आज इतका वेळ कोठेंरे होतास ? एकाद्या दुसऱ्या मैनेच्या नादास लागला असशील ! " पोपट उत्तर करतो. "प्रिये, आज मी एक फारच चमत्कारिक कथा ऐकिली, व प्रत्यक्षही पाहिली; त्यामुळें येण्यास उशीर झाला." मैनेनें विचारलें, ' येवढी कथा ती कोणती ? " मग पोपटानें सांगण्यास आरंभ केला:—

"भागीरथीच्या जवळच कुसुमपुर[१] नामेंकरून एक मोठे नगर आहे. तेथील राजाचे नांव शृंगारशेखर व राणीचें नांव अनंगवती होय. त्यांस एकुलती एकच कन्या आहे. तिचें नांव वासवदत्ता."

"ही कन्या उपवर झाली असतां हिला पुष्कळ दिवस लग्नाचा

---

१ कुसुमपुराचे दुसरें प्राचीन नांव 'पाटलिपुत्र' होतें. चिनी लोकांत तें 'कुसुमापुलो' या नांवानें व ग्रीक लोकांत 'पालिबोथ्रा' या नांवानें प्रसिद्ध असे. त्याचें सांप्रतचें नांव 'पाटणा' आहे.

कंटाळा असे. परंतु अलीकडे वसंतकालाच्या योगानें तिच्या मनांत नवीन वृत्ति उद्भवल्यामुळें तिच्या बापानें स्वयंवराचा समारंभ केला होता. त्या प्रसंगीं चोहोंकडचे राजपुत्र तेथें गोळा झाले होते; पण त्यापैकीं एकही वासवदत्तेच्या मनास न येऊन ती आपल्या मंचकावरून उठून चालती झाली."

"पण त्याच रात्रीं तिच्या मनांत सर्वप्रकारें भरण्यासारखा एक राजपुत्र तिला स्वप्नांत दृष्टीस पडला; व तिला स्वप्नांतच कळलें कीं, तो चिंतामणि राजाचा पुत्र कंदर्पकेतु होय. त्या दिवसापासून तिला चैन पडेनासें झालें. तिच्या सख्यांनीं नानाप्रकारचे उपाय केले; पण तिला स्वस्थता वाटेना. शेवटीं तिची सखी तमालिका, मी कंदर्पकेतूकडे जाऊन त्याचा समाचार तुला येऊन कळवितें असे म्हणून तिकडे निघाली. तिच्या बरोबर मीही निघालों, व ती सध्यां याच झाडाखालीं आहे."

हें ऐकतांच मकरंद तमालिकेकडे गेला. तिनें प्रणाम करून आपल्या धनिनीचें पत्र त्याच्या हातीं दिलें. तें कंदर्पकेतूनें वाचून तमालिकेस आनंदभरांत मिठी मारली; व वासवदत्तेच्या संबंधाच्या हजारों गोष्टी विचारल्या. मग दुसऱ्या दिवशीं तीं कुसुमपुरास निघालीं; व तेथें रात्र पडल्यावर पोहोंचलीं.

कंदर्पकेतु व वासवदत्ता यांची गांठ राजाच्या बागेंत एका हस्तिदंती बंगल्यांत पडली. प्रथम तर त्यांस एकमेकांस पाहतांच मूर्च्छाच आली. मग दोघें सावध झाल्यावर तमालिकेनें आपल्या धनिनीचें विरहदुःख राजपुत्रास निवेदन केलें; व नुकताच टळलेला अनर्थही त्यास सांगितला. तो हा कीं, वासवदत्ता लग्नाशिवाय मोठी होत चालली हा लोकापवाद मोडून टाकण्याकरितां तिच्या बापानें दुसऱ्या दिवशीं विद्याधरांचा राजा विजयकेतु याचा पुत्र जो पुष्पकेतु त्याशीं तिचें लग्न करून देण्याचा बेत केला होता. तो ऐकून वासवदत्तेनें तर असा निश्चय केला होता कीं, तसा प्रसंग येतांच अग्निप्रवेश करावयाचा. पण इतक्यांत तीं व कंदर्पकेतु तेथें वेळेस पोहोंचल्यामुळें त्या संकटाचें निवारण झालें.

नंतर मकरंदास व तमालिकेस काय होतें तें पाहण्याकरितां तेथेंच ठेवून कंदर्पकेतु व वासवदत्ता हीं दोघेंच मनोजव नांवाच्या एका दिव्य अश्वावर आरूढ होऊन विंध्यपर्वताच्या एका अरण्यांत उतरलीं. तेथें एका लतागृहांत बसून त्यांनीं ती रात्र घालविली. शेवटीं इतकें दूर आल्याच्या श्रमामुळें दोघांसही एकदम झोंप लागली.

दुसरे दिवशीं मध्यान्हाच्या समयीं जागा होऊन कंदर्पकेतु पाहतो तों वासवदत्ता नाहीं. मग काय विचारावें ! त्यास अतिशयित दुःख होऊन त्यानें पुष्कळ विलाप केला. शेवटीं त्या अरण्यांतून निघून तो दक्षिणेकडे चालला, तो थेट समुद्राच्या कांठापर्यंत गेला. तेथें त्यास सहजच सुचलें कीं, आतां जगून काय कर्तव्य आहे ? येथेंच प्राणत्याग करावा हें बरें. असा विचार करून तो समुद्रांत स्नान करावयास गेला; व नंतर आंत देहत्याग करणार, तों आकाशवाणी झाली कीं, तुला वासवदत्ता पुनः भेटेल, आत्मघात करूं नको.

नंतर कंदर्पकेतु माघारा फिरला, व कित्येक महिने त्यानें तसेंच अरण्यांत काढले. मध्यें वर्षर्तुही येऊन गेला, तरी आकाशवाणीचा प्रत्यय त्यास आला नाहीं. शेवटीं शरदृतूंतल्या एके दिवशीं तो रानांतून इकडे तिकडे फिरत असतां एक दगडाची प्रतिमा त्याच्या दृष्टीस पडली. तिजकडे रेखून पाहतां त्यास असें वाटलें कीं, वासवदत्तेसारखेंच हिचें स्वरूप आहे. मग तिजवर हात ठेवतांच ती वासवदत्ता झाली.

नंतर वासवदत्तेनें शिळा होऊन पडण्याचें कारण सांगितलें. तें असें. कंदर्पकेतु लतागृहांत निजला असतांच वासवदत्ता जागी झाली. तेव्हां विरहदुःखामुळें व उपासामुळें त्याची दशा झालेली पाहून तिनें मनांत आणलें कीं, उठला नाहीं तोंच यास खाण्याकरितां कांहीं फळें आणून ठेवावीं. मग त्या उद्देशानें ती झाडांतून फिरत असतां तेथेंच एक सैन्य तळ देत आहे असें तिनें पाहिलें. तेव्हां तिला भय पडलें कीं, हें माझ्या बापाचें किंवा कंदर्पकेतूच्या बापाचें तर सैन्य नसेल ना ! पण तसें कांहींच नसून ती फौज दुसऱ्याचीच कोणाची होती. इतक्यांत तिच्या सरदारास तिची बातमी लागून तो तिजकडे धांवत आला. तों तितक्यांतच एक किरातांचा सेनापति तेथें पारध करीत होता,

तोही तिला धरावयास आला. अशीं दोहोंकडून एकदम संकटें येऊन पडल्यामुळें वासवदत्तेस काय करावें तें सुचेना. पण त्याच संधीस त्या दोघांचें आपणाकरितां युद्ध चाललें आहेसें पाहून ती तेथून निसटली. ती जवळच्या एका पर्णकुटींत शिरली. या पर्णकुटीचाही त्या सैन्यांनीं विध्वंस करून टाकिला होता. पुढें पुष्कळ वेळानें तो आश्रम ज्याचा होता तो मुनि आला. त्यानें वासवदत्तेस पाहतांच तिच्या योगानें आपल्या आश्रमाचा नाश झाला असें त्यास वाटलें, व तिला शाप दिला कीं, शिला होऊन रहा. पण तिनें आपला वृत्तांत सांगून प्रार्थना केल्यावर मुनीनें उच्छाप दिला कीं, तुझ्या नवऱ्याचा हात लागतांच तूं पूर्ववत् होशील.

ही गोष्ट संपते आहे इतक्यांत मकरंद तेथें आला. मग तीं सगळींजणें कंदर्पकेतूच्या बापाच्या राजधानीस परत गेलीं. यापुढें सर्वांचा काळ मोठ्या आनंदानें गेला.

याप्रमाणें 'वासवदत्ते'चें संविधानक आहे. आमच्या देशांतील वाचकांस युरोपांतील वाचकांप्रमाणें अत्युत्कृष्ट कादंबऱ्यांची अजून रेलचेल झाली नसल्यामुळें ते अद्याप तसे चोखंदळ बनले नाहींत. यास्तव वरील कथानकही त्यांस अगदींच चालणार नाहीं असें वाटत नाहीं. तरी वस्तुतः पाहतां तें अगदींच सरासरी व फारसे श्रम न घेतां कसें तरी भराभर बांधून दिलें आहे हें स्पष्ट दिसत आहे. पहिल्यानें तर कथेंतील नायकाचें ठिकाण म्हणजे राजधानी कोठें होती याचाच मुळीं पत्ता नाहीं. कंदर्पकेतु मकरंदासहवर्तमान कुसुमपुरास गेला व तेथून पुनः आपल्या नगरास आला, इतकें मात्र सांगितलें आहे. पण जाण्याचा मार्ग किंवा नुस्ती दिशाही सांगितली नाहीं. एक विंध्यपर्वत मध्यें लागला इतका मात्र उल्लेख आहे. या पर्वतापासून दोहोंकडचीं अंतरें दिलीं आहेत; पण तीं दोहों वेळचीं एकमेकांशीं मुळींच जमत नाहींत. कंदर्पकेतु स्त्रीविरहानें वेडा होऊन भटकत जातां जातां समुद्रापर्यंत गेला असें सांगितलें आहे. पण हा समुद्र कोणता याचा निर्णय करणें कठिण आहे. तो दक्षिण दिशेनें गेला असें सांगून त्याच समुद्रास नर्मदा, चंदना व करतोया या नद्या मिळतात असेंही सांगितलें

आहे. असो; पण हा भूगोलविद्येचाच कांहींसा विषय होय. आणि जर सुबंधूनें प्रस्तुत ग्रंथांत इतर मुख्य कवित्वगुण दाखविले असतील, तर या दोषाबद्दल सर्व वाचक व विशेषत: इंग्लिश[1] तर, त्यास तेव्हांच माफी करतील यात संशय नाहीं. सुबंधूच्या कवित्वगुणांविषयीं पुढें लिहावयाच्या ठिकाणीं लिहूं;—सध्या प्रस्तुत कथानकांतील इतर दोष सांगतों. यांत भाषणाचा प्रकार खरोखरी पाहतां बहुधा मुळींच नाहीं. जीं भाषणें म्हणून आहेत तीं वर्णनरूपच असल्यामुळें तीं यातील पात्रांचीं म्हणण्यापेक्षां कवीचींच खुद्द आहेत हें म्हणणें ज्यास्त वाजवी आहे. कंदर्पकेतु व वासवदत्ता यांची पहिल्यानें बागेंत भेट झाली, व त्यानंतर तर तीं विंध्याद्रीच्या अरण्यांत एका लताकुंजांत दोघेंच सर्व रात्र एकत्र होतीं; पण दोन्ही प्रसंगीं तीं परस्पर एक शब्दही बोललीं नाहींत. दुसऱ्या प्रसंगीं तर गोष्टीचा वास्तविक ऐन बहर असून दोघांसही पहांटेच्या वेळीं एकदम झोंप लागली असें वर्णिलें आहे. हें स्थल केवळ हास्यास्पद होय. दोघांचा गांधर्वविवाह होऊन हीं स्त्रीपुरुषें प्रथमतःच विंध्याटवीसारख्या भव्य व रम्य अरण्यांत चांदण्या रात्रीं एकांतांत असतां दोघांपैकीं कोणीही चकारशब्द न काढता त्यांनीं ती सगळी रात्र शेजारीं शेजारीं बसून मुक्यानें घालविली! काय चमत्कार हा!! वासवदत्तेस स्त्रीस्वभावसहज लज्जेची तरी सबब होती; पण जो नायक नुकताच नुसत्या स्वप्नदर्शनानें इतका वेडा होऊन गेला होता, व पुढल्या दिवशीं शोकाच्या योगानें ज्याचें वाक्पटुत्व त्यास पुनः आलें, त्यास याच समयीं मौन धरण्याचें येवढें योग्य कारण कोणतें दिसलें असेल तें असो! 'मालतीमाधवां'तील आठव्या अंकातील प्रसंग या प्रसंगाशीं पुष्कळ अंशीं सारखा मिळतो. तेथेंही मालती एका अर्ध्या तुटक वाक्याखेरीज कांहीं बोलली नाहीं; व माध-

---

१ या आमच्या तर्काचें कारण इंग्रजींत फारसा प्रवेश न झालेल्या आमच्या वाचकांस सुचविणें जरूर आहे. तें इतकेंच कीं, इंग्लिश कवींत मुकुटमणि जो शेक्सपियर त्यानें एका नाटकांत बोहेमियाच्या किनाऱ्यावर एक जहाज उतरविलें आहे!!—बोहेमिया हा देश युरोपाच्या सरासरी मध्यभागीं असून समुद्र त्यापासून फारच दूर आहे.

वाचेंही भाषण लांबलचक घातलें नाहीं. पण तेवढ्यानेंच तो चुटका किती बहारीचा झाला आहे, व त्या नाटकांतील प्रधान रस जो शृंगार त्याचा तेथें कळस होऊन तो किती खुलतो आहे! तसें येथें कांहींच नाहीं. दोघेंही केवळ लोकाचारास्तव येथें आलीं काय असें वाटतें. अशा रम्य अरण्यांत येण्याचें सार्थक जर केवळ झोंपेनेंच होतें, तर राजपुत्राचा व राजकन्येचा आधींचा महालच काय वाईट होता? व सारी रात्र उगीच जागेपणांत घालवून आपलें हंसें मात्र करून घेण्यांत त्यांस काय मिळालें? तीं अवशींच कां निजलीं नाहींत? बरें अशा पहांटेच्या उत्कृष्ट वेळीं त्या दोघांस एकदम झोंप लागण्याचें कारण तरी काय? इतकें लांब आल्याचा श्रम व भूक! घोड्याचें नांव मुळीं मनोजव, म्हणजे मनासारखा त्याचा वेग; मग कुसुमपुराहून विंध्याटवीस येण्यास किती वेळ लागणार व किती श्रम होणार? तसेंच भुकेची तजवीज त्यांस एका निद्रेशिवाय दुसरी कोणतीच सुचली नाहीं काय? पण आपल्या कवीचें एकेरी धोरण. त्यास संभोगशृंगार व विप्रलंभ शृंगार असे दोन्ही प्रकार कवींच्या संप्रदायाप्रमाणें आपल्या कृतींत कसे तरी आणायाचे होते; यास्तव ते आणतांना संविधानक नीट जमलें नाहीं तरी त्याकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. संभोगशृंगाराचा कळस वर झालाच. राहिला प्रकार नायक व नायिका यांच्या वियोगाचा, तो घडवून आणण्यास वरील विलक्षण संविधानक सुबंधूनें योजून दिलें आहे. अत्युक्तीचा व असंभाव्यतेचाही प्रकार प्रस्तुत कथेंत कोठें कोठें आहे. नायक व नायिका यांची पहिली दृष्टादृष्ट होतांच दोघांस अत्यानंदाची लहर येऊन मूर्च्छा आली. नंतर दोघें सावध झाल्यावर वासवदत्तेची सखी कलावती कंदर्पकेतूस म्हणते,—"महाराज, आमच्या सखीस ज्या मदनवेदना सोसाव्या लागल्या त्यांचें थोडक्यांतच वर्णन करतें. जर समुद्राची दौत केली, ब्रह्मदेव लेखक झाला, व शेष त्यांचें वर्णन करूं लागला, तर हजारों युगांनीं कदाचित् त्यांचें वर्णन संपेल." अशा प्रकारच्या अत्युक्तींनीं आनंद न होतां त्यांच्या अनिर्बंधत्वामुळें त्रास मात्र येतो. त्याप्रमाणेंच पुढील दोन गोष्टी केवळ असंभाव्य असल्यामुळें त्या संविधानकास दोषरूप झाल्या आहेत.

वासवदत्तेस स्वयंवराच्या रात्रीं स्वप्न पडलें; पण या स्वप्नांत पुराणांतील उषेप्रमाणें तिनें कोणीएक राजपुत्र पाहिला इतकेंच नव्हे, तर त्याचें नांव ठिकाण वगैरेही तिला स्वप्नांतच कळलें. तसेंच शेवटीं आपणानिमित्त झालेलें दोन सैन्यांचें युद्ध जें वासवदत्तेनें वर्णिलें आहे, त्यांत दोघांचाही एकमेकांच्या हातानें नाश झाला असें सांगितलें आहे. असो. याप्रमाणें प्रकृत कथेचें संविधानक लहान असतांही त्यांत अनेक दोष आहेत. तरी सुबंधूच्या तर्फेनें येथें इतकें लिहिलें पाहिजे कीं, येवढ्याचवरून त्याच्या अंगीं कल्पकतागुणाचा अभाव होता असा सिद्धांत करतां येणार नाहीं. कथा नीट जुळण्याविषयीं त्यानें अगदींच यत्न केलेला दिसत नाहीं यावरून त्याविषयींची त्याची अनास्था मात्र स्पष्ट दिसते,—व तीबद्दल त्याजवर काय दोष येईल तो येवो—पण तो गुणच त्याचे ठायीं नव्हता असें म्हणण्यास दुसरीं प्रमाणें पाहिजेत.

' वासवदत्ता ' हा ग्रंथ ' कादंबरी ' पेक्षां व ' दशकुमारचरिता '-पेक्षां फारच लहान आहे; व वर्णनादिकांचा थाटमाट सारा एकीकडे काढला तर, डॉक्टर हॉल् यांच्या म्हणण्याप्रमाणें तो आहे त्याच्या दशांशाइतका मात्र उरेल;—म्हणजे वर जें चार पांच पानें संविधानक लिहिलें आहे तितकाच. संस्कृत साहित्यग्रंथांत महाकाव्याच्या लक्षणांत असें लिहिलेलें असतें कीं, त्यांत प्रभात, सूर्यास्त, पर्वत, समुद्र, नगरें, इत्यादींचीं वर्णनें असावीं;[1] त्याप्रमाणें सुबंधूने सांप्रत कथेंत तीं आणिलीं आहेत; पण तीं वास्तविक अप्रधान असतां त्यांस त्यानें प्रस्तुत ग्रंथांत सर्वथा प्रधानताच दिली आहे. मुख्य कथेवर जें दुसऱ्या कादंबरीकारांचें विशेषतः धोरण असतें तें तर याचें मुळींच नसून उलटून सुटून वर्णनावर केव्हां येईन असें त्यास होऊन गेलेसें सर्व ग्रंथभर दिसत आहे. हा प्रकार जो कोणी हा ग्रंथ उगीच वरच्यावर चाळून पाहील त्यासही दिसून येईल. मुख्य कथेचे जेवढे भाग मधून

१ " नगरार्णवशैलर्तुचंद्रसूर्यादिवर्णनैः ।
अलंकृतम् "—असंक्षिप्तं रसभावनिरंतरम् ॥
काव्यादर्श.

मधून आणावे लागले तेवढे भराभर आटपून टाकले आहेत,—त्यांविषयीं तीन चार ओळी झाल्या म्हणजे पराकाष्ठा. पण वर्णनास एकदां आरंभ झाला कीं, तें कोठवर लांबेल याचा सुमार लागावयाचा नाहीं. उदाहरणार्थ आपल्या मित्राची अस्वस्थता ऐकून मकरंद कंदर्पकेतूकडे गेला; व म्हणाला कीं, तुझी अशी अवस्था ऐकून सज्जनांस फार दुःख झालें आहे, व दुर्जन परम हृष्ट झाले आहेत. येथें खलांचा संबंध मात्र आला, पण तेवढ्यावरूनच हातचा विषय सोडून पुढील संस्कृत कवींच्या या आवडत्या विषयावर विस्तार केल्यावांचून आमच्या कवीच्यानें राहवेना. ग्रंथारंभींच्या तीन चार आर्यांत आपल्या कृतीच्या भावी दूषकांची शोभा केलेली पुरेशी न होऊन येथें फारसा संबंध नसतां त्यांवर पुनः एक दोन पृष्ठें झोड उठविली आहे. तसेंच सरतें शेवटींही गोष्ट किती जलद आटपून टाकली आहे!—
"इतक्यात मकरंद आला, व सर्वजणें चिंतामणि राजाच्या नगरास परत गेलीं." त्याचक्षणीं मकरंद तेथें अकस्मात् आला हीच आधीं पहिली चमत्काराची गोष्ट! कंदर्पकेतु अरण्यांत भ्रमण करीत असतां त्याचें ठिकाण त्यास एकदम कसें सांपडलें? बरें, त्यांचें बोलणें तरी परस्पर कांहींच होऊं नये काय? कंदर्पकेतूस व वासवदत्तेस जे अद्भुत प्रसंग नुकतेच घडून गेले त्यांविषयीं कंदर्पकेतूनें, किंवा वासवदत्तेच्या बापाकडील वर्तमान काय झालें तें मकरंदानें, कांहींच सांगूं नये काय? पण येवढा विस्तार कोणी करीत बसावा? दोन्ही सैन्यांच्या युद्धाचें वर्णन संपलें तेथेंच कवीचें काम झालें. पण कथेचा शेवट कसा तरी केलाच पाहिजे म्हणून आणखी दोन चार ओळी शेवटीं त्यास घालाव्या लागल्या. असो. याप्रमाणें सुबंधूनें कथेच्या प्रधानअंगाची सर्वथा उपेक्षा करून अप्रधानअंगाचीच सर्व प्रकारें मातब्बरी वाढविली आहे; व याच अस्थानीं पक्षपाताच्या योगानें त्याचा ग्रंथ अनेक ठिकाणीं दोषास पात्र होऊन कांहीं ठिकाणीं हास्यास्पदही झाला आहे. त्याचीं पात्रें अगोदर थोडीं बेताचींच आहेत. पण त्यांसही सुबंधूनें अंमळ यथेच्छ बोलूंचालूंही दिलें नाहीं. त्यांस केवळ कामापुरतें मात्र आणून आपल्या कथेंतील मुख्य पात्र तोच स्वतः होऊन

बसला आहे. सारांश, ज्याप्रमाणें गारुडी हा आपल्या हातचलाखीस केवळ साधनभूत म्हणूनच आपल्या पोतडींतील भांडार बाहेर काढतो, व खेळ चालत असतांना लोकांचें लक्ष त्या पदार्थांवर मुख्यतः नसतां त्याच्याकडेस लागलेलें असतें; त्याप्रमाणें प्रस्तुत संविधानकाचा उपक्षेप आमच्या कवीनें केवळ शब्दार्थचमत्कार करतां येण्याची आपली शैली वाचकांस दाखविण्याकरितांच केला आहे; व त्यांतील नायकादि पात्रांचेही मुख्यत्व नांवाचें मात्र आहे. आपल्या वक्रोक्तीनें वाचकांची वाहवा मिळविण्याची या कवीस अतोनात इच्छा असल्यामुळें त्यानें आपल्या पात्रांची जी दुर्दशा केली आहे ती सांगतां पुरवत नाहीं! नायकास व नायिकेसही फार बोलण्याचा अटकाव; एकदां तर त्यांस बाहुल्यांप्रमाणें शेजारींशेजारीं सारी रात्र गपचीप बसविलें आहे. मकरंदाचा बोलण्याचा प्रसंग एक असतां त्याच्याकडून लांबलचक विषयांतर करविलें आहे. वासवदत्ता युद्ध झालेल्या भूमीपासून दूर गेली असतां, व तें पाहण्याचा तिला एरवीं कधींही प्रसंग नसून स्त्रीजातीच्या भीरुत्वास्तव तर त्याची नुसती कल्पनाही तिच्या कोमळ अंतःकरणास वास्तविक दुःसह असतां, तिजकडून त्या रानटी लोकांचें उभयांतपरिणामी भयंकर युद्ध खुशाल वर्णविलें आहे!

येथवर 'वासवदत्ते' च्या रचनेविषयीं झालें. आतां आंतील मजकुराविषयीं विचार करूं. यासंबंधेंही खऱ्या रसिकास आनंद देण्यासारखें या ग्रंथांत फारसें नाही. मधून मधून एकाद्या दुसऱ्या ठिकाणीं मनास चमत्कार होण्यासारखें कोठें कोठें असतें; पण उत्कृष्ट अशा स्थलाचे बरेच लांब उतारे काढीन म्हटलें तर बहुधा सोय नाहीं. सांप्रत कथेचें संविधानक तर आधीं अगदींच थोडें असल्यामुळें त्यांत कोणत्याही रसाचा पोष होण्यास मुळीं अवकाश नाहीं हें अगोदर उघड आहे. त्यांतून इतक्या संकोचाच्या स्थलांत बहुतेक सर्व रस आणण्याचाही कवीनें घाट घातला आहे. शृंगाराचे दोन्ही प्रकार वर सांगितलेच; त्यांशिवाय नायकाच्या विलापांत करुण, त्याच्या प्रतापवर्णनांत वीर, दोन्ही सैन्यांच्या युद्धाच्या वर्णनांत रौद्र व भयानक, एकंदर कथेंत अद्भुत, व मध्यें एके ठिकाणीं ( कंदर्पकेतु वासवदत्तेसह

मनोजवारूढ होऊन विंध्याटवीकडे जात असतां ) स्मशानाचें वर्णन केलें आहे त्यांत बीभत्स असे आणले आहेत. तेव्हां अशा गर्दीत म्हणण्यासारखा असा अर्थातच एकही रस उतरला नाहीं. आतां राहिलेला ग्रंथाचा मोठा भाग कवीचा आवडता असा वर्णनादि विस्तार होय. हा जे कोणी केवळ नादलुब्ध असतील, म्हणजे अर्थचमत्काराहून शब्दचमत्कारासच जे फार चाहत असतील, अशा दुर्विदग्ध वाचकांस केवळ भुलवून टाकील ह्यांत संशय नाहीं. तरी खऱ्या रसिकांस मन रमण्यासारखें त्यांत थोडेंच सांपडेल. कां तर, त्यांत नवेंच म्हणण्यासारखें फारसें नसून शिवाय मधून मधून क्लिष्टता, अश्लीलत्व इत्यादि दोषही आहेत. या दोषांचीं यथानुक्रम उदाहरणें देतों:—

सुबंधूच्या ग्रंथाचा पहिला मोठा दोष हा आहे कीं, त्यांत संविधानकाच्या संबंधानें किंवा आंतील मजकुराच्या संबंधानें त्याचेंच नवें असें फार थोडें निघेल. पूर्वीपासून चालत आलेले जे संस्कृत कवींचे संप्रदाय त्यांस सोडून अंमळ इकडे तिकडे जाण्याचाही त्यानें प्रयत्न केला नाहीं. यास्तव त्या थोरल्या प्रकरणांशींच अगोदर गांठ घालून जे चुकले असतील त्यांचें या नकलेनें कसें रंजन होईल ? पण इतकेंच नव्हे, सुबंधूनें त्यांची नुसती धाटणीच उचलली असती, तर हा

---

१ बीभत्स रस आणण्यास कवीनें हें स्थळ फार खासें योजलें आहे ! नायक व नायिका यांचा नुकताच गांधर्वविवाह होऊन तीं विंध्याटवीकडे शृंगारोत्सवार्थ निघालीं असतां मध्यें त्यांस स्मशानदर्शन करविणें हें सुबंधूस मोठें रसोद्दीपक होईलसें वाटलें कीं काय नकळे ! शिवाय कुसुमपुराहून मनोजवानें उड्डाण केलें असतां तो पातें लवतें न लवतें इतक्यांत विंध्याटवीस पोंचावयाचा; मग स्मशानांतील इतके निरनिराळे चमत्कार खुशाल पाहाण्यास कंदर्पकेतूस सवड कशी सांपडली ? पण आपल्या कवीस या प्रधानरसाची उणीव सोसवेना; तो कसा तरी आणावयाचाच होता; मग प्रसंगाकडे वगैरे कोण लक्ष देतो.

या ठिकाणीं ' मालतीमाधवा ' तील बीभत्सवर्णनाची आमच्या वाचकांस आठवण झाल्याविना राहणार नाहीं. तेथील प्रसंग कसा ओघानें आला आहे, व तो पुढील संविधानकास कसा छानदार उपयोगीं पडला आहे !

निराळा ग्रंथ येवढ्यावरून तरी वाचकांच्या आदरास पात्र होता. पण प्रस्तुत ग्रंथांत पाहतां तसेंही नाहीं. आधींच्या कवींचे विचार घेतलेले यांत जागोजाग सांपडतात. त्यांचा मुळांतल्यापेक्षां येथें जरा फैलाव केलेला असतो खरा, पण ते इतके पुष्कळ व इतके उघडपणें घेतलेले आहेत कीं, तसें करणें आपल्या कवीस यत्किंचित्‌ही दूषणार्ह वाटलें नाहींसें वाटतें. अशा स्थलांचा ग्रंथानुक्रमानें निर्देश करतों:—

**डॉक्टर हॉल्** साहेबांनीं छापलेली आवृत्ति--पृष्ठ ४१ ( कंदर्पकेतुविक्रमवर्णन. )

**—यस्य च समरभुवि भुजदंडेन कोदंडं कोदंडेन शराः शरैररिशिरस्तेनापि भूमंडलं तेन चाननुभूतपूर्वो नायको नायकेन कीर्तिः कीर्त्या च सप्तसागराः सागरैः कृतयुगादिराजचरितस्मरणमनेन च स्थैर्यममुना च प्रतिक्षणमाश्चर्यमासादितम्[१] ।**

पृष्ठ ६४ ( नायिकावर्णन. )

**--भास्वतालंकारेण चंद्रेण वदनमंडलेन लोहितेनाधरपल्लवेन सौम्येन दर्शनेन गुरुणा नितंबबिंबेन विकचेन नेत्रकमलेन शनैश्चरेण पादेन तमसा केशपाशेन ग्रहमयीमिव .... ... ... कन्यकामष्टादशवर्षदेशीयामपश्यत् स्वप्ने[२] ।**

पृष्ठ ८० ( मकरंदाचा खलांवरचा भडिमार संपवून तो अचेतन पदार्थांतही असणारी मैत्री वर्णितो. )

**--तथाहि माधुर्यशैत्यशुचित्वसंतापशांतिभिः पयः पय**

---

१ संग्रामांगणमागतेन भवता चापे समारोपिते
देवाकर्णय येन येन सहसा यद्यत्समासादितम् ।
कोदंडेन शराः शरैररिशिरस्तेनापि भूमंडलं
तेन त्वं भवता च कीर्तिरतुला कीर्त्या च लोकत्रयम् ॥

२ गुरुणा स्तनभारेण मुखचंद्रेण भास्वता ।
शनैश्चराभ्यां पादाभ्यां रेजे ग्रहमयीव सा

**भर्तृहरी--शृंगारशतक.**

क्षेति मित्रतामुपगतस्य दुग्धस्य तत्संगमाद्वर्धितस्य का-येन ममैव परो युक्तः क्षय इति विचिंत्येव वारिणाऽपि क्षीयते[1]।

पृष्ठ १३६ ( वसंतवर्णन. )

—चूतविनिर्गतविकचकलिकातले मंजु गुंजन्मधुकरो मकरकेतोस्त्रिभुवनविजयप्रयाणशंखध्वनिमिव चकार[2]।

पृष्ठ १५५ ( स्वयंवराच्या रात्रीं स्वप्नांत कंदर्पकेतूस पाहून वासवदत्तेची विरहानें जी अवस्था झाली तिचें वर्णन. )

—शून्यकरणग्रामे हृदये लिखितमिवोत्कीर्णमिव प्रत्युप्तमिव कीलितमिव निगलितमिव वज्रलेपघटितमिव ... ... आत्मानमधिष्ठितमिव कंदर्पकेतुं मन्यमाना[3]—

पृष्ठ २२१ ( वासवदत्ताभवनवर्णन. )

क्वचिदतिगंभीरमुरजरवाहूतसानंदनर्तितनीलकंठं[4] ...

---

१ क्षीरेणात्मगतोदकाय हि गुणा दत्ताः पुरा तेऽखिलाः
क्षीरे तापमवेक्ष्य तेन पयसा ह्यात्मा कृशानौ हुतः ।
गंतुं पावकमुन्मनस्तदभवद्दृष्ट्वा तु मित्रापदं
युक्तं तेन जलेन शाम्यति सतां मैत्री पुनस्त्वीदृशी ॥
भर्तृहरि—नीतिशतक.

२ मालतीमुकुले भाति गुंजन्मत्तमधुव्रतः ।
प्रयाणे पंचबाणस्य शंखमापूरयन्निव ॥

३ लीनेव प्रतिबिंबितेव लिखितेवोत्कीर्णरूपेव च
प्रत्युप्तेव च वज्रलेपघटितेवांतर्निखातेव च ।
सा नश्चेतसि कीलितेव विशिखैश्चेतोभुवः पंचभिः
चिंतासंततितंतुजालनिबिडस्यूतेव लग्ना प्रिया ॥
मालतीमाधव ५.

४ सानंदं नन्दिहस्ताहतमुरजरवाहूतकौमारबर्हि—
त्रासान्नासाग्ररंध्रं विशति फणिपतौ भोगसंकोचभाजि ।
मालतीमाधव—नांदी.

पृष्ठ २९६ ( युद्धवर्णन. )

**—कर्णाभ्यां श्रुतपरपरिवादाभ्यां खलोदयसाधुविपत्तिसाक्षिभ्यामक्षिभ्यां मूर्ध्ना चास्थानेऽपि नमता विमुक्तोऽहमिति हर्षादिव ननर्त चिरं कबंधः ।**

वरील उदाहरणावरून सहज दिसून येईल कीं, परार्थस्तेयाचा आपल्या कवीस फारसा संकोच वाटत नसे. तरी प्रस्तुत प्रसंगीं या अश्लाघ्य कृत्याच्या योगानेंही सर्वांवर त्याचा एक मोठाच उपकार खरोखर झाला आहे! तो अर्थातच **भवभूती**विषयीं एक मोठी गोष्ट कळविण्यानें. असो. शिवाय दुसरेंही असें वाचकांस कळविलें पाहिजे कीं, टिपांत दिलेल्या वरील श्लोकांपैकीं तिन्हींचा कर्ता प्रसिद्ध नाहीं,—निदान आम्हास तरी अजून माहीत नाहीं. यास्तव ते कदाचित् कोणी पुढील कवीनें **सुबंधू**पासून मूळार्थ घेऊन पद्यरूपानें रचले असतील. असो. असें पुढें मागें ठरल्यास आम्ही आपल्या कवीवर मिथ्या अभियोग केल्याबद्दलची त्याची क्षमा अगोदरच येथें मागून ठेवितों.

---

१ लढाईंत एका पुरुषाचें शिर धडाहून उडालें असतां हंसलें. तें कां? यावर एका कवीची उत्प्रेक्षा—

कंधरां समपहाय कं धरा प्राप्य संयति जहास कस्यचित् ।
मा किलानभयतः स्वपूर्तये दुर्भरात्किमुदराद्वियोगतः ॥

२ ही गोष्ट अर्थातच **भवभूती**चा काळ होय. हा आजपर्यंत बरोबर समजला नव्हता. पण वरील दोन उतारे ‘वासवदत्ते’त आहेत, यावरून त्याचा निश्चयच झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. यास्तव मागें **भवभूतीस** आरंभ करितांना त्याच्या काळाचा मुळींच पत्ता लागत नाहीं असें जें आम्हीं लिहिलें होतें त्याच्या जागीं हा शोध वाचकांनीं घालावा. तेव्हां आतां कालमानानें ही श्रेणि सिद्ध झाली:—

**कालिदास—भवभूति—सुबंधु—बाण.**

तरी एक चमत्काराची गोष्ट येथें स्पष्टपणें लिहिली पाहिजे. ती ही कीं, **हॉल्** साहेबानीं आपल्या प्रस्तावनेंत जो ‘हर्षचरिताचा’ उतारा घेतला आहे, त्यांत **‘कालिदास** व **सुबंधु’** यांचीं जशीं नांवें आहेत, तसें **भवभूती**चें नाहीं. हें कसें झालें असेल तें असो!

दुसरा दोष क्लिष्टता किंवा दुर्बोधता. हा दोष प्रस्तुतच्या साऱ्या ग्रंथावर येत नाहीं. तो बहुतेक ठिकाणीं बराच सुबोध आहे. पण जेथें **सुबंधु** आपलें 'प्रत्यक्षरश्लेषमयप्रबंधविन्यासवैदग्धनिधित्व' विशेषतः दाखवूं लागतो, तेथें निरनिराळ्या अर्थांची फोड करता करतां तशा कामांत घटलेल्या टीकाकाराचीही त्रेधा उडून जाते!

उदाहरणें:--

पृष्ठ १४२ ( स्वयंवरास आणलेल्या हतभाग्य राजपुत्राचे परिहासरूप वर्णन. )

**तत्र च केचित् कलांकुरा इव विजितनगरमंडना अपरे पांडवा इव दिव्यचक्षुःकृष्णगुरुपरिमीलिता अन्ये शरद्दिवसा इव सुदूरप्रवृद्धसुखांशा इतरे व्याहंतुमुद्यता इव स्वबलार्थिनः केचिद्व्याधा इव शकुनश्रावकाः केचिदाखेटका इव रूपानुसारप्रवृत्ताः केचिज्जैमिनिमतानुसारिण इव तथागतमतध्वंसिनः केचित् खंजना इव सांवत्सरफलदर्शिनः केचित् सुमेरुपरिसरा इव कार्तस्वरमयाः केचित् विकचकुमुदाकरा इव भास्वद्दर्शननिमीलिताः केचिद्धार्तराष्ट्रा इव विश्वरूपावलोकनजनितेन्द्रजालप्रत्ययाः केचिदात्मनिवारणबुद्ध्या बलवंतोऽपि सुवाहाः केचित् पाणिग्रहणार्थिनोऽप्यसुकरं मन्यमानाः केचिदध्वरीभूता अपि स्थिराः केचित् पांडुपुत्रा इवाक्षहृदयज्ञानहृतक्षमाः केचिद्बृहत्कथाऽनुबंधिनो गुणाढ्याः केचित् तिर्यग्गतयः सुगंधवाहाः केचित् कौरवसैनिका इव द्रोणाशासूचकाः केचित् कुमुदाकरा इवासोढशूरभासः स्थिता राजपुत्राः। तानेकैकशः समवलोक्य विरक्तहृदयाऽसौ कुमारिका तस्मात्कर्णवंशादवततार॥**

पृष्ठ १९५ ( चंद्रोदय झाल्यानंतर अभिसारिकांनीं आपल्या वल्लभांकडे पाठविलेल्या दूतींच्या वक्रोक्ति. )

**अत्रांतरेऽभिसारिकासार्थप्रहितानां प्रियतमान् प्रति**

दूतीनां दुश्चर्याः सेर्ष्याः सप्रपंचा विकारभंगुराः प्रवादा बभूवुः ॥ तथा हि ।

अवस्त्रीकृतमात्मानं नाकलयासि तत्त्वतः कांत प्रस्तर इव क्रूरोऽसि न चाकर्षकचुंबकद्रावकेष्वेकोऽसि भ्रामकोऽसि परं कितव धर्मार्थान्यप्रयुक्तः क्षेपाणिक इव मुधा वाहिततरवारिस्त्वमसि सखेदमिव मनसा चिंतयासि दुर्लभं जनं सत्त्वसारचरितो यो रिपुमंडलाग्रतो निर्वृतिमुपेत्य तिष्ठति । धृतोरुकरवालसंचयोऽपि परमकांड एव संपतन् महापदं विग्रहेण लभते । राजसेन रहितो राजसे न रहितो ध्रुवं विशारदा विशारदाभ्रविशदा विशदात्मनीनमहिमा महिमानरक्षणक्षमा क्षमातिलक धीरता धीरता मनसि भूतता भूतता वचसि साहसेन साहसेनकमलाकमलापराजितापराजिता सा त्वदर्पणा दर्पणाकारविमलाशया शयाब्जविनिर्जितकिसलया स्खलयांगुलिविभ्रमेण विभ्रमेण प्रतिगवाक्षशलाकाविवरं विलोकयंती विलोकयंती त्वया विना साविना सायमनुभवंती दुःखानि जीवनायक जीवनाय क इह नाश्रयति सुभगम्। अन्यास्तावद्दासतां दासतां पुरतोऽहमेव भजामि । मैत्र्यतोऽमैत्र्यतोऽस्तु अंजसारतः सारतः किमपि कंदर्प-कंदर्पकं न तनोषि विशेषतोऽशेषः स्थितमेव मरणं शठधियां शोधन यशोधने महार्घमहार्घाशयोत्कटाक्षैः कटाक्षैराविर्भूतदास्यास्तदास्याः परिजनाः कमलाकृतिनारीणां कमलाकृतिनारीणां भवता मुखं च मलिनितं विश्वस्य विश्वस्य व्यवस्था समासाद्यसमाद्यमनेककालसंगीतसंगी तनुषे तनुषेकमनंगमनंगपुष्पेषु पुष्पेषु रुजा तरसा जातरसा मंदाक्षमंदा क्षणं भ्रमंती मुह्यति । कामधुराधरेण कामधुराधरेण मुक्तारजोराशिविशेषकेण विशेषकेण मखेन्दना तव हृदि लग्ना प्रदिमाकरेण करेण

**स्वेदबिंदुपयोधरेण पयोधरेण वक्षःफलकांचनेन जितानाविलकांचनेन कामदारुण मदारुणनेत्रास्मरमयं रमयंतं त्वामदयं दमयंती परमकमितारं परमकमितारं वांछति हारिणाहारिणा स्तनकुंभने हरिणाभिहरिणाक्षि रुचिहारिणा चक्षुषा हारिणा ।**

याप्रमाणेंच आणखीही एके ठिकाणीं श्लेषांची खूप गर्दी आहे; पण तीही सगळा उतारा येथें घेण्यास आम्ही धजावत नाहीं. श्लेषांचे भोक्ते अलीकडील लोकांत—अगोदर कोणी असेलच तर--फार असतीलसें वाटत नाही; आणि बाकीच्यांस तर वरील दोनच पुरून उरेसे आहेत!

तिसरा दोष अश्लीलत्व. हा वास्तविकपणें मोठा दोष असतां आपल्या कवीचा याकडे मोठा ओढा दिसून येतो. वसंतकालवर्णनांत ( पृष्ठ १३२ ) तो म्हणतो,--'**प्रतिदिशमश्लीलप्रायगीयमानगीतश्रवणोत्सुकखिगजनप्रारब्धचर्चरीगीताकर्णनमुह्यमानानेकपथिकशत**' ( ज्या वसंतऋतूंत चोहोंकडे चावट गाणीं चाललीं असतां शेंकडों वाटसरू आपली वाट चालण्याची विसरून तेथेच लुब्ध होऊन बसतात ) तसेंच संध्याकालवर्णनांत ( पृष्ठ १६९ ) '**कामुकजनानुबध्यमानदासीजनविविधाश्लीलवचनश्रुतिविरसीकृतसंध्यावंदनोपविष्टेषु शिष्टेषु**' ( ज्या वेळीं शिष्ट लोक संध्येस बसले असतां कामुक जन दासींच्या मागें लागून त्यांनीं केलेलीं चावट भाषणें ऐकल्यामुळें त्यांच्या संध्येचा विरस होतो ). वरील दोन्ही वर्णनावरून सुबंधूच्या वेळीं लोकाचारांत पूर्वीपेक्षां पुष्कळ भ्रष्टता आली असावी असें अनुमान होतें. ज्या कवीनें प्रत्येक वसंतऋतूंतला, किंबहुना प्रत्येक संध्याकाळचा, वरील प्रकार येवढ्या गोडीनें वर्णिला आहे, त्याच्याच खुद्द ग्रंथांतही तसें अश्लीलत्व कां नसावें ? --

पृष्ठ २० ( चिंतामणि राजाच्या राज्यरीतीचे वर्णन. )

——————शूलभंगो युवतिप्रसवे ——————

पृष्ठ ५२ ( प्रभातसमयींच्या स्त्रीचरितांचें वर्णन. )

--आसन्नमरणास्विव जीवितेशपुराभिमुखीषु... ...
( प्रियैरालिंग्यमानासु कामिनीषु ) ... ...

पृष्ठ ७७ ( खलांवर कडाका. )

--रतकील इव जघन्यकर्मलग्नः खेदयति साधून—

पृष्ठ ११५ ( कुसुमपुरांतील वेश्यांचें वर्णन. )

--जलौकसेव रक्ताकृष्टिनिपुणेन ( वेश्याजनेनाधिष्ठितं
कुसुमपुरं नाम नगरम् । )

पृष्ठ १२८ ( वासवदत्तेच्या बापाची राज्यरीति. )

———वृषहानिर्निधुवनलीलासु न पौरेषु———

पृष्ठ १८४ ( रात्रिमुखवर्णन. )

--ताभिः ( तारकाभिः ) श्वित्रितमिव वियदशोभत--

पृष्ठ २६९ ( समुद्रवर्णन. )

--सापस्मारमिव फेनैः ... ( जलनिधिमपश्यत् । )

वरील तिन्ही दोष अत्यंत रसापकर्षक होत; व त्यामुळेंच हा ग्रंथ रसिकांत प्रिय न होऊन सुबंधूचें नांव तादृश प्रसिद्धीस आलें नाहीं असें वाटतें.

आतां सुबंधु कविवृंदांतील कोणत्या प्रतींत मोडेल याविषयीं विचार करूं. प्रस्तुत कथेवरून सामान्यतः पाहतां तो पूर्वोक्त तीन महाकवींच्या जोडीस बसविण्यास योग्य नाहीं हें तर स्पष्ट दिसत आहे. वर सांगितलेल्या तीन दोषांवरून सुबंधूच्या मनाच्या तीन निरनिराळ्या छटा प्रकट होतात. पहिल्यावरून त्याच्या मनाचा

---

१ हा मनास उद्वेग करणारा श्लेष सुबंधूचा स्वतःचाही नसावा. असा अंदेशा वाटतो. तो बहुधा पुढील श्लोकांतून उचलला असावा.

रामामन्मथशरेण ताडिता
दुःसहेन हृदये निशाचरी ।
गंधवद्रुधिरचंदनोक्षिता
'जीवितेशवसतिं' जगाम सा ॥
रघुवंश ११ ( ताटकावधप्रसंग )

हलकेपणा, दुसऱ्यावरून अरसिकत्व व तिसऱ्यावरून ग्राम्यता. यांपैकीं दुसऱ्याचा व तिसऱ्याचा तर सत्कवित्वाशीं स्वभावविरोध असल्यामुळें कीर्तिमंदिराच्या अत्युच्च पदापासून खालीं ढकलून देण्यास त्यांतला एकही पुरे आहे. व पहिल्याचें जरी एकट्याचेंच तितकें सामर्थ्य नाहीं, तरी दुसऱ्यांच्या सान्निध्यानें त्यांचे अंगचे बल त्यास पुनः प्राप्त होतें. आतां हें खरें कीं, सुबंधूच्या काळात खऱ्या कवित्वाचा ऱ्हास होऊं लागला असल्यामुळें त्या काळावर वरच्या सबंधानें जितका दोष येईल तितका त्याच्यावर येणार नाहीं. कां कीं, कोणासही स्वकालीन लोकांहून समजुतीनें किंवा अभिरुचीनें थोर नसल्याबद्दल मोठेंसें नांव ठेवणें हें अगदीं गैर आहे. तरी पण ही गोष्ट सामान्य जनांचीच झाली. जे जात्याच थोर असतात ते पंकपंकजन्यायानें आपल्या काळाच्या कलंकापासूनही अलिप्त राहतात. ही स्वभावोन्नति जर आपल्या कवीस असती, तर त्याच्या आधीं भवभूतीच्या व त्याच्या मागून बाणभट्टाच्या विशद मनावर[1] कालिदासादि प्राचीन कवींच्या वाणीचे अनेकविध गुण जसे यथास्थितपणें प्रतिबिंबित झाले, तसे ते याच्याही मनावर होते. पण तसें मुळींच नसल्यामुळे सुबंधु हा भवभूति व बाण याप्रमाणें प्राचीन श्रेष्ठ कवींच्या धाटणीवर न पडतां पुढील भ्रष्टतेस पावलेलीच लोकाभिरुचि त्यानें उचलली. शिवाय कवित्वाचें तत्त्व जी सहृदयता तीही त्यास फारशी असलेली दिसत नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथांत शृंगारकरुणादि रस आणले आहेत खरे; पण सर्व प्रकार केवळ सांप्रदायिक. त्यांत आम्हीं नवेंच असें भासण्यासारखें थोडें; व हृदयास लागण्यासारखें तर मुळींच नाहीं

---

१ बाणभट्टाचें कालिदासाविषयींचें मत प्रगट करण्यास हा प्रसंग बरा आहे. 'हर्षचरिता'च्या पूर्वोक्त स्थळीं बाण म्हणतो—

निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु ।
प्रीतिर्मधुरसार्द्रासु मंजरीष्विव जायते ॥

"नुकत्याच आलेल्या आणि मधानें भिजलेल्या अशा नव्या मंजऱ्या पाहून जसा मनास आनंद वाटतो, तसा कालिदासाच्या ( रसभरित ) सूक्ति निघाल्या असतां कोणास हर्ष होत नाहीं ?"

म्हटलें असता चालेल. याप्रमाणें सांप्रत कथेवरूनच पाहतां **सुबंधु** दुसऱ्या प्रतीच्याच कवींत मोडेल, व त्यातही केवळ अग्रगण्य होईल असेंही वाटत नाहीं.

वर 'कथेवरून' याप्रमाणें व्यावृत्ति करण्याचें प्रयोजन अंमळ पुढें स्पष्ट होईल. सध्यां **सुबंधूच्या** ग्रंथांत जे गुण दिसतात ते व दुसऱ्याही कांहीं गोष्टी ज्या त्याच्या तर्फेनें लिहिण्यासारख्या आहेत त्या येथें सांगतों.

सर्वांत पहिली गोष्ट ही होय कीं, हा गद्यरचनेचा प्रकार **सुबंधूनेंच** पहिल्यानें काढला; व हें जरी पूर्वोक्त संविधनकादि दोष वर्ज्य नही करतां आलें असतें, तरी संस्कृत भाषेंत ही तऱ्हा नवीनच काढल्याबद्दल त्यास अवश्य मान दिला पाहिजे. 'दशकुमारचरिता'चा व विशेषतः 'कादंबरी'चा रस अनुभवित असतां **सुबंधूचे** उपकार वाचकांनीं विसरूं नये.[1] तसेंच दुसरें हें की, 'वासवदत्ता' वाचून जर रसिक वाचकांची सर्वथा तृप्ति झाली नाहीं, तर तसें झाल्यानें त्याची निराशा केल्याचा व वाचनाचे श्रम व्यर्थ पडल्याचा दोष त्यांत **सुबंधूस** बिलकुल देतां येणार नाहीं. कारण प्रकृत प्रबंधाच्या वाचनानें कवि त्यास कोणत्या प्रकारची तृप्ति देणार हें त्यानें ग्रंथास आरंभ होण्याच्या अगोदरच स्पष्ट सांगितलें आहे. तो प्रकार कोणता? तर अर्थातच 'प्रत्यक्षरीं श्लेष साधलेल्या' चित्रविचित्र गद्यापासून मनास वाटणारी मौज! ही त्याची हौस कितीही विलक्षण,—किंबहुना पोरकट देखील,—जरी वाटली, तरी आपला उद्देश त्यानें पुरतेपणीं सिद्धीस नेला इतकें अवश्य कबूल केलें पाहिजे; व म्हणून या ग्रंथास उत्तम काव्यांत जरी गणतां येणार नाहीं, तरी रिकाम्या वेळीं किंवा जेव्हां मनास विनोद करणें असेल, तेव्हां हा हातीं घेतला असतां मजा वाटणारी आहे. 'वासवदत्ते'चें तादृश तेज न पडण्याचें तिसरें असेंही कारण आहे कीं, पुढील दोन ग्रंथांपुढें व विशेषतः त्यांतील एकापुढें तर ती अगदींच

---

1 वरील मत आमचें चार वर्षांपूर्वी होतें. **बाण, सुबंधु व दंडी** यांचा कालक्रम वस्तुतः कसा आहे हे पुढील निबंधांत व्यक्त होईल.

लोपून गेली. तेव्हां या कृतीच्या पायीं ( कीं ज्या मुळीं तिच्याच धाटणीवर रचल्या गेल्या ) जी तिची दुर्दैवानें—अथवा खरें म्हटलें तर सुदैवानें ( कां कीं, अशा उज्वल प्रबंधास कारणभूत होणें म्हणजेच आधीं लहानसान यश नव्हे )–दुर्दशा होऊन गेली, तिजवरूनच केवळ तिची योग्यता कमी मानणें हें ठीक नव्हे शिवाय सुबंधूच्या काळाचा व त्याच्या स्वभावास खिळलेली जी श्रमविमुखता सदरील ग्रंथावरून दिसून येते, तिचाही विचार केला असतां, या कवीची दूषणार्हता एरवीं वाटते त्याहून बरीच कमी वाटेल यांत संशय नाहीं.

याप्रमाणें प्रस्तुत कवीच्या कैवारानें कित्येक गोष्टी कळविल्या; पण यावरून असें समजायचें नाहीं, कीं सुबंधूची मोठी योग्यता म्हणून. इतकेंच कीं, त्याचे जे दोष आहेत ते क्षम्य आहेत. त्याचे कित्येक गुण अजून सांगावयाचेच आहेत, व ते मागून सांगण्याचें कारण इतकेंच कीं, पूर्वोक्त मोठमोठे दोष जसे सहज दृष्टीस पडण्यासारखे आहेत तसे ते नव्हेत. सर्वांत पहिला गुण हा कीं, सुबंधूस भाषा अगदीं वश होती, व हें त्यानें जी बहुधा सर्व ग्रंथभर श्लेषमय रचना केली आहे तीवरून स्पष्ट दिसतें आहे शिवाय शब्दांची रचनाही त्यानें प्रौढ व मधुर अशी केली आहे. त्याचीं वर्णनेंही कोठें कोठें चमत्कारिक आहेत

पण सुबंधूच्या कवित्वाचें खरें स्वरूप म्हणाल तर प्रस्तुत ग्रंथाच्या उपांगांत—म्हणजे प्रस्तावना व मधें मधें घातलेलीं वर्णनरूप पद्यें यांतच—दृष्टीस पडतें. आम्हांस खचित वाटतें कीं, रसिक व सहृदय वाचकांस यांपासून जो आनंद व जी उमेद प्रथमतः वाटेल ती त्या आनंदाचा पुढें विसर होऊन खचून मात्र जाईल हीं उपांगें इतकीं उत्कृष्ट साधण्याचें कारण उघडच आहे. तें हें कीं, खुद्द ग्रंथांत रचनेच्या संबंधानें जी कृत्रिमता चोहोंकडे मुद्दाम आणली आहे, ती दोहों ठिकाणीं या उपांगांत बिलकुल नाहीं. रचना सरळ असून कवीनें प्रत्यक्षतः अनुभविलेल्या मनोवृत्तींचेंच त्यांत वर्णन आहे. उदाहरणार्थ, महापराक्रमी व विद्वज्जनांचें लालन करणारा जो **विक्रमादित्य** त्याच्या वेळेस न जन्मतां फार मागून जन्मल्याबद्दलचा खेद व त्या

राजाबरोबर गेलेल्या वैभवाचा शोक ज्या आर्येत आपल्या कवीनें केला आहे, तींतील करुणरसाची बरोबरी कथेंतील नायकाचा शोक आहे त्याहून आणखी दसपट वाढविला असता तरी झाली असती काय ? तसेंच प्रस्तावनेच्या पहिल्या आर्यांत खलांचें क्रूरत्व, नीचता, मूर्ख-पणा, यांचें वर्णन ज्या खुबीनें झालें आहे, तीपुढें ग्रंथांतील अप्रस्तुत सुभाषित केवळ रद्द आहे ! तशींच इतर जीं जागोजाग नगरादिकांचीं लांबलचक केवळ सांप्रदायिक अशीं वर्णनें केलीं आहेत त्या सर्वांस विंध्याटवींतल्या सिंहाच्या वर्णनाचे दोन श्लोक खालीं बसवितील. सारांश, जर आपल्या कवीच्या वाग्देवतेनें आपलें सहज सौंदर्य नीट ओळखून मूर्खांच्या डोळ्यांत भरणाऱ्या वेड्या हौसेस्तव बेगडी थाट-माटानें तें एका तोंडाशिवाय चोहोंकडून झांकून टाकलें नसतें, तर ती कधींच आपल्या आर्यांच्या सखींशीं बरोबरीनें बसून विराजमान होती; व सध्यां जी प्रत्येक गुणदोषविवेचकाच्या तडाक्यांत सांपडून निर्दयपणें पायांखालीं तुडविली जाऊन आपल्या अप्रबुद्धपणाचें चिर-कालिक प्रायश्चित्त भोगीत आहे, तीच थोड्याशा शहाणपणानें आपल्या थोरल्या बहिणीप्रमाणें जगास शिरसावंद्य होऊन राहती !

परंतु कोणास खचित अजून विचारणें असेल कीं, हें सर्व झालें खरें, पण बाणकवीनें जी येवढी सुबंधूची प्रशंसा केली आहे तिची काय वाट ? ही शंका लहान नव्हे खरी; कारण जो संस्कृत कादंबरीकारांत अग्रगण्य होऊन बसला आहे, व ज्याच्या अत्युत्तम ग्रंथाच्या सर्वत्र प्रचारास्तव त्या ग्रंथाचें नांव मूळचें विशेषबोधक असतां सामान्यबोधक झालें,[१] अशा महान् ग्रंथकाराचें वचन जर प्रमाण

---

१ असा आमचा समज आहे. ' कादंबरी ' शब्दाचा प्रसिद्ध अर्थ ' मद्य ' आहे. शिवाय ' सरस्वती ' ' कोकिला ' असेही दुसरे अर्थ सांपडतात. पण ' कल्पित गोष्ट ' असा जो त्या शब्दाचा मराठींत अर्थ होऊन गेला आहे तो संस्कृत कोशांत नाहीं यास्तव ज्याप्रमाणें ' केका-वली ' वरून ' केका ' या शब्दाचा प्रयोग ' पृथ्वीवृत्त ' या अर्थी लोक करतात, त्याप्रमाणेंच ' कादंबरी ' ग्रंथावरून ' कादंबरी ' शब्द ' कल्पितकथा ' या अर्थी रूढ झाला असावा असें वाटतें.

धरूं नये, तर मग धरावें तरी कोणाचें ? हें खरें; पण वरील स्तुति एकदेशतःच घेतली पाहिजे;—म्हणजे **सुबंधूची** शब्दचमत्कार करण्याविषयीं हद्द आहे, असाच **बाणभट्टाचा** अभिप्राय समजला पाहिजे. हा अभिप्राय त्यानें आपल्या कादंबरी ' तही एके ठिकाणीं स्पष्ट लिहिला आहे—**उत्कृष्टकविगद्यमिव विविधवर्णश्रेणीप्रतिपाद्यमानानेकानूनार्थसंचयम्** '[१] ( उत्कृष्ट कवीच्या गद्याप्रमाणें, ज्यांत निरनिराळ्या वर्णपंक्तींतून अनेक अर्थ निघतात. ) येथें ' उत्कृष्ट कवि ' या शब्दाचें धोरण **सुबंधूवर** मुख्यतः आहे हें उघड आहे. असो पण हा अर्थ आम्हींच **बाणकवीच्या** शब्दांवर बसविला नाहीं, तर त्याचा अभिप्राय तसाच होता, याविषयींचें मोठें व निर्णायक प्रमाण खुद्द ' कादंबरी ' ग्रंथच आहे हा ग्रंथ रचतांना **बाणभट्टाचें** लक्ष ' वासवदत्ते ' वर किती होतें हें ते दोन्ही ग्रंथ जे लक्षपूर्वक वाचतील त्यांच्या सहज ध्यानांत येईल संविधानकांतील कांहीं गोष्टी, जागोजागचीं सूर्य, चंद्र, ऋतु, पर्वत इत्यादींचीं वर्णनें, रचनेची एकंदर धाटणी हीं सर्व **सुबंधूच्या** ग्रंथावरूनच **बाणभट्टानें** उचललीं हें स्पष्ट दिसत आहे. पण इतकें असून चमत्कार काय झाला आहे कीं, नकलेचीच आजपर्यंत चोहोंकडे ख्याति होऊन मूळच्या कृतीस कोणीच विचारीत नाहीं ! असें होण्याचें कारण काय बरें झालें असावें ? अर्थात् हेंच कीं, **बाणभट्टानें** ' वासवदत्ते ' वरून प्रौढ व कोमल अशी वर्णरचना, कोठचे कोठचे चमत्कारिक श्लेष व सुंदर समास असे घेतले खरे; पण जेथें **सुबंधूचें** अरसिकत्व अत्यंत दिसून येतें अशी जी पूर्वोदाहृत निरंतर प्रासरचना ती असमंजस व क्लिष्टत्वदोषग्रस्त म्हणून तिची **बाणभट्टानें** सर्वथा उपेक्षा केली आहे. तिचा मागमूसही ' कादंबरी ' त दिसत नाहीं. सारांश, ' वासवदत्ते ' तील सर्व गुण घेऊन तींतील सर्व दोष **बाणभट्टानें** निखालस टाकून दिले आहेत. यावरून मागें आसेली जी त्यानें **सुबंधूची** मोठी,

---

१ चंद्रापीड राजवाड्यांत शिरला तेव्हां त्याचें वर्णन केलें आहे, त्यांत वरील श्लेष आहे. त्याचा दुसराही अर्थ उघड आहे—' ज्यांत निरनिराळ्या जातीचे लोक द्रव्याचे ढीग वरचेवर आणून टाकतात. '

तारीफ केली आहे, तिचा त्याच्या मनांतील वास्तविक अर्थ अगदीं उघड होतो. तेव्हां प्रस्तुत उक्ति अंशतः खरी व अंशतः कृतज्ञताबुद्धीस्तव केवळ उपचारार्थ मात्र अशीच समजली पाहिजे.

आतां 'वासवदत्ते'ची व 'कादंबरी'ची परस्पर तुलना करूं. या तुलनेवरून सुबंधूच्या कीर्तीस घातक झालेले सर्व दोष अत्यंत व्यक्त होतात. संविधानक, रसपोष, इत्यादि गुणांत 'कादंबरी'ची सर 'वासवदत्ते'स लवमात्रही येणार नाहीं हें तर वाचकाच्या अगोदर ध्यानांत आलेंच असेल. तसेंच 'वासवदत्ते'स रसापकर्षक झालेलें क्लिष्टत्व, ग्राम्यता हे दोषही 'कादंबरी'त बिलकूल नाहींत. तिसरा दोष परार्थस्तेय. हा जरी 'कादंबरी'त मुळींच नाहींसा म्हणतां येणार नाहीं, तरी तो 'कादंबरी'त अशा रूपाने दृष्टीस पडतो, कीं त्याचें दोषत्व मुळींच नाहींसें होऊन तो उलटा गुणरूपही झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें बाणभट्टानें कोठें कोठें उत्कृष्ट साधलेले श्लेष व छानदार जुळलेलीं पदें अशीं आपल्या ग्रंथांत 'वासवदत्ते'तून उतरून घेतलीं आहेत खरीं; पण तीं इतकीं थोडीं व इतक्या बेतानें घेतलीं आहेत कीं, त्यांवरून त्याचा समंजसपणा व त्याचें अमानित्व हीं उघड होतात. आतां त्यांच्या परस्पर तुलनेंत विचार करावयाचें असें एक मात्र मोठें अंग राहिलें. तें अर्थात् सश्लेष पदरचना होय.

अशी रचना दोघांसही अत्यंत प्रिय होती; पण कथांगत्वसंबंधानें तिजविषयीं दोघांचा स्पष्ट मतभेद होता. सुबंधूस कथा केवळ गौण वाटून प्रस्तुत रचनाच त्याच्या मतें काव्यसर्वस्व होती. तिच्या पायीं त्यानें संविधानक, रस, प्रसाद, इत्यादि सर्वांवर पाणी घालून अश्लीलत्वादि दोषांसही आपल्या ग्रंथांत जागा दिली. हें आपलें दृढ प्रेम सुबंधूनें जागोजागीं बोलून दाखविलें आहे. प्रस्तावनेचा शेवटला श्लोक तर मागें एकदां लिहिलाच आहे, त्यांत सरस्वतीचें उत्कृष्ट वरदान म्हणून आपलें प्रत्यक्षर श्लेषचातुर्य सांगितलें आहे,—जसें काय वाग्देवीचें निधिसर्वस्व म्हणजे तेंच होय! तसेंच संध्यासमयवर्णनांत एके ठिकाणीं (पृष्ठ १८४) म्हटलें आहे,—"दीर्घोच्छ्वासरचनाकुलं

सुश्लेषवक्रघटनापटु सत्कविवचनमिव चक्रवाकमिथुनमतीवाखिद्यत ' ( चक्रवाक पक्ष्यांचे युग्म सत्कवींच्या वाणीप्रमाणें दीर्घसमासमय रचना करण्यांत गुंतलें असून श्लेषोक्तिघटनेंत निपुण होत्सातें[1] तीव्र विरहदुःख अनुभवूं लागलें ). या दोहोंवरून स्पष्ट दिसतें कीं, लांब लांब समास व श्लेष--जीं दोन्हीं महाकवींच्या ग्रंथांत बहुधा मुळींच नसतात, व ज्यांस स्वतंत्र योग्यता मुळींच नसून कार्यविशेषीं मात्र जीं घातलीं असतां शोभतात--त्यांसच आपला कवि सत्काव्याचे केवळ जीवप्राण मानीत असे.

आतां दुसऱ्या पक्षीं बाणकवीचें मत पहा. सश्लेषपदरचनेकडे जरी त्याचा एवढा ओढा दिसून येतो, तरी त्यामुळें कथेच्या कोण-त्याही अंगास लेशमात्रही न्यूनता किंवा दोष त्यानें येऊं दिला नाहीं. ही रचना जेथें शोभेल तेथेंच घातली असल्यामुळें ती एकंदर ग्रंथाशीं विसंगत न दिसून नाकापेक्षां मोती जड असा प्रकार त्यांत झाला नाहीं. याविषयीं त्याची उक्ति एक तर एकदेशीयत्वाने वर आलीच आहे; व दुसरी ' कादंबरी ' च्या प्रस्तावनेंत आहे, तींत त्याचा दुहेरी उद्देश स्पष्ट लिहिला आहे:--

---

१ चक्रवाकांच्या संबंधानें श्लेषार्थ असा--' एकमेकांस आलिंगन देऊन चुंबन करण्यांत निपुण असा तो जोडा विरहदुःखानें मोठमोठे उसासे टाकून'--कष्ट पावूं लागला.

२ मनाच्या कौशल्याशीं सहज जी शालीनता ती सुबंधूच्या ठायीं दिसत नाहीं. सत्कवींच्या वर्गांत आपली गणना होणार अशी त्याची त्यास मोठी खात्री वाटत होती हें जागोजाग त्याच्या दर्पोक्तींत स्पष्ट दिसतें. वसंतकालवर्णनांत ( पृष्ठ १३४ ) तो म्हणतो--' सत्कविका-व्यबंध इवाबद्धतुहिनः ' तसेंच प्रस्तावनेंत--

' अविदितगुणाऽपि सत्कविभणितिः कर्णेषु वमति मधुधाराम् ।
अनधिगतपरिमलाऽपि हि हरति दृशं मालतीमाला ।

या दोहोंसकट आपल्या कवीचे सत्कवित्वाविषयीं अभिप्राय एकंदर चार मिळाले आहेत. पण त्या सर्वांत कवितेच्या बाह्यांगाची म्हणजे पदरचनेचीच प्राधान्यानें प्रशंसा केली आहे. ह्या लहानशा दिसणाऱ्या गोष्टींत तात्पर्य थोडे आहेसें नाहीं !

( कथाप्रशंसा )

स्फुरत्कलालापविलासकोमला
करोति रागं हृदि कौतुकाधिकम् ।
रसेन शय्यां स्वयमभ्युपागता
कथा जनस्याभिनवा वधूरिव ॥

हरंति कं नोज्ज्वलदीपकोपमैर्नवैः पदार्थैरुपपादिताः कथाः
निरंतरश्लेषघनाः सुजातयो महास्रजश्चंपककुड्मलैरिव ॥

" मदनपरवश होत्साती नूतन वधू आपणच होऊन शेजेकडे आली असतां तिच्या अव्यक्तमधुर व कोमल अशा भाषणानें मोहून जाऊन जनांस जसें कौतुक वाटतें, व हृदय प्रेमभरानें दाटून जातें; तसेंच त्या भाषणाप्रमाणें मधुर व कोमल आहे पदरचना जिची अशी कथा सर्वांच्या मनांत कौतुक उत्पन्न करून रसानें अंतःकरण तल्लीन करून टाकते. "[1]

" उजळलेल्या ज्योतिसारख्या सुंदर पदांनीं व अर्थांनीं बांधलेल्या व जागोजाग ज्यांत श्लेषांची गर्दी केली आहे अशा कथा, मधें मधें ज्यांत चांपयाच्या कळ्या दाट ओंवल्या आहेत अशा मोठ्या हारां-प्रमाणें कोणाच्या चित्ताचें हरण करीत नाहींत ? "

वरील दोघां कवींच्या गुणदोषांच्या उदाहरणार्थ त्यांच्या ग्रंथांतून एक एक उतारा येथें घेतों. तेवढ्यावरूनही दोघांच्या वर्णनाची एकंदर तऱ्हा मार्मिक वाचणारांच्या तेव्हांच लक्षांत येईल:--

'वासवदत्ते'चा आरंभ--( चिंतामणिराजाचें वर्णन )

अभूदभूतपूर्वः सर्वोर्वीपतिचक्रचारुचूडामणिश्रेणी-शाणकोणकषणनिर्मलीकृतचरणनखमणिर्नृसिंह इव द-र्शितहिरण्यकशिपुक्षेत्रदानविस्मयः कृष्ण इव कृतवसुदे-वतर्पणो नारायण इव सौकर्यसमासादितधरणिमंडलः कंसारातिरिव जनितयशोदानंदसमृद्धिरानकदुंदुभिरिव

1 हें वाचून आमच्या वाचकांस पूर्वीच्या एका आर्येची आठवण झाल्याविना राहणार नाहीं. ( कालिदास–पृष्ठ १६ ).

कृतकाव्यादरः सागरशायीवानंतभोगिचूडामणिमरीचिरंजितपादपद्मो वरुण इवाशांतरक्षणोऽगस्त्य इव दक्षिणाशाप्रसाधको जलनिधिरिव वाहिनीशतनायकः समकरप्रचारश्च हर इव महासेनानुगतो निवर्तितमारश्च मेरुरिव विबुधालयो विश्वकर्माश्रयश्च रविरिव क्षणदानप्रियश्छायासंतापहरश्च कुसुमकेतुरिव जनितानिरुद्धसंपद्रतिसुखदप्रदश्च विद्याधरोऽपि सुमना धृतराष्ट्रोऽपि गुणप्रियः क्षमानुगतोऽपि सुधर्माश्रितो बृहन्नलानुभावोऽप्यंतःसरलो महिषीसंभवोऽपि वृषोत्पादी अतरलोऽपि महानायको राजा चिंतामणिर्नाम ।

'कादंबरी'चा आरंभ—( जन्मांतरगत नायकाचें वर्णन. )

( कथामुखम् )

आसीदशेषनरपतिशिरःसमभ्यर्चितशासनः पाकशासन इवापरः चतुरुदधिमालामेखलाया भुवो भर्ता प्रतापानुरागावनतसमस्तसामंतचक्रः चक्रवर्तिलक्षणोपेतः चक्रधर इव करकमलोपलक्ष्यमाणशंखचक्रलांछनः हर इव जितमन्मथः गुह इवाप्रतिहतशक्तिः कमलयोनिरिव विमानीकृतराजहंसमंडलः जलधिरिव लक्ष्मीप्रसूतिः गंगाप्रवाह इव भगीरथपथप्रवृत्तः रविरिव प्रतिदिवसोपजायमानोदयः मेरुरिव सकलभुवनतलोपजीव्यमानपादच्छायः दिग्गज इवानवरतप्रवृत्तदानार्द्रीकृतकरः कर्ता महाश्चर्याणां आहर्ता क्रतूनां आदर्शः सर्वशास्त्राणां उत्पत्तिः कलानां कुलभुवनं गुणानां आगमः काव्यामृतरसानां उदयशैलो मित्रमंडलस्य उत्पातकेतुरहितजनस्य प्रवर्तयिता गोष्ठीबंधानां आश्रयो रसिकानां प्रत्यादेशो धनुष्मतां धौरेयः साहसिकानां अग्रणीर्विदग्धानां वैनतेय इव विनतानंदजननः वैन्य इव चापकोटिसमुत्सारितसकलारातिकुलाचलो राजा शूद्रको नाम ।

चिंतामणिराजाच्या राज्यरीतीचें वर्णन—

यत्र च शासति धरणिमंडलं छलनिग्रहप्रयोगो वादेषु नास्तिकता चार्वाकेषु कंटकयोगो नियोगेषु परीवादो वीणासु खलसंयोगः शालिषु द्विजिह्वसंगृहीतिरहितुंडिकेषु करच्छेदः कुलकरग्रहणेषु नेत्रोत्पाटनं मुनीनां द्विजराजविरुद्धता पंकजानां सार्वभौमयोगो दिग्गजस्याग्नितुलाशुद्धिः सुवर्णानां सूचीभेदो मणीनां शूलभंगो युवतिप्रसवे दुःशासनदर्शनं भारते करपत्रादारणं जलजानाम् ।

शूद्रकाच्या राज्यरीतीचें वर्णन--

यस्मिंश्च राजनि जितजगति परिपालयति महीं चित्रकर्मसु वर्णसंकराः रतेषु केशग्रहाः काव्येषु दृढबंधाः शास्त्रेषु चिंताः स्वप्नेषु विप्रलंभाः छत्रेषु कनकदंडाः ध्वजेषु प्रकंपाः गीतेषु रागविलसितानि करिषु मदविकाराः चापेषु गुणच्छेदाः गवाक्षेषु जालमार्गाः शशिकृपाणकवचेषु कलंकाः रतिकलहेषु दूतसंप्रेषणानि सार्यक्षेषु शून्यगृहाः प्रजानामासन् । यस्य च परलोकाद्भयं अंतःपुरिकालकेषु भंगः नूपुरेषु मुखरता विवाहेषु करग्रहणं अनवरतमखाग्निधूमेनाश्रुपातः तुरगेषु कशाभिघातः मकरध्वजे चापध्वनिरभूत् ।

चिंतामणिराजास कोणत्याही पूर्वीच्या राजाची उपमा साजत नाही या अर्थानें सुबंधु म्हणतो—

महावराहो गोत्रोद्धरणप्रवृत्तोऽपि गोत्रोद्दलनमकरोत् । राघवः परिहरन्नपि जनकभुवं जनकभुवा सह वनं विवेश । भरतो रामे दर्शितभक्तिरपि राज्ये विराममकरोत् । नलस्य दमयंत्या मिलितस्यापि पुनर्भूपरिग्रहो जातः । पृथुरपि गोत्रसमुत्सारणाविस्तारितभूमंडलः । इत्थं नास्ति वागवसरः पूर्वतरराजेषु ।

बाण शूद्रकाविषयीं लिहितो—

**नाम्नैव यो निर्भिन्नारातिहृदयो विरचितनारसिंहरूपाडंबरं एकविक्रमाक्रांतसकलभुवनतलो विक्रमत्रयायासितभुवनत्रयं जहासेव वासुदेवम् ।**

वरील उतारे वास्तविक दोनच आहेत; पण दोन्ही कवींची वर्णनाची शैली परस्पर ताडतां यावी म्हणून त्यांचे निरनिराळे अवयव समोरासमोर आणले आहेत. त्यांवरून वरचढ कोण आहे याचा निश्चय रसिक संस्कृतज्ञ तर एका वाचण्याबरोबर करील. तरी इतरांकरितां येथें अंमळ विस्तार करतों. वरच्या उताऱ्यांवरून दोघां कवींतला एक मोठा भेद हा दिसतो कीं, सुबंधूनें आपल्या वरप्रसादाच्या भरावर जाऊन कांहीं श्रम न घेता पहिल्या सपाट्यासरसे भराभर श्लेष झोकून दिले आहेत. विशाल बुद्धि व श्रम हीं स्वभातःच परस्परांशीं अत्यंत विरुद्ध आहेत असें पुष्कळांचें—मोठमोठ्यांचेंही—मत असतें. त्यांस वाटतें कीं, तडाक्यासरसें काम हातून झालें नाहीं तर मग गुण तो काय? या मूर्ख समजुतीस्तव त्यांस असें वाटत असतें कीं, श्रमाअंतीं एकादें काम उत्कृष्ट साधण्यापेक्षा सहज रीतीनें तें सरासरीही करण्यांत कांहीं विलक्षण थोरवी आहे! हीच समजूत सुबंधूच्या मनास खिळली होती. तिचे अनर्थ वरील लहानशा उताऱ्यातही दृश्य आहेत. त्याच्या कवित्वाचा ओघ इतका उच्छृंखल होता कीं, सरस व चमत्कारिक श्लेष, रसशुद्धि, व्याकरणशुद्धि, वगैरे साधत तोंपर्यंत त्याचा वेग राहूंच नये! वरील श्लेषांतील कितीएक श्लेष इतके भिकार आहेत कीं, एकादा महाशंखही तसे हजरों करील. रसभंगाचीं उदाहरणेंही लहानसहान आहेत असें नाहीं;—'महिषीसंभवोऽपि वृषोत्पादी।' केवढा राजमान्य श्लेष हो!![1] 'शूलभंगो युवतिप्रसवे,' यावर चर्चा वर झालीच आहे. तसाच व्याकरणभंग—'कृतवसुदेवतर्पणः', 'क्षणदानप्रिय'—पण येथें आमच्या कवीस तादृश भय नाहीं. श्लेष रचण्याचें मात्र काम त्यानें आपणावर

---

१. याच्याच जोडीचा एक श्लेष पृष्ठ १५२ यांत आहे—'मुग्धैवेंदुमती महिष्यप्यजानुरागिणी बभूव.'

घ्यावें; मग त्यांचा अर्थ बसविणारे त्याचे टीकाकार भक्कम आहेत. छप्पन्न कोश, भाष्यें, चटसारीं धुंडाळून आपल्या महाकवीच्या श्लेष-घटक पदांवर तीं बिचारीं नको नको म्हणत असतांही ते अर्थ बसविल्याखेरीज कधींही राहणार नाहींत! असो सर्वांत शवटल्या उताऱ्यांतील श्लेष बरेच साधले आहेत. तरी ते केवळ शब्दात्मकच असल्यामुळें बाणकवीचे पुढील अर्थात्मक श्लेष आम्हांस ज्यास्त पसंत वाटतात.

सुबंधूच्या व बाणकवीच्या श्लेषांत दुसरा असाही फरक नेहेमीं असतो कीं, सुबंधूचे श्लेष म्हटले म्हणजे शब्दचमत्कार करण्याच्याच केवळ उद्देशाने आणलेले दिसतात. पण बाणकवीचें तसें नसून त्यांतील प्रत्येकांत वर्णावयाचा निरनिराळा अर्थही ग्रथित केलेला असतो. त्यामुळें बाणकवीचे सर्व श्लेष मिळून एक सबंध वर्णन असतें. तसें सुबंधूचें असत नाहीं; त्यांतील कित्येक गाळले तरी वर्णनांत उणीव येणार नाहीं. शिवाय सुबंधूचीं श्लेषार्थ काढण्याचीं कांहीं अमुक अशीं स्थलेंही नाहींत. जेथून हातास लागेल तेथून तो श्लेष आणतो. व्याकरण, न्याय, वैद्यक इत्यादि शास्त्रें, ग्रंथकारांचीं नांवें, ग्रंथांचीं नांवें, हीं सर्व 'वासवदत्ते'त श्लेषविषय झालीं आहेत. 'कादंबरी'तला प्रकार असा नाहीं. तींत सर्वप्रसिद्ध ज्या सृष्टींतील किंवा पुराणांतील गोष्टी त्याच मुख्यत: असून व्याकरणादिकांचा संबंध एकाद्या ठिकाणीं असून तो सर्वांस सहज समजण्यासारखा असतो.

आतां 'वासवदत्ते'तील वर सांगितलेलीं उत्कृष्ट स्थलें दाखवावयाचीं मात्र उरलीं आहेत. हा निर्देश करण्यास आम्हांस अतिशयित आनंद वाटतो. पुढील उतारे अर्थातच थोडे असतील, पण याच कारणास्तव आमच्या सहृदय वाचकांस त्यांची गोडी ज्यास्त लागेल असें आम्हांस वाटतें:—

सुबंधु आरंभीं वाग्देवीस नमन करून कवींचा महिमा वर्णितो:—

**करबदरसदृशमखिलं भुवनतलं यत्प्रसादतः कवयः।**
**पश्यंति सूक्ष्ममतयः सा जयति सरस्वती देवी॥**

उत्कृष्ट पदरचनेची रमणीयता--

अविदितगुणाऽपि सत्कविभणितिः कर्णेषु वमति मधुधाराम् । अनधिगतपरिमलाऽपि हि हरति दृशं मालतीमाला ॥

हा काव्यगुण 'वासवदत्ते'त चोहोंकडे आढळतो. पुढील मलयानिल-वर्णनात तो विशेषतः दृष्टीस पडतो:--

कंदर्पकेलिसंपल्लंपटलाटीललाटतटधम्मिल्लमेलनमिलितपरिमलसमृद्धमधुरिमगुणः कामकलाकलापकुशलचारुकर्णाटसुंदरीस्तनकलशघुसृणधूलिपरिमलामोदवाही करणरसिककांतकुंतलीकुंतलोल्लासनसंक्रांतपरिमलमिलितालिमालामधुरतरझंकाररवमुखरितनभस्तलो नवयौवनरागतरलकेरलीकपोलपालिपत्रावलीपरिचयचतुरः चतुःषष्टिकलाकलापविदग्धमुग्धमालधनितंबिनीनितंबबिंबसंवाहनकुशलः सुरतश्रमपरवशांध्रिनीरंध्रपीनपयोधरभारनिदाघजलकणनिकरशिशिरिता मलयानिलो ववौ ।

नायिकेची मदनावस्था--

अनंतरं परिजनप्रयत्नोच्छ्वसितजीविता सती क्षणमतिशिशिरघनसाररसनिम्नगाकूलपुलिने क्षणमतितुहिनमलयजरससरित्परिसरे क्षणमरविंदकाननपरिवारितसरस्तटविटपिच्छायासु क्षणमनिलोल्लासितदलेषु कदलीकाननेषु क्षणं कुसुमशय्यासु क्षणं नलिनीदलसंस्तरेषु प्रलयकालोदितद्वादशार्कविकिरणकलापतीव्रविरहाग्निदह्यमानामतिकृशां विप्राणामिव तनुं बिभ्रती प्रचलदमंदमंदरांदोलितदुग्धसिंधुतरलतदंगच्छटाधवलहासच्छुरिताधरपल्लवं तन्मुखारविंदं द्विजकुलमिव श्रुतिप्रणयि तदीक्षणयुगलं सहजसुरभिमुखपरिमलमाघ्रातुकामेव सुदूरविनिर्गता सा नासावंशलक्ष्मीः कलंकमुक्तेन्दुकलाकोमला पीयूषफेनपटलपांडुरा सा द्विजपंक्तिः तददृष्टस्वर-

मनंगमतिशयानं रूपं धन्यानि तानि स्थानानि ते च जनपदाः पुण्यानि नामाक्षराणि च तानि सुकृतभांजि यान्यमुना परिष्कृतानीति मुहुर्मुहुः परिभावयंती दिक्षु विदिक्षु लिखितमिव नभस्युत्कीर्णमिव विलोचनं प्रतिबिंबितमिव चित्रफलके लिखित्वा पुरोदर्शितमिवेतस्ततो विलोकयंती व्यतिष्ठत ।

संस्कृत कवितेचा ज्या काळीं कळस झाला त्या वेळेस आपण नसून पुढें जन्मास आल्याबद्दलचा सुबंधूचा खेद किती द्रव आणणारा आहे !

सा रसवत्ता विहता[1] नवका विलसंति चरति नो कं कं ।
सरसीव कीर्तिशेषं गतवति भुवि विक्रमादित्ये ॥

या आर्येंत येवढी हृदयद्रावकता कशामुळें आली आहे हें आमचें आम्हांसच नीट समजत नाहीं ! तिला आर्याछंदाचें मनोहरत्व, पदांची कोमल रचना, एकंदर पद्याचा करुणस्वर, सरोवराची सरस उपमा, सहज बहरीनें साधलेले श्लेष, अनेक गोष्टींनीं प्रिय झालेल्या त्या शककर्त्याच्या नांवाचा पद्यांतीं उल्लेख, आणि त्याच्या पुढें झालेल्या राजांच्या अंदाधुंदीचें थोड्यांत खोंचदार वर्णन, यांतून कोणतें विशेष कारणभूत होत असेल तें असो ! आम्हांस खरोखर वाटतें कीं, कवीची व वाचकाची एकात्मता या स्थलीं जितकी पूर्ण होते तितकी इतरत्र कोठेंही होत नसेल !

सज्जनप्रशंसा—

भवति सुभगत्वमधिकं विस्तारितपरगुणस्य सुजनस्य ।
वहति विकासितकुमुदो द्विगुणरुचिं हिमकरोद्योतः ॥

खलनिंदा—

अतिमलिने कर्तव्ये भवति खलानामतीव निपुणा धीः ।
तिमिरे हि कौशिकानां रूपं प्रतिपद्यते चक्षुः ॥

---

१ या शब्दाचें ( म्हणजे रसवत्तेची हानि झाल्याचें ) सर्वोत्कृष्ट उदाहरण हा आपला ग्रंथच होय हें सुबंधूच्या ध्यानींमनींही नसेल ! स्वाभिमानानें मनुष्य असा चमत्कारिक रीतीनें फसून जातो !

विध्वस्तपरगुणानां भवति खलानामतीव मलिनत्वम् ।
अंतरितशशिरुचामपि सलिलमुचां मलिनिमाऽभ्यधिकः॥
हस्त इव भूतिमलिनो यथा यथा लंघयति खलः सुजनम् ।
दर्पणमिव तं कुरुते तथा तथा निर्मलच्छायम् ॥

संध्याकालवर्णनांत ताऱ्यांच्या शोभेचें वर्णन—

—क्षणेन च संध्यातांडवाडंबरोच्छलितमहानटजटाजूटकूटकुटिलविवर्तितजन्हुकन्यावारिधारांबिंदव इव विकीर्णाः दुर्धरधरणिभारभरभुग्नभीमदिङ्मत्तमातंगमंडलकरपरिमुक्तशीकरच्छटा इव गगनमहासरःकुमुदकाननसंदेहदायिभ्यः ... ... जगत्त्रयविजयविनिर्गतस्य मकरकेतोः रतिकरतलविकीर्णलाजा इव........ व्योमलक्ष्मीहारमुक्तानिकरा इव ... ... तिमिरोद्गमधूमधूमलसंध्यानलपरितप्तगगनमहास्थलीकटाहभृज्यमानलाजानुकारिण्य इव तारका व्यराजंत ।

विंध्यपर्वताच्या अरण्यांत हत्तीवर झडप घालणाऱ्या सिंहाचें वर्णन—

पश्योदंचदवांचदंचितवपुःपश्चार्द्धपूर्वार्द्धभाक्
स्तब्धोत्तानितपृष्ठनिष्ठितमनाग्भुग्नाग्रलांगुलभृत् ।
दंष्ट्राकोटिविशंकटास्यकुहरः कुर्वन् सटामुत्कटामुत्कर्णः कुरुते क्रमं करिपतौ क्रूराकृतिः केसरी ॥
उत्कर्णोऽयमकांडचांडिमपटुः स्फारस्फुरत्केसरः
क्रूराकारकरालवक्त्रविकटस्तब्धोर्ध्वलांगूलभृत् ।

---

१ पोपकवीनें हा व पुढील आर्येंतील अर्थ अंमळ निराळ्या दृष्टांतानें एकंदर वर्णिला आहे--

Envy will merit, as its shade pursue;
But like a shadow, proves the substance true.
For envied wit, like Sol eclipsed, makes known,
The opposing body's grossness, not its own.

Essay on Criticism.

**चित्रेणापि न शक्यतेऽभिलिखितुं सर्वांगसंकोचना-**
**च्चीत्कुर्वद्गिरिकुंजकुंजरशिरः कुंभस्थलस्थो हरिः ॥**

वरील दोन्ही वर्णनें कशीं हुबेहूब रेखल्यासारखीं उतरलीं आहेत! हीं 'शाकुंतलां'तील हरणीच्या वर्णनाशीं ( **कालिदास**-पृष्ठ ४२ ) जोडीनें बसल्यास चालतील. त्यांत करुणरस वर्ण्य असतां जशीं मृदु अक्षरें घातलीं आहेत, त्याप्रमाणें येथें रौद्र वर्ण्य असल्यामुळें **सुबंधूनें** कठोर वर्णांची योजना केली आहे.

याप्रमाणें वाचकांनीं पुरे म्हणण्याच्या अगोदरच उतारे संपविण्याची या प्रसंगीं पाळी आली. पण इतके उतारे सांपडले ही तरी दैवाचीच गोष्ट समजली पाहिजे; नाहीं तर, जर **सुबंधु कालिदासा**प्रमाणें प्रस्तावना मुळींच लिहिता ना, तर त्याच्या कवित्वाचें खरें उत्कृष्ट स्वरूप अगदींच झांकून जातें, व रसिकास आनंद देण्यासारखें त्याच्या ग्रंथांत बहुधा कांहींच आढळतें ना. इसापनीतींतील सांबराप्रमाणें त्याची परीक्षा अगदीं चुकली होती. ज्या कृत्रिम पदरचनेवर जो एवढा झुलत होता, व ज्या एकटीवरच नजर देऊन बाकी सर्व कथाभागाची त्यानें सर्वथा उपेक्षा केली, तिच्याच पायीं त्याचा ग्रंथ ठार बुडण्याचा रंग आला होता; आणि जी प्रस्तावना व मधले श्लोक आपलें वाक्चातुर्य खर्च न करितां त्यानें अगदीं साध्या रीतीनें लिहिलें--कीं तीं केवळ बाह्यांगें होत--तींच शेवटीं त्याच्या उपयोगीं पडलीं. असो. झालेली हानि आतां भरून येत नाहीं; यास्तव जो कोणी 'वासवदत्ता' वाचील त्यानें खुद्द ग्रंथावरूनच कवीच्या कवित्वाचा अजमास न करितां वरील बाह्यांगांकडे विशेषतः दृष्टि पुरवावी. तसें केलें असता त्याची खात्री होईल कीं, **सुबंधु** आपल्या आधींच्या चांगल्या काळीं जर झाला असता, तर त्याच्या कवित्वशक्तीस चांगलें वळण लागून ती सध्या आहे त्याच्यापेक्षां फार निराळ्या रूपानें प्रगट होती!

आतां सरतेशेवटीं या ग्रंथाची इंग्रजी आवृत्ति जी **डाक्टर हॉल्** यांनीं तयार केली आहे तिजविषयींहि कांहीं लिहिलें पाहिजे. आमच्या वरील लेखास हें पुस्तक किती उपयोगी पडलें. हें दोहोंचें जो अवलोकन करील त्यास सहज दिसण्यासारखें आहे. विशेषतः

सुबंधूच्या काळाचा निर्णय केल्यानें वरील साहेबांनीं आपली विद्वत्ता व तीव्र बुद्धि प्रकट करून सर्वांवर मोठा उपकार करून ठेवला आहे. 'वासवदत्तें' तील अनेक दोष जे वर सांगण्यांत आले ते हॉल् साहेबांनीं आपल्या प्रस्तावनेंत दाखवून त्यांवर जागोजाग पुष्कळ विनोदयुक्त चर्चा केली आहे; ती नुसत्या सुबंधूच्याच संबंधानें बहुतेक अंशीं बरोबर आहे. पण सदहू साहेबांस येवढ्यानेंच संतोष न होऊन वरील दोष सर्व संस्कृत कवींस, साऱ्या हिंदूंस, किंबहुना झाडून सगळ्या एशियाखंडांतील लोकांसही ते लावूं पाहतात ! हे साहेब जरी हिंदुस्थानांत पुष्कळ दिवस होते, व संस्कृताखेरीज इतर देशभाषांशींही त्यांचा बराच परिचय असावासें दिसतें, तरी हिंदु लोकांशीं त्यांचें मोठें प्रेम जडलें होतेंसें दिसत नाहीं. प्रोफेसर विलसन्, सध्यांचे मोक्ष् मुल्लर यांसारखा हॉल् साहेबांचा हिंदु लोकांविषयीं मोठा पक्षपात तर नव्हताच, पण केवळ तिऱ्हाईतपणें त्यांविषयीं वाजवी रीतीनें लिहिणें सुद्धां त्यांच्या जिवावर येई असें वाटतें. मिल् साहेबांनीं हिंदुस्थानांतील एकाही भाषेचें अक्षर सुद्धां माहित नसता चार हजार कोसांवरून त्याहीपेक्षां जास्ती वर्षांमागील हिंदुस्थानचा इतिहास लिहितांना जीं मतें प्रगट केलीं आहेत, व मेकालेसाहेब स्वतः हिंदुस्थानांत आले असतांही या देशाविषयींचे लहानपणीं पाद्री लोकांच्या ग्रंथावरून मनास जडलेले जे पोरकट ग्रह जसेचे तसेच त्यांनीं माघारीं विलायतेस नेले, तशींच मतें व तसेच ग्रह प्रस्तुत ग्रंथप्रकाशकानें आपल्या आवृत्तींत कोठें कोठें दाखविले आहेत. तरी आमच्या साहेबांच्या तर्फेनें एक मोठी सबब सांगणें वाजवी आहे. ती ही कीं, ज्या वेळेस ही आवृत्ति त्यांनीं काढली त्या वेळेस एकाद्या शांत मनुष्याचेंही मन हिंदूंपासून फिरलें असतें. ही वेळ गेल्या भयंकर बंडाची होय. त्यातून हॉल्साहेब तर त्या अनर्थांच्या ऐन गर्दींत असून त्यांस आपल्या ठिकाणाहून पळून सागर येथील कोटांत लपून रहावें लागलें. शिवाय बंडवाल्यांनीं अलाहाबादेस कागदपत्र जाळून टाकले त्यांत त्यांचेंही कांहीं नुकसान झालें. असो. तेव्हां या सर्व

गोष्टींचा विचार केला असतां हिंदुलोकांविषयीं सदरील प्रस्तावनेंत जें बऱ्याच कडक रीतीनें लिहिलें आहे त्याचें फारसें आश्चर्य वाटणार नाहीं.

'वासवदत्तें'त जो शृंगाराचा प्रकार आहे त्यावरून हॉल्साहेब म्हणतात कीं, हिंदुलोकांस शुद्ध शृंगाररसाची मुळींच ओळख नाहीं. तसेंच वरील ग्रंथांत जें सृष्टीचें वर्णन आढळतें त्यावरून ते असें स्पष्ट लिहितात कीं, हिंदुस्थान देशांत सृष्टीचें वैभव येवढें अपार असून त्यांत ते कोणत्याही काळीं रममाण झाले नाहींत, तें असून नसून त्यांस सारखेंच. या दोन्ही गोष्टींचें केवळ विधान केल्यानेंच त्या निःसंशय सिद्ध झाल्या असें गृहीत धरून हे साहेब हिंदूंची गणना सरासरी वनचरांमध्येंच करतात! वरील दोन्ही दोष मोठमोठे खरेच, व ते जर शाबीत झाले तर आफ्रिकेंतील नीग्रो लोकांच्याच वर्गांत शिरल्याखेरीज आम्हांस इलाज राहणार नाहीं. तथापि आमच्या लोकांचा कैवार घेऊन आम्हांस येथें मोठा वाद करितां येत नाहीं. वरील दोषांचा दोहोंचाही विचार आम्हीं मागें पृथक् पृथक् केला आहे.[1] त्याहून जास्त सध्यां कांहीं लिहिण्यासारखें नाहीं. तरी आणखीही तिसऱ्या एका गोष्टीबद्दल प्रस्तुत ग्रंथप्रकाशकानें हिंदूंची फार थट्टा केली आहे, तिजबद्दल थोडेंसें लिहिणें अवश्य वाटतें. बायकोनें नवऱ्यास लाजावें ही गोष्ट हॉल्साहेबांस मनुष्यस्वभावाविरुद्ध वाटते; व साऱ्या मुलखावेगळी ही चाल खोटी किंवा वेडगळ तऱ्हेची आहे असें म्हणण्याचा त्यांचा रोंख दिसतो. युरोपांतील सुधारलेल्या रिवाजांत वागलेल्या आमच्या साहेबांस ज्यापक्षीं आमच्या रीति उपहासास्पद वाटल्या, त्याअर्थी त्यांच्या तर्फेनें बोलण्याचा इलाजच खुंटला. तरी साहेबांची परवानगी असल्यास आम्हांस दुसऱ्याही आमच्यांतल्या एक दोन गोष्टी मुलखाविरुद्ध असणाऱ्या सांगतां येतील. त्या आम्हांस सांगण्याची मोठी भीति वाटते,—त्या शाकभोजित्व व मद्यनिषेध होत. यांची तरी वासलात करणारे साहेबच मुकत्यार आहेत.

---

१ कालिदास—पृष्ठें १७–२०; भवभूति—पृष्ठें १०९–११०; भवभूति—पृष्ठें ८९–९१.

हॉल् साहेबांनीं सुबंधूविषयीं जे अभिप्राय दिले आहेत त्यांत दुसरा हाही मोठा दोष आहे कीं, ते सारे एकपक्षी आहेत. त्यांची दृष्टि दोषांविषयीं जशी सूक्ष्म आहे तशी त्यांतील गुणांविषयीं तादृश नाहीं. त्याच्या दोषांचें विवेचन साहेबांनीं मोठ्या आनंदानें सविस्तर केलें आहे. कवित्वाचा व भूगोलज्ञानाचा नित्यसंबंध नाहीं म्हणून शेक्सपीयर कवीचे कैवारी भांडत असतां बिचाऱ्या सुबंधूचा त्या अज्ञानाबद्दल उपहास करण्याची संधि साहेबांनीं फुकट दवडली नाहीं. एके ठिकाणीं तर त्याची विनाकारण थट्टा केली आहे. कंदर्पकेतूनें वासवदत्तेस पहिल्यानें पाहिलें त्या वेळेचें तिचें वर्णन कविसंप्रदायाप्रमाणें सुबंधूनें पायांपासून मस्तकापर्यंत केलें आहे. येथें हॉल् साहेब टिपेंत लिहितात, " वाचकहो ! ध्यानांत धरा, कंदर्पकेतूचें मन वासवदत्तेस पाहतां अगोदर अत्यंत कशानें मोहलें ? तर तिच्या पायांनीं, वाः ! " पण त्याच्या प्रशंसेचे जागोजागचे विरल शब्द सारे जर एके ठिकाणीं केले, तर त्यांनीं तीन चार ओळी भरल्या तर पराकाष्ठा. सुबंधूच्या कैवारानें ज्या कित्येक गोष्टी आम्हीं कळविल्या आहेत त्या तर हॉल्-साहेबांनीं लक्षांत सुद्धां आणल्या नसतील. त्यांनीं अंमळ विशेष प्रशंसा काय ती सिंहवर्णनपर वरील दोन श्लोकांचीच केली आहे; बाकीच्या ठिकाणीं सुबंधूसारख्या अप्रयोजक कवीची प्रशंसा करण्याचा त्यांस मोठा संकोच वाटलासा दिसतो. बाह्यरचनेची तर गोष्टही नको. श्लेष, प्रास, हीं तर अर्थात् सर्वथा निंद्यच. पण पदरचनेंतील मधुरतादि गुणही असले नसले तरी सारखेच; त्यांत त्यांस फारसें हांशील दिसलें नाहीं. साराश, डाक्टर हॉल् साहेबांनीं ' वासवदत्ते'चें प्रकाशन करण्याचें काम जें हातीं घेतलें तें केवळ त्या ग्रंथाची दुर्दशा करून आपणास कीर्ति मिळवावी व आपल्या युरोपियन वाचकांनीं विनोदानें करमणूक करावी, हाच आम्हांस त्यांचा मुख्य उद्देश दिसतो !

असो. आतां हा लेख पुरा करतों; व शेवटीं आमच्या डाक्टर-साहेबांस सलाम करून आमच्या कवीचा निरोप घेतों.

---

# दंडी.

कविर्दंडी कविर्दंडी कविर्दंडी न संशयः ।[1]

या कवीच्या नांवानें दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत;—एक ' दशकुमारचरित ' व दुसरा ' काव्यादर्श '. ' काव्यादर्श ' हा ग्रंथ फारसा मोठा नसून त्यांतील विषय साहित्यशास्त्राचा आहे. त्याचा प्रचार अद्याप विरळच असल्यामुळें त्याच्या गैरमाहितीस्तव आम्हांस येथें त्याच्या संबंधें कांहींच लिहवत नाहीं. एका पक्षीं या ग्रंथाचा प्रस्तुत काव्यविवेचक निबंधाशीं फारसा संबंधही नाहीं हें खरें; तथापि दंडीच्या काळाचा निर्णय करण्यास व त्याच्या कवित्वगुणाचें स्वरूप विशेषतः स्पष्ट होण्यास तो बराच उपयोगीं पडता असें वाटतें. असो. आतां ' दशकुमारचरिता'विषयींच विचार करूं.

या ग्रंथाची इंग्रजी आवृत्ति प्रोफेसर विलसन् साहेबांनीं सुमारें तीस वर्षांपूर्वी काढली आहे. तीच बहुधा कोठें कोठें उपलब्ध आहे. तिच्या प्रस्तावनेंत त्या विद्वान् पंडितानें ग्रंथकर्त्याच्या कालाविषयीं वगैरे बराच मजकूर लिहिला आहे; पण तो मागच्या हॉल् साहेबांप्रमाणें मोठ्या आस्थेनें लिहिलासा दिसत नाहीं. हा प्रकार पुढें जें आम्ही लिहूं त्यावरून स्पष्ट होईल. तरी वरील साहेबांच्या येवढ्या परिश्रमाबद्दल तरी त्यांचे आभार मानणें अवश्य होय.

दंडीविषयीं खरी हकीकत म्हटली म्हणजे कालिदासाच्या इतकीच लोकांस माहीत आहे. म्हणजे दोघांच्या नांवाखेरीज दुसरी कोणतीही गोष्ट खात्रीनें सांगण्यासारखी नाहीं. तरी दंतकथांतून दंडीचें नांव कालिदास, भवभूति यांच्या बरोबरीनें आढळतें, यावरून निदान येवढें तरी सिद्ध होतें कीं, हा कवि फार लोकमान्य झाला असावा. ' कविचरित्रां'त या कवीच्या दोन तीन गोष्टी लिहिल्या

---

१ "कवि असा दंडीच. कवि असा दंडीच, कवि असा दंडीच, यांत संदेह नाहीं !"

आहेत त्या पंडितप्रसिद्ध आहेत. त्यांतील दोन चमत्कारिक आहेत म्हणून येथें लिहितों.

एके समयीं सरस्वती सुंदर तरुण स्त्रीचें रूप धरून एका मोठ्या रस्त्यावर कंदुकक्रीडा करीत प्रगट झाली. तेव्हां तिजकडे पाहून दंडी[1] म्हणाला;—

एकोऽपि त्रय इव भाति कंदुकोऽयं
कांतायाः करतलरागरक्तरक्तः।
भूमौ तच्चरणनखांशुगौरगौरः
खस्थः सन्नयनमरीचिनीलनीलः॥

" हा चेंडू एक असतांही तीन ठिकाणीं तीन प्रकारचा भासतो.— जेव्हां हाताजवळ येतो, तेव्हां त्याच्या तांबड्या प्रभेंत अत्यंत रक्त; भूमीवर क्षणमात्र असतो, तों हिच्या नखांच्या पाटल प्रभेंत अत्यंत गौर; आणि मधें असतो तोंपर्यंत हिच्या डोळ्यांच्या प्रभेनें अत्यंत नील असा दिसतो ! "

भवभूति म्हणालाः—

विदितं ननु कंदुक ते हृदयं
प्रमदाधरसंगमलुब्ध इव ।
वनिताकरतामरसाभिहतः
पतितः पतितः पुनरुत्पतसि ॥[2]

---

१ 'भोजप्रबंधा'त हा श्लोक वररुचि नामक कवीच्या नांवानें लिहिला आहे; तसेंच पुढील दोन श्लोकांच्या कर्तृत्वाच्या संबंधानें या ग्रंथांत व 'कविचरित्रां'त नामव्यत्यास (नांवांची अदलाबदल) ही दिसून येईल. दंतकथा म्हटली म्हणजे असा विसंगतत्वाचा प्रकार आलाच !

२ हा श्लोक तिहींत उत्कृष्ट होय. पण त्यांत दुसरी ही जी एक मजा आहे ती सहज लक्षांत येणार नाहीं. पदांतील अर्थाचा पदाच्या नुसत्या उच्चारानेंच मनास भास व्हावा अशी कवि प्रसंगविशेषीं खुबी करीत असतात. याविषयीं पोप कवीनें म्हटलें आहे—

[ पुढें चालू. ]

" हे कंदुका ! तुझा अभिप्राय मीं ताडला. या प्रमदेच्या अधरोष्ठास आपण लागावें ( चुंबन करावें ) हा लोभ मनांत धरून ती तुला आपल्या करकमलानें वारंवार खालीं आपटीत असतांही तूं पुनः पुनः वर उडतोस ! "

कालिदास म्हणाला—

पयोधराकारधरो हि कंदुकः
करेण रोषादभिहन्यते मुहुः ।
इतीव नेत्राकृतिभीतमुत्पलं
स्त्रियः प्रसादाय पपात पादयोः ॥

" ह्या चेंडूनें हिच्या स्तनाचा आकार धारण केला म्हणून त्यास ही रागानें खालीं आपटते आहे; व यास्तव ( तिच्या शिरींच्या ) कमलास ही आपण डोळ्यांची शोभा चोरल्याबद्दल मोठा धाक वाटून तें तिच्या पायीं पडलें आहे काय असें वाटतें ! "

वरील तीन्ही श्लोक महाकवींच्या कवित्वास कल्पनेच्या व रचनेच्या दोहों संबंधानें साजण्यासारखे आहेत. पण अशा प्रसंगीं दुसरी एक मोठी खुबी त्यांत दिसून यावी, ती यांत नाहीं. ती ही कीं, प्रत्येकांत एकेकाचे कवित्वविशेष स्पष्ट दिसून यावे.

दुसरी अशी आख्यायिका आहे कीं, दंडी व कालिदास यांची एकदा स्पर्धा लागली असतां देवी प्रगट होऊन म्हणाली, " कवि-

---

'Tis not enough no harshness give offence,
The sound must seem an echo to the sense.
Essay on Criticism.

" वर्णांच्या कठोरपणानें कवितेस कर्णकटुत्व येऊं नये इतकेंच पुरें नाहीं; तर तिची रचना अशी केली असावी कीं, पदांचा उच्चार त्यांतील अर्थाचा प्रतिध्वनि भासावा. " या नियमाचें वरील पद्य उत्कृष्ट उदाहरण होय. कंदुकक्रीडेची लीला वर्ण्य असल्यामुळे तोटकछंदाची योजना प्रस्तुत प्रसंगीं फारच समर्पक झाली आहे. एकंदर पद्याच्या म्हणण्यावरूनच त्या क्रीडेचा भास होतो; व शेवटल्या चरणांत तर कठोर वर्णांची गर्दी असल्यामुळें प्रत्येक यतीच्या शेवटीं चेंडू टप्—टप् असा आपटून उसळी आल्याचा कर्णास साक्षात्कार होतो ! !

दंडी कविर्दंडी कविर्दंडी न संशयः " ( कवि असा दंडीच, यांत संशय नाहीं. ) तेव्हां कालिदासानें रागावून विचारलें, " * * * * ? " *[1] ( — मग मी कोण ? ). त्यावर देवीनें उत्तर दिलें, " त्वमेवाहं न संशयः " ( तूं तर मीच--म्हणजे तूं आणि मी दोन नाहीं ! )

याच गोष्टीस अनुलक्षून आम्हीं मागें[2] लिहिले होतें कीं, ती फार ग्राम्य आहे. तरी तींतील अर्थ महत्त्वाचा व खुबीदार वाटल्यावरून ती येथें सांगितली आहे. वाग्देवीची कृपा सरून तिजबरोबरच मनाचा नाजुकपणा इत्यादि गुणांचा या देशांत जेव्हां अस्त झाला त्या काळींच वरील श्लोकाचा प्रादुर्भाव झाला असावा हें त्यांच्या रचनेवरून साफ दिसतें. आतां त्यांत अर्थगौरव पुष्कळ आहे खरें, पण त्याबद्दल वरील पद्य रचणारास मान देण्यापेक्षां आपलें नशीब चांगलें हेंच म्हणणें जास्त वाजवी आहे !

वरील दोन्ही आख्यायिका केवळ मनोरंजक म्हणूनच आम्हीं दिल्या आहेत हें येथें पुनः सांगणें नकोच. तेव्हां बाह्यप्रमाणाच्या एका अंगाचा--म्हणजे दंतकथांचा—तर निकाल झालाच;--कीं त्यांवरून दंडीच्या काळाचें अनुमान करण्यास अगदीं जागा नाहीं. तसेंच दुसरें अंग जें इतर ग्रंथकारांचा लेख तोही प्रस्तुत प्रसंगास अनुकूल नाहीं. तेव्हां आपल्या कवीच्या काळाचा शोध करण्यास अंतःप्रमाण हेंच एक साधन राहिलें. हें प्रमाण विलसन् साहेबांनीं दोन गोष्टींवरून धरलें आहे. एक गोष्ट ही कीं, सांप्रत कथेंत यवनांचा[3] (मुसलमानांचा)

---

१ गाळलेले शब्द लिहिण्यास फार शरम वाटते--ते असे आहेत:- ( " अहं रंडे ? अहं रंडे ? ".

२ भवभूति--पृष्ठ ६२.

३ ' यवन ' शब्दाचा अर्थ वर कंसांत जो दिला आहे तो एकच आहे असें नाहीं. तो विलसन् साहेबांनीं आपल्या अनुमानास अनुकूल म्हणूनच घेतला आहे. भाषाशास्त्रवेत्त्यांच्या मतें ' यवन ' हा शब्द Ionian ( ऐऑनियन् ) शब्दावरून निघाला आहे. हें कसेंही

[ पुढें चालू ]

संबंध एक दोन ठिकाणीं मात्र किंचित् आला आहे; त्यावरून ते व्यापारी किंवा यांचे येवढ्याच संबंधानें त्या वेळेस हिंदूंस माहीत होते असें दिसतें. तसेंच प्रस्तुत कथांवरून हिंदु लोकांचे जे रीतरिवाज दिसतात, व जी राज्यस्थिति दिसून येते, त्यावरून देखील 'दशकुमारचरित' हें मुसलमानांची सत्ता या देशांत होऊं लागल्याच्या-- म्हणजे सुमारें इ० स० १००० या वर्षांच्या---पूर्वीं लिहिलें असावें असाच अजमास होतो. दुसरी गोष्ट अशी कीं, या ग्रंथाच्या शेवटल्या ( आठव्या ) उच्छ्वासांत भोजवंशाविषयीं उल्लेख आहे. त्यावरून विलसन् साहेब म्हणतात कीं, भोजराजा दहाव्या शतकाच्या शेवटीं झाला असल्यामुळें प्रस्तुत ग्रंथ त्या काळाच्या पुढें लिहिला असावा.

---

असो, पण येवढें खास आहे कीं, यवनांचा उल्लेख हिंदु ग्रंथांतून फार प्राचीन कालापासून केलेला आढळतो. महाभारतांत वर्णिलेल्या युद्धांत कित्येक यवन दुर्योधनाचे अंकित होते असें लिहिलें आहे; पांडवांस लाक्षागृहांत जाळण्याच्या कामास त्यानें पुरोचननामक यवनास योजलें होतें हें तर जगद्विश्रुत आहे. शिकंदर बादशहाच्या वेळेस घडलेला वृत्तांत ज्यांत कार्यभाग झाला आहे त्या 'मुद्राराक्षस' नाटकांत तर त्यांचा संबंध स्पष्टच आहे. त्यावरून पाहतां असें वाटतें कीं, प्रस्तुत शब्द ग्रीक लोकांसही लावीत असतील. तेव्हां 'यवन' शब्दावरून 'दशकुमारचरिता' च्या काळाचें अनुमान न होतां, 'दशकुमारचरिता' च्या काळावरून मात्र 'यवन' शब्दाचा अर्थ कोणता याचा तर्क करतां येईल! मुसलमानांचा उदय मुळींच इसवी शकाच्या सातव्या शतकांत झाला; तेव्हां अलीकडे या देशांत 'यवन' नांवानें तेच प्रसिद्ध आहेत हें ठीकच आहे. पण पूर्वींच्या---म्हणजे सातव्या आठव्या शतकाच्या आधींच्या---ग्रंथांत तो अर्थ घेतां येत नाहीं हें उघड आहे. यास्तव आम्हांस असें वाटतें कीं, जसा कालिदासाच्या 'रघुवंशां' त पारसीक ( पारशी ), हूण ( Huns ? ) या म्लेच्छ जातींचा उल्लेख आहे, व 'कादंबरी' त इंद्रायुधनांवाचा घोडा पारसीकांच्या राजानें नजर केला असें लिहिलें आहे; त्याचप्रमाणें सदहु ग्रंथांतील 'यवन' शब्दानें मुसलमान न घेतां वरचे किंवा तसेच दुसरे कोणी लोक घेतले पाहिजेत. या गोष्टीचें स्पष्टीकरण दंडीच्या काळाविषयीं जें पुढें लिहूं त्यावरूनही होईल.

याप्रमाणें वरील दोन्हीं आधारांवरून हे साहेब असा निर्णय देतात कीं 'दशकुमारचरित' ग्रंथ अकराव्या शतकाच्या शेवटीं, अगर बारा व्याच्या आरंभीं रचिला असावा असे मानण्यास हरकत नाहीं.

प्रस्तुत कवीच्या काळाचा सुमार करण्यास वर जीं प्रमाणें दाखविलीं आहेत त्यांविषयीं वाद करण्यास पुष्कळच जागा आहे. त्यांवरून एकंदर अनुमान इतकें मात्र करता येईल कीं, मुसलमान हिंदुस्थानांत आल्यापूर्वी---म्हणजे सुमारें इ० स० १००० या पूर्वी--हा ग्रंथ लिहिला. पण येवढ्यावरून दंडी अमुकच शतकांत झाला असें म्हणण्यास आधार कोणता ? विलसन् साहेबांचा मोठा आधार पूर्वोक्त भोजवंशाचा उल्लेख होय. पण भोजराजाच्या नुसत्या नावावरून काय सिद्ध होणार ? त्या नांवाचे प्रख्यात राजे अनेक होऊन गेले असें कित्येक ग्रंथावरूनें दिसतें. फार तर काय, पण महाभारतांतही एक भोजवंश अत्यंत प्रसिद्ध आहे; पांडवांची आई कुंती ही त्या वंशांतील होती. तेव्हा दंतकथांतून प्रसिद्ध जो भोजराजा तोच हा वरचा असेल असें म्हणण्यास आधार काय ? शिवाय, भोजराजाचा तरी शक कोणास माहीत आहे ? विलसन् साहेब तो अकराव्या शतकांत झाला असें खात्रीनें लिहितात; पण त्याविषयीं त्यांनीं प्रमाण म्हणून कांहींच दाखविलें नाहीं हें एक झालें. दुसरें प्रमाण यवनांचा उल्लेख. त्याविषयीं वर एका टिपेंत आम्हीं बराच विस्तार केला आहे. त्यावरून दिसून येईल कीं, या उल्लेखावरून मोठेंसें कांहीं ठरत नाहीं. 'यवन' शब्द हिंदुस्थानाशेजारच्या पारसीक, ग्रीक वगैरे लोकांसही आपले पूर्वज लावीत असल्यामुळें त्या शब्दानें मुसलमान न घेतले तरी कांहीं बाध येत नाहीं. याप्रमाणें वरील दोन्ही प्रमाणें दुर्बळ आहेत. बरें, दंडी भोजराजाच्याच वेळेस होता याला तरी आधार काय ? अर्थात् नुसता 'भोजप्रबंध' या ग्रंथास ऐतिहासिक मानून संस्कृत कवींच्या काळाविषयींचीं वगैरे अनुमानें त्याच्या उल्लेखांवरू-

---

१ हॉल् साहेबांची 'वासवदत्ते'ची आवृत्ति---इंग्रेजी प्रस्तावना, पृष्ठ १ टीप पहिली.

बांधणें म्हणजे ' आरबी भाषेतील गोष्टी ' वरून इतिहास रचूं पाहण्यासारखें होय. या ग्रंथाचा कर्ता बल्लालमिश्र हा नांवावरून व लिहिण्याच्या पद्धतीवरून तर फार अर्वाचीन दिसतो. त्यानें केवळ ऐकीव दंतकथा एकत्र करून हा प्रबंध बांधला हे अगदीं उघड दिसतें. संस्कृत भाषेत अगदी पूर्वीपासून जे नामांकित कवि झाले ते सारे झाडून यानें आपल्या ग्रंथांत आणले आहेत. कालिदास, भवभूति, सुबंधु, बाण, बाणपुत्र, दंडी, माघ, भारवि इत्यादि सर्वांस एकाच मालिकेंत ओंवून शिवाय मदन, विनायक, कोकिल वगैरे खऱ्या किंवा खोट्या कवींसही बल्लालमिश्रानें आपल्या प्रबंधांत सामील केलें आहे. अशा ग्रंथांचा उद्देश केवळ मनोरंजन करण्याचा; त्यांत तथ्य पाहूं जाणें अगदीं व्यर्थ होय. यास्तवन विलसन् साहेबांसारख्या पंडितानें तशाचा लेख मोठा प्रमाणभूत मानला हें मोठेंच आश्चर्य होय !

याप्रमाणें विलसन् साहेबांच्या निर्णयास दुर्बलता आणणारे कित्येक आक्षेप वर सांगितले. आतां दंडीच्या काळाविषयीं आमचें जें मत आहे तें प्रगट करतों.

वर लिहिण्यांत आलेंच आहे कीं, दंडीच्या काळाचा निर्णय करण्यास अंतःप्रमाणच काय तें साधन आहे. हें जरी असावें तसें स्पष्ट नाहीं, तरी त्यावरून आपल्या कवीच्या काळाचा सुमार बराच करतां येईल यांत अगदीं संशय नाहीं. मागील दोन कवींच्या वर्णनांत दंडी हा त्यांच्याच वर्गातला कवि होय असें अनेक वेळां आम्ही लिहून चुकलों आहों; पण ती चुकी होय असें आम्हांस आतां खास वाटतें. संस्कृत भाषेत गद्यरूप काव्यग्रंथ ' कादंबरी ' ' वासवदत्ता ' व ' दशकुमारचरित ' हे तीनच असल्यामुळे हे तिघे कवि काल, कवित्वगुण इत्यादिकांनीं समान असावे असा सहजाकृच्या भ्रम होतो. पूर्वीच्या दोघांच्या संबंधें सहजरीत्या खरा आहे; पण दंडीच्या प्रस्तुत ग्रंथावरून पाहतां तो सुबंधु व बाण यांच्या वेळेस झाला असेल असें मुळींच दिसत नाहीं. हें दोहोंची पदरचना जो क्षणभर पाहील त्यासही सहज दिसणारें आहे. दुसऱ्या दोहोंच्या ग्रंथांत जसे दीर्घ

समास, साधे व विरोधाभासात्मक श्लेष, वर्णमार्दव वगैरे कृत्रिमतेचे प्रकार मुद्दाम आणले आहेत, तसें पाहिल्याच्यांत मुळींच नसून कालिदासवर्गीय कवींच्याप्रमाणें अर्थांत व पदरचनेंत प्राय: साधेपणा आहे. तसेंच प्रस्तुत ग्रंथास मागील दोहोंप्रमाणें ' काव्य ' ही संज्ञाही सर्वथा लागणार नाहीं. त्याची अर्थरचना जागोजाग कवितेसारखी आहे खरी; पण त्याच्या कर्त्याचा उद्देश सुबंधु व बाण यांप्रमाणें गद्यरूप काव्य लिहिण्याचा सर्वथा नव्हता. तर पदलालित्यविशिष्ट अशा गद्यप्रबंधाचा उत्कृष्ट मासला दाखवावा इतकाच होय. शिवाय मागील दोन्ही ग्रंथांप्रमाणें ' दशकुमारचरित ' हें ' कादंबरी ' या सदराखालींही केवळ मोडणार नाहीं. एक तर यांत एकच सबंध कथा नसून अनेक निरनिराळ्या एके ठिकाणीं केल्या आहेत म्हणून; व दुसरें, यांत एकादा कोणता रस प्रधान धरून त्याचा क्रमाक्रमानें पोषही केला नाहीं. सारांश, प्रकृत ग्रंथ पूर्वोक्त दोन कादंबऱ्यांच्या वर्गांतला नसून ' पंचतंत्र, ' ' हितोपदेश ' वगैरे ग्रंथांच्याच तऱ्हेचा आहे. भेद इतकाच कीं, वरचे दोन्ही ग्रंथ जसे मुळीं बालरंजनार्थ केले असल्यामुळें त्यांची रचना बाळबोध व हलक्या प्रतीची आहे, तसे ' दशकुमारचरिता ' चें नसून त्याची रचना प्रगल्भ आहे. तेव्हां पूर्वोक्त दोन कवींच्या ग्रंथांहून सांप्रत ग्रंथ इतक्या निरनिराळ्या प्रकारांनीं भिन्न असतां तो त्यांच्याच वेळेस रचिला असेल हें अगदीं संभवत नाहीं, तर तो त्यांच्या अगोदर रचिला असावा हें त्याच्या अकृत्रिम रचनेवरून साफ दिसतें. विलसन् साहेबांनींही स्वत: आपल्या प्रस्तावनेंत एके ठिकाणीं असाच अभिप्राय दर्शविला आहे. ते लिहितात—' खरोखर पाहिलें तर, या ग्रंथांत देशविभाग व रीतरिवाज हे मूळचे हिंदूंचे जसे होते तसेच दाखविले असल्यामुळें, व याची पदरचनाही भवभूतीच्या ग्रंथांहून अधिक कृत्रिम नाहीं, यास्तव दंडीचा काल जितका सांगितला आहे ( इ० स० अकरावें शतक ) त्याहून तो

---

१ पूर्वीचा ( बाणभट्ट–पृष्ठें १२२–३ ) उल्लेख दंडीच्या मात्र संबंधानें बरोबर नाहीं हें येथें सांगितलें पाहिजे.

पुष्कळ.कमी मानिला असतां चालता; पण या तर्कास दंतकथा जुळत नाहीं. " यावरून ग्रंथाच्या एकंदर रचनेवरूनही जे धडधडीत स्पष्ट प्रमाण सांपडतें तें टाकून देऊन दंतकथेचें प्रायः शुष्क असणारें प्रमाण विशेष निश्चित मानण्याकडे साहेबांचा मोठा रोंख दिसतो! पण त्या दंतकथेस व तीवर बसविलेल्या अनुमानांस तरी कितपत आधार आहे हें वर सांगण्यांत आलेंच आहे. असो; तेव्हां दंडी हा सुबंधु व बाण यांच्या अगोदर झाला असावा असें मानणें विशेष समंजस दिसतें.

पण इतकेंच नव्हे. 'दशकुमारचरितां' तील दुसऱ्या कित्येक गोष्टींवरून पाहतां दंडी हा भवभूतीच्या वेळेस, किंबहुना त्याच्या अगोदर, झाला असावा असें दिसून येतें. या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं बौद्धांचा उल्लेख आहे,-तसा मागें कालिदासाच्याही ग्रंथांत नाहीं व पुढील सुबंधु व बाण यांच्याही ग्रंथांत बिलकुल नाहीं. तो मागें सांगितल्याप्रमाणें भवभूतीच्या मात्र एका ग्रंथांत ('मालतीमाधवां' त ) आहे. हें दंडी व भवभूति यांच्या समकालीनत्वाचें एक प्रमाण. दुसरें कामंदकि, चाणक्य इत्यादिकांनीं उपदेशिलेल्या कुटिल नीतीचा सार्वत्रिक प्रचार. ही कुटिल नीति[1] सांप्रत कथेंतील बहुतेक

---

१ लबाडास लबाडीनें जिंकणें रास्त आहे; उद्देश लोकहिताचा वगैरे चांगला असल्यास असदुपायांचेंही अवलंबन निंद्य नाहीं; असे समज अगदीं आलीकडेपर्यंत सुधारलेले म्हणविणाऱ्या लोकांचेही होते. रामायणात वालीचा व भारतांत कर्णदुर्योधनादिकांचा वध, 'मुद्राराक्षसां' त चाणक्यानें व राक्षसानें आपआपले स्वार्थ साधण्याकरितां केलेले नानाविध मारणप्रयोग, इतिहासांत अफझुलखानाचा अपघात, नानासाहेब पेशव्यानें शाहूच्या बायकोशीं केलेलें कृत्रिम, क्लैव् साहेबाचें ओमींचंदाच्या हातावर तुरी देणें, हीं सर्व वरील समजुतीचीं उदाहरणें होत. अशा मताचें ग्रंथरूपानें प्रणयन युरोपांत म्याकिवेल्लनामक एका इटालियन प्रधानानें केलं, व आपल्या देशांत प्राचीन काळीं चाणक्यानें केलें. याचेंच नांव त्याच्या आचरणावरून कौटिल्य असेंही पडलें होतें.

राजपुत्रांनीं आचरली आहे. त्यांच्या शिक्षणप्रकाराचें सविस्तर वर्णन[1] दिलें आहे त्यांतच मुळीं चौर्यादि कर्मे विहित म्हणून सांगितलीं आहेत. थोरमनाच्या मनुष्यास जात्याच आर्जव म्हणजे सरळपणा आवडत असतो. केवढाही मोठा स्वार्थ साधत असल्यास कुटिल उपायाचें अवलंबन त्याच्यानें सहसा होतच नाहीं. पण प्रस्तुत कथेंतील कुमार तर सर्व गुणांनीं व सर्व विद्यांहीं संपन्न असे दाखविले असून चोरांची व मारेकऱ्यांची कृति त्यांजकडून सहज म्हणून करविली आहे; व हीं घोर कृत्यें निंद्यशीं दाखविलीं नाहींत इतकेंच नव्हे, तर तीं ज्याचीं त्यास आत्मश्लाघाविषय होऊन बाकीच्यांस प्रशंसास्पदही झालीं आहेत. असो; तसाच कांहीं प्रकार ' मालतीमाधवां ' त आहे. आमचा रोख माधवानें अघोरघंटाचा वध केला त्यावर नाहीं. कां कीं, तें कृत्य गुप्तपणें वगैरे न होऊन त्या दुष्टास त्याच्या घोर संकल्पाबद्दल यथायोग्य शासन झालें. पण कामंदकीनें नंदनास फसविण्यास जी हिकमत केली ती ऋजुस्वभाव मनुष्यास खरोखर योग्य वाटणार नाहीं. तशा कौटिल्याच्या योगानें नाटकांतील नायकाचा व नायिकेचा समागम कवीनें घडवून आणविला आहे या गोष्टीचें सर्व वाचकांस खरोखर वाईट वाटत असेल ! हा नीतीचा[2] प्रकार त्या काळाचा दर्शक होय हे उघड आहे. यास्तव त्यावरूनही **दंडी** व **भवभूति** यांचें समकालीनत्व मानण्यास पुष्कळच आधार आहे. असो; पण येथेही आपल्या थोर व कोमलमनाच्या पूर्ववर्णित कवीची पुनः एका गोष्टी

---

१ **विलसन्** साहेबांची आवृत्ति–पृष्ठ १६–१७ ' कादंबरीं ' तही राजपुत्राच्या विद्याभ्यासाचें वर्णन आहे ( संवत् १९०६ ची आवृत्ति पृष्ठ ६७ ). **दंडी** आणि **बाणभट्ट** एका काळीं नव्हते याचे हा भेदही एक प्रमाण होईल.

२ या शब्दाचा मूळचा संस्कृत अर्थ मराठी अर्थापेक्षां फार भिन्न आहे. मराठींत ' नीति ' म्हणजे ' साधुत्व ' होय. पण संस्कृतांत या शब्दाचा अर्थ ' लोकांत वागण्याची दक्षता ' ' धूर्तत्व ', ' कौटिल्य ' असाच आहे. हें ' मुद्राराक्षस ', ' मालतीमाधव ' इत्यादि ग्रंथावरून दिसून येईल.

द्दल प्रशंसा केल्यांवांचून आमच्यानें पुढें जांववत नाहीं. ती येवढ्या-द्दल कीं, त्यानें ' मालतीमाधवां ' त आपल्या काळचीच स्थिति खली असतांही तींत जेवढें म्हणून मनास उद्वेग करणारें होतें तेवढें मगदीं काढून टाकून त्या जागीं चांगल्याचीच योजना केली आहे. हा प्रकार ' दशकुमारचरित ' व ' मालतीमाधव ' हीं परस्पर ताडून पाहिलीं असता तेव्हांच लक्षांत येईल. वरील नाटकांतील माधव हा दंडीनें आपल्या कुमारांत घातला असता तर खुशाल चालता; कारण दोघांच्या अंगीं पराक्रम, चातुर्य वगैरे गुण दाखवून दोघांचाही शृंगार वर्णिला आहे. दोघांच्याही हातून परघात घडले आहेत. पण दंडीच्या कुमारांचे खून वाचून त्यांची राजवाहनाप्रमाणें[1] प्रशंसा करणें तर दूरच, पण सर्व सहृदय वाचक खरोखर त्यांच्या खुशालपणें केलेल्या क्रूरतेबद्दल त्यांचा तिटकारा व त्रासच करतील. पण अघोरघंटाचा व माधवाचा युद्धप्रसंग वाचून वरील वृत्ति कोणाच्या मनांत कधीं उभ्य राहिल्या आहेत ? तो प्रसंगच असा चमत्कारिक रीतीनें आणला आहे कीं, माधवाच्या हृदयांत त्या विलक्षण प्रसंगीं ज्या क्रोधकारुण्यादि[2] वृत्ति एकदम उठल्या त्याच सहृदय वाचकांच्याही अंतःकरणांत उद्भव-तात. तसेंच प्रस्तुत कुमारांच्या अंगीं एका दांडगेपणापेक्षां दुसरे गुण कोणते दाखविले आहेत ? धर्मविषयीं तर साधारण पूज्यत्वबुद्धीही त्यांच्या अंगीं वसत नाहीं. गणपति, देवी इत्यादि देवतांवर लोकांची

---

१ राजवाहनास बाकीच्या कुमारांनीं आपआपणास घडलेले प्रसंग निवेदन केले आहेत त्यानें अर्थातच आपल्या प्रत्येक मित्राची तारीफ केली आहे. उपहारवर्म्याचीं श्लाघ्य कर्में ऐकल्यावर संतुष्ट होत्साता राजवाहन हंसून म्हणतोः--" पहा ! जारकर्म व कपट हीं दोन्ही आचरलीं असतांही त्यांच्या योगानें धर्म व अर्थ यांचीच यास प्राप्ति झाली !--कारण त्या कर्मांच्यामुळें यानें आईबाप बंदीपासून सोडविले. दुष्ट शत्रूचा नाश केला, व राज्य मिळविलें. तेव्हां बुद्धिमान् पुरुष जें जें करतात तें शोभाच पावतें ! " वरील लाडक्या शब्दांनीं आमच्या वाचकांपैकीं कोणी राजवाहनाच्या मित्रास गोंजारील काय ?

२ भवभूति--पृष्ठ ९६

श्रद्धा असल्यामुळें त्यांच्या नांवानें त्यांनीं लोकांस फसविलें आहे असा अधर्माचा प्रकारही भवभूतीच्या ग्रंथांत कोठें नाहीं. ' दशकुमारचरितां ' त बौद्धधर्मी स्त्रियांकडून कुट्टिनीकर्म करविलें आहे; हेंही त्या काळाचें दर्शकच असावें पण ' मालतीमाधवां ' त तशाच नाजूक कामावर बौद्ध स्त्रिया योजल्या असून त्यांचा स्वभाव किती उत्कृष्ट दाखविला आहे ! कामंदकी,[1] अवलोकिता, बुद्धरक्षिता या सर्वांचे गुण किती उत्कृष्ट दाखविले आहेत ! विशेषतः कामंदकी तर किती परोपकारी, किती चतुर, किती मायाळू दाखविली आहे ! असो; आतां वरील प्रतिपाद्य गोष्टीचें तिसरें एक प्रमाण सांगतों. तें तर वरील दोहोंहूनही विशेष निश्चायक आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या सातव्या उच्छ्वासांत मंत्रगुप्ताचें चरित्र वर्णिलें आहे त्याचा सारांश येणेंप्रमाणें:—तो राजवाहनास सांगतो, " मी कलिंगदेशीं पोंचलों; व तेथें एका तलावाच्या कांठीं निजलों. तेथे झाडांची गर्दी असून पलीकडे स्मशान होतें. मला झोंप लागली असतां शेजारच्या दोन पिशाचांच्या बोलण्यानें मी जागा झालों. तीं त्या स्मशानांत राहणाऱ्या एका सिद्धाविषयीं बोलत होतीं. नंतर तें सर्व आहे काय हें पाहण्याच्या उद्देशानें मी त्यांच्या मागोमाग गेलों तों कपालांच्या ( माणसांच्या डोक्याच्या कंवट्यांच्या ) माळा घातलेला, सर्वांगास भस्म फांसलेला तो सिद्ध अग्नींत तीळ टाकतो आहे असें मीं पाहिलें. मग त्याच्या आज्ञेवरून कलिंगराजाची कन्या कर्णलेखा त्याच्या शिष्यांनीं आणून उभी केली. नंतर ती रडत असतां तिजवर तो घाव घालणार इतक्यांत मी पुढें सरसावून त्या सिद्धाचा वध केला.—" हें वाचतांच ' मालतीमाधवा ' च्या पांचव्या

---

१ हें नांव कामंदकिनामक नीतिकाराच्या नांवावरून तिला कवीनें ठेविलें असावें. ती देवरात व भूरिवसु यांबरोबर नीतिशास्त्र पढली असून माधवासही देवरातानें पद्मावतीनगरास तेंच शास्त्र शिकण्यास पाठविलें होतें. यावरून या शास्त्राचा अभ्यास भवभूतीच्या काळात विशेष चालू होता असा तर्क होतो. वरील दंडीच्या काळाविषयींच्या प्रमाणास ही गोष्ट बळकटी आणण्यासारखी आहे.

अंकांतील स्मशान, पिशाचें, अघोरघंट, मालती व माधव यांची ओळख कोणास पटत नाहीं ?

याप्रमाणें दंडीच्या काळाविषयीं जीं प्रमाणें आमच्या आढळण्यांत आलीं तीं सर्व सांगितलीं. वरील तीन अंतःप्रमाणांवरून दंडी भवभूतीच्या नुकताच अगोदर झाला असावा, किंवा त्याशीं समकालीन असावा असें म्हणण्यास कांहीं बाध नाहीं असें दिसेल. आतां या मतास एक मात्र विरोध दिसतो. तो हा कीं, बाणभट्टाच्या ' हर्षचरितां'तील पूर्वोक्त उताऱ्यांत दंडीचें नांव नाहीं. पण तसेंच भवभूतीचेंही नाहीं, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. तेव्हां या विरोधाचें महत्त्व फारसें मानण्याची गरज नाहीं हें सांगणें नको.

वर प्रस्तुत कवीच्या काळाविषयीं विचार झाला. आतां त्याचा अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ 'दशकुमारचरित' त्याविषयीं लिहितों.

हें लिहिण्याच्या अगोदर एका दुसऱ्या गोष्टीविषयीं कांहीं लिहिणें अवश्य होय. तें आपल्या कवीच्या नांवाच्या संबंधानें. विल्सन् साहेब आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं, प्रस्तुत कवीचे नांवही कदाचित् त्याच्या काळाचें दर्शक असेल. तें असें, 'दंडी' या शब्दाचा अर्थ 'दंड धारण करणारा' असा आहे. यावरून असें वाटतें कीं, आपला कवि शंकराचार्यांच्या सांप्रदायांतील यति असून रिकाम्या वेळीं चित्ताचें रंजन करण्याकरितां त्यानें या गोष्टी रचल्या असतील. व शंकराचार्य आठव्या शतकांत झाले; तेव्हां यावरूनही वरील काळाशीं ( इ. स. अकरावें शतक ) मेळ बसतो.

वरील गोष्ट मोठेंसें निश्चित प्रमाण म्हणून साहेबांनीं सांगितली नाहीं; तरी प्रस्तुत कवीच्या काळाचा निर्णय करण्यास कदाचित् ती उपयोगीं पडेल अशा उद्देशानें ती सुचवून ठेविली आहे. पण तींत फारसें हांशील दिसत नाहीं. एक तर ' दंडी ' हें

---

१ असे निश्चित शक विल्सन् साहेब कोणत्या आधारावर देत असतील ते दवोत ! युरोपियन व विशेषतः इंग्रज ग्रंथकारांचें धोरण संस्कृत कवीस वगैरे आलीकडे ओढण्याचें विशेष दिसतें. कालिदासास देखील आठव्या शतकापर्यंत कित्येक ओढूं पाहतात !

विशेषनाम म्हणूनच आजपर्यंत सर्व समजत आले आहेत, तेव्हां हा समज सहसा खोटा म्हणवणार नाहीं; व नांवें, आडनांवें हीं दुर्बोध, किंबहुना निरर्थक असणारीं सर्व लोकांत हजारों सांपडतात; तेव्हां 'दंडी' हेंही नांव व्यर्थ असल्यास काहीं नवल नाहीं.[1] बरें जर अशी कल्पना केली, कीं तें मूळचें सामान्यनाम असून पुढें विशेषनाम झालें, तर तिला पहिला बाध हा येतो कीं, तसें असतें तर दंडीस इतर महाकवींप्रमाणें 'श्री' येवढेंच उपपद न लागता 'श्रीमत्परमहंस,' 'परिव्राजकाचार्य, अशीं कांहीं उपपदें लागतीं. पण तीं कोठें आहेत? शिवाय विरक्ति होऊन चतुर्थाश्रमाचा अवलंब ज्यानें केला, त्यानें वेदांतादि शास्त्रांतील किंवा पुराणांतील विषय टाकून प्रस्तुत ग्रंथांतील शृंगारवृत्तांत व माराहाणीच्या गोष्टी लिहाव्या हेंही ठीक जमत नाहीं. तेव्हां प्रस्तुत कवीच्या नांवाचा आमच्या साहेबांनीं जो कोरून नवा अर्थ काढला आहे त्यास साधक अशी कोणतीच गोष्ट मिळत नाहीं; व ही सारी खटपट ज्याकरितां त्यानीं केली तो दंडीचा काळ आचार्याच्या अनिर्णीत काळावरच सर्वथा आधेयभूत असल्यामुळें त्यावरही अर्थातच अनिश्चितत्व येतें.

'दशकुमारचरिता'त विषय काय आहे हें त्याच्या नांवावरूनच व्यक्त होत आहे. या ग्रंथाचें सामान्य स्वरूप, त्यांतील गोष्टी, वगैरे संबंधानें वर काहीं लिहिण्यांत आलें आहे, त्यावरून याविषयीं कांहीं कल्पना आमच्या वाचकांच्या मनांत आलीच असेल. त्याहून अधिक निरूपण योग्य स्थलीं होईलच. पण त्याच्या अगोदर प्रस्तुत ग्रंथाच्या संबंधानें घडलेल्या कांहीं चमत्कारिक गोष्टी सांगणें आहेत त्या येथें लिहितों.

मागें बाणभट्टाविषयीं लिहितांना त्याच्या 'कादंबरी'च्या परिपूर-

---

१ आपल्या पाणिनीनें व यास्कानें येवढीं व्याकरणें रचलीं, पण त्यांच्याच नांवांची व्युत्पत्ति त्यांस सुद्धा समजली नसेल! अलीकडील इकडचीं 'गोखले' 'पराजपे', 'गोगटे' इ. नांवांचा अर्थ कोणास सांगतां येईल? इंग्रेजींतील Gladstone वगैरे आडनांवाची काय व्युत्पत्ति होईल?

णाचा चमत्कार सांगितला आहे, तो आमच्या वाचकांस आठवत असेलच. पण 'दशकुमारचरिता'च्या रचनेंत तर त्याहूनही विलक्षण प्रकार घडले. 'कादंबरी'प्रमाणें हा अपूर्ण राहिला इतकेंच नव्हे, तर—त्याहूनही चमत्कार काय कीं—त्यास आरंभही नव्हता!!! पहिला उच्छ्वास वाचूं लागावें तों पूर्वीचा संदर्भ कांहींएक नसून दोघें स्त्रीपुरुषें एकांतांत आहेत, व ती स्त्री आपल्या वल्लभाशीं शृंगारभाषण करते आहे, असें एकदम पहिल्यानेंच आढळतें. तीं कोण, कोठलीं, त्यांचा आधींचा वृत्तांत काय, वगैरे वाचकांस बिलकुल माहीत नसतें. बरें, नाटकांच्या संप्रदायाप्रमाणें तो सगळा संदर्भ पुढें जुळेल म्हटलें तर तसेंही पुढें होत नाहीं. याप्रमाणें हा प्रबंध आदिरहित असंबद्ध असा होता. पण वाचकांच्या सुदैवानें ही न्यूनता सध्यां पूर्ण झालेली दृष्टीस पडते. या जोडलेल्या आदिभागास 'पूर्वपीठिका' असें नाव दिलें आहे. हींत पांच उच्छ्वास असून विल्सन् साहेबांच्या आवृत्तींत तिनें ४८ पानें भरलीं आहेत. पण ही कोणी लिहिली हें पक्कें समजलें नाहीं. कोणी म्हणतात ती दंडीनेंच लिहिली असावी; व दुसऱ्यांचें असें मत आहे कीं, ती त्याच्या हातची नव्हे,—त्याच्या शिष्यानें वगैरे कोणी ती रचली असेल. असो; याप्रमाणें या पूर्वपीठिकेचें कर्तृत्व वादग्रस्त आहे. त्याविषयीं आमचें मत काय आहे तें आतां वाचकांस कळवितों.

वरील वादाचा निर्णय विल्सन् साहेबांनीं आपल्या प्रस्तावनेंत केला नाहीं. त्यांनीं दोन्हीही मतें दर्शविलीं आहेत. पण एकंदरींत पाहता ही 'पूर्वपीठिका' खुद्द कवीची नव्हे असें आम्हास वाटतें. एक तर पहिल्यानेंच मोठें कारण उघड असें दिसतें कीं, जर तसें असतें, तर प्रस्तुत ग्रंथाचा असा आवश्यक विभाग कवि कशास करता? 'दशकुमारचरित' म्हणजे दहा राजपुत्रांच्या गोष्टी. तेव्हां या नांवाप्रमाणें यांत कुमारांचा जन्म, त्यांचा विद्याभ्यास वगैरे सर्व वृत्तांत चालीप्रमाणें ओघाओघानें लिहावयाचा. मधेंच कांहीं संबंध नसतां कथेचा विच्छेद करण्याचें प्रयोजन काय? बरें, जेथें ही कथा तोडली आहे

तेथें तसें विशेष कांहीं कारण तरी आहे काय? बिलकूल नाहीं. मुख्य कुमाराची अथवा कथेंतील नायकाची आणि नायिकेची गांठ घालून दिली आहे,—आणि आटपलें! त्यांचें भाषण पुढील भागांत म्हणजे मुख्य ग्रंथांत आलें आहे. तसेंच पूर्वपीठिकेचा शेवट आणि मुख्य ग्रंथाचा आरंभ हीं एकमेकांशीं जो जुळून पाहील त्यासही कळून येईल कीं, दोघांचा मिलाफ अगदीं बरोबर होत नाहीं. कांहीं शब्दांची द्विरुक्ति झाली आहे. हे शब्द पूर्वपीठिका रचणारानें दोहोंस एकवट करण्याकरितां शेवटीं घालून ठेवले असावे हें उघड दिसतें. तसेंच, विल्सन् साहेबांच्याच म्हणण्याप्रमाणें पूर्वपीठिकेंत आणि मुख्य ग्रंथांत कांहीं ठिकाणीं विरोध असून कोठे कोठें त्याच गोष्टीही सांगण्यात आल्या आहेत. तेव्हां यावरूनही दोघांचा कर्ता एकच असावा असें दिसत नाहीं. शिवाय खुद्द ग्रंथावरून पाहिलें असतांही असाच तर्क होईल मूळग्रंथाची भाषा येवढ्या नामांकित कवीस शोभण्यासारखी प्रौढ, सरस व 'दंडीनः पदलालित्यं' या सार्वत्रिक प्रसिद्धीस साजण्या-सारखी आहे. तशी पूर्वपीठिकेची आहेसें आम्हांस वाटत नाहीं. ती संस्कृत कवींच्या साधारण संप्रदायास अनुसरून लिहिली आहे खरी; पण रसिक वाचकांच्या चित्तास बळकट ओढून घेण्याचा गुण तिजमध्यें नाहीं. मूळ कवीची धाटणी तींत बरीच उचलली आहे, तरी दोहोंच्या अभेदाचा भास आमच्या मतें कोणासही होणार नाहीं. एके ठिकाणीं प्रासांची एकमेकांत ओवून बरीच लांब साखळी साधली आहे. असा कृत्रिम रचनेचा प्रकार खुद्द ग्रंथात कोठेंही दृष्टीस पडत नाहीं. यावरून पूर्वपीठिका रचणाराची रसिकता व्यक्त होऊन तो दंडीहून निराळा असावा असें स्पष्ट दिसतें. बरं, कथा कशा रचल्या आहेत हें जर पाहिलें, तर त्यांतही दोहों ठिकाणीं मोठा भेद दिसून येईल. मूळ ग्रंथांतील कथांचें संविधानक जितक्या चातुर्यानें बांधलेलें आढळतें तितकें पूर्वपीठिकेंत आढळत नाहीं. मुख्य ग्रंथाशीं मेळ बसण्यापुरत्या

---

१ पृष्ठ १८. "कुमारा माराभिरामा रामाद्यपौरुषा रुषा भस्मीकृता-रयो रयापहसितसमीरणा रणाभियानेन यानेन तेनाभ्युदयाशंसं राजान-मकार्षुः।"

त्या सरासरी रचून दिल्या आहेत. यांत म्हणण्यासारखा चमत्कार मुळींच नाहीं.

असो; याप्रमाणें पूर्वपीठिका दंडीच्या हातची नव्हे अशी आम्हांस खात्री वाटते. तरी त्याच्या ग्रंथाशीं विजोड न दिसण्यासारखी ती लिहिली आहे यावरून ती त्याच्या शिष्यानें वगैरे रचिली असेल हा तर्क आम्हास मान्य आहे. तसेंच हेंही येथें उघडपणें पदरांत घेतलें पाहिजे, कीं हा दंडीचा ग्रंथ आदिरहित कसा निर्माण झाला, किंवा मध्येंच कथेचा आरंभ करण्यांत व ती अर्धींच सोडून देण्यांत कवीचा कोणता उद्देश असेल तोही आम्हांस बिलकूल समजत नाहीं! असा विलक्षण चमत्कार जगांत थोडाच आढळेलसें वाटतें!

'दशकुमारचरित' ग्रंथ अपूर्ण आहे हेंही मागें सांगितलेंच आहे. तो वरच्याप्रमाणेंच दुसऱ्या एकानें पुरा केला आहे. या उत्तर भागाचें नांव रचणारानें 'दशकुमारचरितशेष' असें ठेविलें आहे. याच्या कर्तृत्वाविषयीं वरच्यासारखा वाद पडण्याचें मात्र मुळीं कारण नाहीं. **चक्रपाणि दीक्षित** नांवाच्या कोणी दक्षिणी पंडितानें तो लिहिला असें त्यावरूनच समजतें. पण त्याची रचना मूळ ग्रंथास शोभण्यासारखी अगदींच नसल्यावरून तो भाग **विल्सन्** साहेबांनीं छापविला नाहीं. यास्तव अर्थातच त्यांच्या आवृत्तींत प्रस्तुत ग्रंथ अपूर्णच आहे.

असो; याप्रमाणें आपल्या कवीच्या ग्रंथांत रचनेच्या संबंधें जो एक मोठी विलक्षण गोष्ट आढळते तीविषयीं लिहिलें. आतां त्याच्या संविधानकाविषयीं विचार करूं.

आम्हीं मागें एकदा लिहिलेंच आहे कीं, 'दशकुमारचरिता' स जरी 'वासवदत्ता' व 'कादंबरी' या ग्रंथांच्या पंक्तीस लोक सामान्यतः

---

१ असा परिपूरणाचा प्रकार एका नाटकांतही आहे. 'मृच्छकटिकां'त एकंदर दहा अंक आहेत. त्यांतील नऊ अंक व दहाव्याचा थोडा भाग कवीचे ( शूद्रकाचे ) असून शेवटचा लहानसा भाग कोणी नीलकंठनामक पंडितानें जोडला आहे. ही वरच्यासारखीच चमत्काराची गोष्ट आहे म्हणून येथें सांगितली.

भ्रांतीनें घालतात, तरी वास्तविकपणें पाहतां प्रस्तुत ग्रंथाचें साम्य 'पंचतंत्र', 'हितोपदेश' वगैरे ग्रंथांशीं जितकें आहे तितकें वरच्याशीं नाहीं. तें असें कीं, या ग्रंथांत एक सबंध अशी गोष्ट मुळींच नाहीं; आहेत त्यांतही संविधानकाचें चातुर्य दाखविण्याचा विशेष प्रयत्न केला नाहीं; काव्यसंप्रदायानुरूप निरनिराळे रस आणून त्यांतून शृंगाराचा वगैरे क्रमशः पोष केला नाहीं; मधून मधून देशकालादिकांचीं वर्णनें गोंवून दिलीं नाहींत;—सारांश, कादंबरीचें लक्षण साप्रत ग्रंथास कोणतेंही लागणार नाहीं. तर त्याच्या नांवाप्रमाणें यांत एकमेकांशीं असंबद्ध अशीं अनेक कथानकें आहेत. दंडीच्या मनांत गद्यरूप काव्य लिहिण्याचा सर्वथा उद्देश नव्हता; किंबहुना त्याच्या वेळेस तो प्रघात पडलाच नव्हता हें वर त्याच्या काळाविषयीं जें लिहिलें आहे त्यावरून लक्षांत येईल. यास्तव संविधानक, रसवैचित्र्य, वर्णनें इत्यादिकांचा चमत्कार त्यानें प्रकृत ग्रंथांत उगीच थोडा केला आहे. त्याचा मुख्य उद्देश आपल्या काळाची स्थिति ज्यांत चांगली दाखविली जाईल अशा प्रकारच्या मनोरंजक गोष्टी रचून उत्कृष्ट गद्यरचनेचा मासला रसिक संस्कृतज्ञास सादर करावा इतकाच असावासा दिसतो. असो; तर्‍हां प्रस्तुत ग्रंथाविषयींचें विवरण मागल्या दोहोंप्रमाणें लांब होण्यास मुळींच अवकाश नाहीं.

वर सांगितलेंच आहे कीं, 'दशकुमारचरितां'त एक सबंध अशी गोष्ट नाहीं. प्रत्येक कुमाराच्या गोष्टीचें निराळें संविधानक आहे. यास्तव या ग्रंथास आरंभ कसा केला आहे हें सांगून यातील कथांचें सामान्यतः स्वरूप ध्यानांत येण्याकरिता एक मात्र गोष्ट येथें घेऊं.

मगध[1] देशांत पुष्पपुरीनामे नगरीचे ठायीं राजहंस नामेंकरून एक

---

१ मगध देश म्हणजे सांप्रतच्या बहार प्रांताचा दक्षिण भाग. पुष्पपुराचें दुसरें नांव पाटलिपुत्र असें होतें. त्याचा ग्रीक लोकांच्या ग्रंथांत 'पालिबोथ्रा' असा अपभ्रंश आढळतो, व येथील आलीकडचा अपभ्रंश 'पाटणा' होय. ही गोष्ट पूर्वीं माहित होतीच, पण रव्हेनूशॉ नांवाच्या एका साहेबानें सुमारें चाळीस वर्षांपूर्वीं सोन ( शोण ) नदीचें पूर्वीचें पात्र शोधून काढल्यामुळें तर ती पक्कीच ठरली—मालव म्हणजे सांप्रतचा माळवा देश हें सांगावयास नकोच.

प्रतापी व पुण्यशील राजा राज्य करीत होता. त्याचें कांहीं प्रसंगानें मालव देशचा राजा मानसार याशीं मोठें तुंबळ युद्ध झालें त्यांत मानसाराचा पराभव होऊन तो राजहंसाच्या हातीं सापडला तथापि या राजाने उदार अंतःकरणानें त्यास सोडून देऊन पुनः आपल्या राज्यावर बसविलें. तें न स्मरतां मानसाराने पुनः युद्धाची सिद्धता करवून राजहंसाशीं रणांगणांत गांठ घातली. राजा पुष्कळ लढला, पण शेवटीं महाकालेश्वराची आराधना करून मानसारानें जी विजयगदा संपादन केली होती तिच्या योगानें त्याचा पराभव झाला. ही गदा हाणतांच सारथी गतप्राण होऊन राजा मूर्च्छित पडला. घोडे ऊधळले ते त्या मूर्च्छित राजासकट रथास ओढीत ओढीत रानांत जाऊन थबकले. पुढें सुदैवानें तेथें राणी व राजाचे प्रधान यांची व राजाची परस्पर गांठ पडली. इकडे त्याच्या शत्रूनें पुष्पपुरी घेऊन सर्व राज्य बळकावलें. तेव्हां निराधार होऊन तें सर्व राजमंडळ तेथेंच अरण्यात राहिलें. याप्रमाणे काहीं दिवस गेल्यानंतर त्या अरण्यांतच राजाची राणी वसुमती हिला आकाशवाणीच्या सांगण्याप्रमाणें सुमुहूर्तावर एक सुलक्षण पुत्र झाला. त्याचें नांव राजवाहन ठेविलें. हा प्रस्तुत कथेंतील नायक होय. याच्याच बरोबर राजाच्या तीन प्रधानासही अरण्यांतच तीन पुत्र झाले. याप्रमाणें त्या चौघां कुमारांचें तो राजा तेथें पालन पोषण करूं लागला. असें होता होतां आणखी सहा कुमार कोणी तपस्व्यानें, कोणी एकाद्या वृद्धस्त्रीनें, असे निरनिराळ्या वेळीं आणून राजहंसाच्या स्वाधीन केले. त्यातील चौघे त्याच्याच मंत्र्यांचे असून ते विदेशवासी असतां त्यांवर नानातऱ्हेचे प्रसंग येऊन शेवटीं ते मुलगे कर्मधर्मसंयोगानें आपल्या धन्यापाशीं

---

१ 'वासदत्ता' व 'कादंबरी' यांच्या वेळेस 'दशकुमारचरित' लिहिलेलें नव्हे याचें एक मोठें प्रमाण या दुसऱ्या ग्रंथाचा आरंभ होय. हा जर वरील दोन ग्रंथाच्या वेळेस किंवा त्यापुढें लिहिला असता, तर त्यांतील राजाचें वर्णन, नगराचें वर्णन, आहे त्यापेक्षां फारच निराळ्या तऱ्हेनें असतें.

आले. बाकीचे दोन मिथिलेचा[1] राजा प्रहारवर्मा, राजहंसाचा मित्र, याचे असून तेही असेच दैववशात् इकडे आले. असो; याप्रमाणें हे दहा कुमार राजापाशीं आले असतां त्यानें सर्वांचें पालन करून त्यांकडून त्यांस उचित असा उत्कृष्ट विद्याभ्यास करविला. तो सर्व पूर्ण होऊन हे कुमार वयांत आले असतां एके दिवशीं वामदेवनामक एका ब्राह्मणानें राजास कळविलें कीं, "राजा! हे सर्व कुमार आतां विद्यानिपुण झाले. यांस दिग्विजयास पाठव." राजानें तें ऐकून एका मुहूर्तावर तसें केलें. मग ते दहा कुमार तेथून निघून विंध्याटवींत जाऊन उतरले. असे ते चालले असतां एकदां असें घडलें कीं, राजवाहनास एका ब्राह्मणानें आपणाबरोबर गुप्त वाटेनें पाताळांत नेलें. तेथें राजवाहनाच्या पराक्रमानें त्यास संपूर्ण राज्य मिळाले, व तेथील राजाची कन्या त्यानें वरली. इकडे राजवाहनाचे नऊ मित्र तो दिसेनासा झालासें पाहून भयाभीत झाले, आणि त्याच्या शोधार्थ कोणी या दिशेस, कोणी त्या दिशेस असे निघून गेले. ते गेल्यावर राजवाहन वर आला, आणि पाहतो तों आपले सोबती कोणी नाहींत. पण कांहीं दिवसांनीं ते एकेक त्यास येऊन पुनः मिळाले. तेव्हां एकेकानें आपआपणांस घडलेला वृत्तांत राजवाहनास निवेदन केला आहे. याप्रमाणें या ग्रंथाचे संविधानक आहे.

आतां 'दशकुमारचरितां'तील गोष्टी कशा प्रकारच्या आहेत तें दाखविण्याकरितां त्यांतील एक गोष्ट मासल्याकरितां येथें घेतों:—

उपहारवर्मा राजपुत्रास ( राजवाहनास ) आपलें चरित्र सांगतो:—

"मी तुझ्या शोधाकरितां फिरत असतां विदेह देशास गेलों. तों तेथील राजधानी जी मिथिला तींत न जातां गांवाबाहेरच एका मठांत उतरलों. तेथें एका वृद्धतापसीनें तेथील राजा प्रहारवर्मा ( उपहारवर्म्याचा बाप ) याचा वृत्तांत नुकताच घडलेला सविस्तर सगळा मला सांगितला. त्यावरून ती तापसी आपली दाई अशी मीं तेव्हांच ओळखली, आणि राजाचा पुत्र रानांत गमावला म्हणून जो तूं सम-

---

1 मिथिला ( जनकाचा देश ) म्हणजे हल्लींच्या बहार प्रांताचा उत्तर भाग.

जतेस तो मी असें तिला सांगितलें. तें ऐकतांच तिचा कंठ भरून येऊन तिनें मोठ्या प्रेमहर्षानें मला पोटाशीं धरलें. नंतर विकटवर्म्यांस मारून बंदींत ठेवलेल्या आपल्या आईबापांस सोडवण्याचा कृतनिश्चय मी तिला निवेदन केला. तिनेंही माझें साह्य करण्याचें पत्करलें. तें असें कीं, तिची मुलगी विकटवर्म्याच्या राणीपाशीं होती; यास्तव तिच्या द्वारें राणीस वश करून घेऊन विकटवर्म्याचा सूड उगवावयाचा. हें कृत्य फारसें कठीण नव्हतें. कारण विकटवर्मा कुरूप, कुबुद्धि, दुष्ट अशा प्रकारचा असल्यामुळें राणीस तो अगदीं आवडत नसे. मग असा संकेत ठरल्यावर त्या दाईच्या मुलीनें तें कार्य सिद्धीस नेलें. माझी व राणीची चोरवाटेनें एकांतीं गाठ घालून देऊन परस्परांचें प्रेम तिनें जडविलें. पण विकटवर्मा माझा सख्खा चुलतभाऊ पडला; तेव्हां हें नीच पापकर्म कसें करावें असें मनांत येऊन मला मोठी चिंता पडली. पण गणपतीनें मला दृष्टांत देऊन ती निवारण केली: कीं ' अरे उपहारवर्म्या ! तूं माझाच अंश आहेस; व ही स्त्री माझ्या मस्तकावरील गंगा असून शापदोषानें भूलोकावर . अवतरली आहे. तर तुमचा योग निंद्य नव्हे. ' याप्रमाणें माझा संदेह दूर झाला असतां मी निःशंक तिशीं रममाण झालों. असें चाललें असतां राजाचा सूड उगविण्यास ही पुढील युक्ति आम्हीं योजली. राणीनें राजास एक सुंदर तजबीर दाखविली, आणि असें सांगितलें कीं, तुमचें अनुमत असल्यास असलें रूप प्राप्त होण्याची मंत्रसिद्धि मीं नुकती साध्य करून घेतली आहे, तिच्या योगानें तुमचें असें दिव्य शरीर करीन. विकटवर्मा बुद्धीचा जडच होता; त्यानें तेव्हांच होय म्हटलें. मग तिनें बागेंत तो चमत्कार करण्याकरितां सर्व तयारी करविली. होमकुंड तयार करून त्या राजास फसविण्याकरितां पुष्कळ मंत्रतंत्र चालविलें. शेवटीं मला एका लता-

---

१ विकटवर्मा हा प्रहारवर्म्याच्या भावाचा मुलगा म्हणजे त्याचा पुतण्या. यानें प्रहारवर्म्यास व त्याच्या राणीस बंदींत घालून आपणच राज्य बळकावलें. प्रस्तुत कथा सांगणारा उपहारवर्मा यानें हा आपल्या आईबापांचा दुःखवृत्तांत ऐकून चुलतभावाचा ( विकटवर्म्याचा ) सूड घेण्याचा निश्चय केला.

कुंजात लपवून ठेविलें होतें, तेथून त्या कुंडाजवळ बोलावलें. तेव्हां संकेताप्रमाणें मी लागलाच पुढे झालों, आणि विकटवर्म्याचे कट्यारीनें दोन तुकडे केले; आणि त्या अग्नींतच टाकून दिले. याप्रमाणें मुख्य हेतु सिद्धीस गेल्यावर मीं लागलीच आईबापांस बंदीशाळेंतून सोडवून त्यांची पुनः पूर्वीच्या राज्यावर स्थापना केली." [1]

वरील गोष्टीवरून 'दशकुमारचरिता' चें एकंदर स्वरूप आमच्या वाचकांच्या लक्षांत येईल. वर जी उपहारवर्म्याची कृति वर्णिली आहे तशीच येथून तेथून सगळ्या कुमारांची आहे. ती वाचून कोणत्याही मनुष्यास सामान्यतः अत्यंत तिटकारा आल्यावांचून राहणार नाहीं. ज्या काळीं अशा क्रूर व अधम कृत्यांचा आणि धर्मभ्रष्टतेचा सर्वत्र प्रचार चालू असेल, तो काल मोठा भयंकर असावा यांत संशय नाहीं! त्याची कल्पनाही मनास दुःसह होते! असो; वरील गोष्टीवरून प्रस्तुत ग्रंथात संविधानकाचा चमत्कार कितपतसा आहे तोही सर्वांस सहज समजेल. तेव्हां एकंदरींत कादंबरीचें मोठें अंग जो वरील गुण त्या-संबंधें सांप्रत ग्रंथास मोठासा मान देतां येणार नाहीं हें उघड आहे.

'दशकुमारचरितां' त येथून तेथून एक सबंध गोष्ट नाहीं, यास्तव त्यांत कोणत्याही रसाचा पूर्ण परिपाक उतरला नाहीं हें मागें सांगित-लेंच आहे. साऱ्या कुमारांच्या चरितांत दोन रस मुख्यतः आहेत; ते अर्थातच वीर आणि शृंगार. तरी वर लिहिलेल्या उपहारवर्म्याच्या गोष्टींतल्या सारखेच ते असल्यानें ते अगोदर पूर्ण साधलेही नाहींत; आणि पुनः त्यांचें स्वरूप दुष्ट असल्यामुळें त्याच्या योगानें मन प्रसन्न

---

१ वरील श्लाघ्य चरित्राचें तें करणाराच्या मुखानेंच श्रवण केलें असतां तें राजवाहनास किती गोड लागलें हें मागें लिहिलेंच आहे. तें चालले असतां प्रस्तुत कवीच्या नांवाविषयींचा संदेह फिटेल. हें वरील मत राजवाहनाकडून जरी वदविलें आहे तरी तें दंडीचेंच होय असें मानण्यास हरकत नाहीं. तेव्हां दंडी जर यति असता, तर वरच्या-सारखें जारकर्माचें त्यानें पुरस्करण केलें असतें काय ?—तसेंच गण-पति, देवी इत्यादि देवतांचा संबंध केवळ त्यांची विटंबना करण्याकरतां तो आणता काय ?

न होतां त्यास उद्वेग मात्र होतो. कुमारांच्या वृत्तांतांत व साहस कृत्यांत तसेच अद्भुत व भयानक रसही आहेत; पण तेही वरच्याप्रमाणें अपुरेच. ' कादंबरी ' तली कथा जशी उत्कृष्ट रचली आहे, किंवा ' आरेबियन् नैट ' मध्ये जशा सर्व गोष्टी अद्भुतरसमय आहेत, तशी यांतली एकही नाहीं. एक दोन कांहीं बऱ्या आहेत, पण बाकीच्या तर अगदींच सरासरी आहेत. असो; तर याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथांत रसवैचित्र्याचा प्रकार आहे. वर्णनाविषयीं पाहिलें तर भवभूतीच्या नाटकांतून, ' कादंबरी ' त वगैरे जसें सृष्टीचें वर्णन आहे तसें तर यांत बिलकूल नाहीं. स्त्रियांचें, बागांचें वगैरे कोठें कोठें आहे, पण तेंही संस्कृत कवींच्या अनादिसिद्ध एकदां ठरून गेलेल्या संप्रदायासच केवळ अनुसरून असल्यामुळें मनास मोठासा चमत्कार वाटत नाहीं असो; तर याप्रमाणें चित्तरंजनाकरितां जो रसिक ही दंडीची कृति समग्र वाचील त्यास वाचनांतीं मोठासा संतोष होईल असें आम्हास वाटत नाहीं. त्यास कोठें कोठें कांहीं मजेदार वाटेल खरें, पण एकंदर सगळ्या ग्रंथाचे पुनरालोचनाकरितां वाचनाचे श्रम पुन्हा घ्यावेसे त्यास वाटणार नाहीत.

' दशकुमारचरिता ' विषयीं वरील एकंदर आमचें मत वाचून वाचकांस कदाचित् मोठें आश्चर्य वाटेल; कारण या ग्रंथाची या देशांत पूर्वीपासून मोठी प्रख्याति असून शिवाय विल्सन् साहेबांनींही त्याच्या गुणांवरून युरोपांतील वाचकांस तो सादर केला, आणि तेव्हांपासून तिकडेही तशीच याची प्रसिद्धि झाली आहे. एतद्देशीय पंडितांत या ग्रंथास किती मान आहे हें मागें एकदां आलेल्या श्लोकावरून तर स्पष्ट दिसतें. तो श्लोक हा—

**उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम् ।**
**दंडिनः पदलालित्यं माघे संति त्रयो गुणाः ॥**

" उपमा अशी कालिदासाचीच, अर्थगौरव भारवीच्याच काव्यांत, पदलालित्य पहावें तर दंडीचेंच, आणि हे तिन्ही गुण एकत्र असे माघकवीच्या काव्यांतच दृष्टीस पडतात. "

यावरून पदलालित्य या गुणांत दंडीची सर्व कवींत श्रेष्ठता दिसून येते. बल्लालमिश्राच्या ' भोजप्रबंधां ' तही आपला कवि कालिदासादि कविराजांच्या समाजांत खुशाल बरोबरीनें रमलेला आढळतो. याचे एक उदाहरण या कवीच्या वृत्तांताच्या आरंभीं दिलेंच आहे. शिवाय इकडचा प्रसिद्ध ग्रंथकार व रसिकांत अग्रगण्य असा अपय्यादीक्षित यानेंही दंडीविषयींची आपली नम्रत्वबुद्धि ' दशकुमारचरितसंक्षेप ' या पद्यरूप ग्रंथावरून प्रगट केली आहे. ह्याच प्रकार विनायक म्हणून कोणी कवीनेंही केला आहे.

वरील दुहेरी प्रसिद्धि कोणाचीही विनाकारण होणार नाही हें उघड आहे. यास्तव ती कशावरून झाली हें येथें अवश्य सांगितलें पाहिजे पहिली प्रसिद्धि एतद्देशीय पंडितांत पूर्वापार चालत आलेली. हिचें कारण वरील श्लोकातच आहे;—पदलालित्य. हा गुण प्रस्तुत कवीच्या खुद्द ग्रंथांत सर्वत्र आढळतो खरा. संस्कृतांत अगोदर गद्यग्रंथ थोडे; पण जे आहेत त्यात दंडीच्या ' दशकुमारचरिता ' ची बरोबरी दुसरा कोणताही ग्रंथ करूं शकणार नाहीं. ' पंचतंत्र, ' ' हितोपदेश ' वगैरेंची पदरचना फारच हलकी; व ' वासवदत्ता, ' ' कादंबरी ' यांची फारच कृत्रिम; व्यवहारांतल्यासारखी असून प्रौढ, पण पुनः काव्याच्या घाटणीवर सर्वथा पडलेली नव्हे, अशी रचना ' दशकुमारचरिता ' तच आढळते. शिवाय तींत श्लेषही विशेष आढळतो. तेव्हां या गुणावरून प्रस्तुत कवीची विशेषतः येवढी ख्याति पहिल्यापासून झाली असेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां दुसरी युरोपांतील संस्कृतज्ञांत झालेली. ही विल्सन् साहेबांसारख्या विख्यात पंडितानें आपल्या कवीस हातीं धरल्यामुळें बहुधा झाली आहे यांत संशय नाहीं. ग्रीक व ल्याटिन भाषेचा प्रचार जसा युरोपांत सार्वत्रिक व चिरकालिक झाला आहे, तसा संस्कृताचा मुळींच नाहीं. यास्तव असें होतें कीं, कोणी मोठ्या संस्कृतज्ञानें जेव्हां एकाद्या ग्रंथाची प्रसिद्धि करावी, तेव्हांच ती होते; आणि तसें ज्या ग्रंथांचें झालें नसतें ते कितीही योग्यतेचे असले तरी अप्रसिद्धच राहतात. याचीं उत्कृष्ट प्रमाणें बाणभट्टाची ' कादंबरी, ' व विशेषतः जगन्नाथरायाचे ग्रंथ हीं होत.

युरोपांतील संस्कृतज्ञांस ‘ हितोपदेश ’ जितका माहीत आहे तितकी ‘ कादंबरी ’ किंवा ‘ किरातार्जुनीय ’ हीं माहीत नाहींत. ‘ भामिनीविलास, ’ व ‘ गंगालहरी ’ या अनुपम ग्रंथांचीं तर बहुधा पुष्कळांस नांवेंही ठाऊक नसतील ! तेव्हां माजी डॉयरेक्टर ग्रांट साहेब यांच्या संबंधानें आपल्या तुकारामास जशी एकदम साऱ्या मराठी कवींत थोरवी प्राप्त झाली, तशीच प्रस्तुत कवीस विल्सन् साहेबांनीं आणली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तसें न होतें तर इतर अप्रसिद्ध संस्कृत कवींच्याच मालिकेंत त्यासही बसावें लागतें ! असो; पण याशिवाय ‘ दशकुमारचरित ’ युरोपातील लोकात विशेषतः मान्य होण्याचें दुसरेंही एक कारण आहे. तें हें कीं, त्यांत त्या वेळची स्थिति रेखलेली आढळते. यास्तव इतिहासज्ञांस किंवा प्राक्कालजिज्ञासु जनांस ती फार उपयोगीं पडण्यासारखी आहे.

याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथाच्या ख्यातीचीं जीं कारणे आम्हांस वाटतात तीं सांगितलीं. शेवटीं त्याविषयीं एकंदरीत येवढेंच सागतों कीं, तो रसिक वाचकास बाह्य गुणांवरून म्हणजे पदलालित्यावरून वगैरे जितका प्रिय होईल, तितका अंतर्गुणांवरून म्हणजे रससंविधानकादिकांवरून होणारा नव्हे.

आतां ‘ दशकुमारचरिता ’ चें स्वरूप वाचकांच्या काहीं लक्षांत येण्याकरतां त्यांतून थोडेसे उतारे येथें घेतों.

पहिल्यानें शृंगाररसाचे ग्रंथाचा जो एकदम आरंभ झाला आहे तो असा:—

—श्रुत्वा तु भुवनवृत्तांतमुत्तमांगना विस्मयविकसिताक्षी सस्मितमिदमभाषत । दयित त्वत्प्रसादादद्य मे चरितार्था श्रोत्रवृत्तिरद्य मे मनसि तमोपहस्त्वया दत्तो ज्ञानप्रदीपः । पक्वमिदानीं त्वत्पादपद्मपरिचर्याफलम् । अस्य च त्वत्प्रसादस्य किमुपकृत्य प्रत्युपकृतवती भवेयम् । अभ-

नर्द्यं हि नैव किंचिन्मत्संबद्धम्[1] । अथवास्त्येवास्यापि जनस्य क्वचित्प्रभुत्वम् । अशक्यं हि मदिच्छया विना सरस्वतीमुखग्रहणोच्छेषणीकृतो दशनच्छद एष चुंबयितुमंबुजासनास्तनतटोपभुक्तमुरस्थलं चैतदालिंगयितुमिति । ततः प्रियोरसि प्रावृडिव नभस्युपास्तीर्णगुरुमंडलपयोधरा प्रौढकंदलीमुकुलमिव रूढरागरूषितं चक्षुरुल्लासयंती बर्हिवर्हावलीविडंबिना कुसुमचंद्रकशारेण मधुकरकुलव्याकुलेन केशकलापेन स्फुरदरुणकिरणकेसरकरालं कदंबमुकलमिव कांतस्याधरमणिमधीरमाचुचुंब । तदारंभस्फुरितया च रागवृत्त्या भूयो भूयः प्रावर्ततातिमात्रचित्रोपचारशीकरो रतिप्रबंधः ॥

दंडीच्या सार्‍या कुमारांत उपहारवर्म्याचेंच चरित्र लांब असून वैचित्र्यविशिष्ट आहे. त्याची व रागमंजरीची पहिल्यानें दृष्टादृष्ट झाल्याचा प्रसंग तो वर्णितोः—

एष्वेव दिवसेषु काममंजर्याः स्वसा यवीयसी रागमंजरी नाम पंचवीरगोष्ठे संगीतकमनुस्थास्यतीति सांद्रादरः समागमन्नागरजनः स चाहं सह सख्या धनमित्रेण तत्र सन्नयधिषि । प्रवृत्तनृत्तायां च तस्यां द्वितीयं रंगपीठं ममाभून्मनस्तद्दृष्टिविभ्रमोत्पलवनसत्रापाश्रयश्च पंचशरो भावरसानां सामग्र्यात्समुदितबल इव मामति-

---

१ शेक्स्पीयर कवींच्या ‘ व्हेनिस् शहराचा व्यापारी ’ या नांवाच्या नाटकांत नायिकेनें नायकास उद्देशून केलेलें भाषण असेंच आहे:–

“ Myself and what is mine, to you and yours
Is now converted; but now I was the lord
Of this fair mansion, master of my servants,
Queen o'er myself; and even now, but now,
This house, these servants, and this same myself,
Are yours, my lord !—”

Act III Scene II.

मारमव्यथयत् । अत्रासौ नगरदेवतेव नगरमोषरोषिता लीलाकटाक्षमालाशृंखलाभिर्नीलोत्पलपलाशश्यामलाभिर्मामबध्नात् । नृत्योत्थिता च सा सिद्धिलाभशोधिनी किं विलासात् किमभिलाषात् किमकस्मादेव न जानेऽसकृन्मां सखीभिरप्यनुपलक्षितेनापांगप्रेक्षितेन सविभ्रमारेचितभ्रूलतमभिवीक्ष्य सापदेशं च किंचिद्‌विष्कृतदशनचंद्रिकं स्मित्वा लोकलोचनमानसानुयाता प्रातिष्ठत । )

प्रमतीस आरंभींच घडलेला मनोहर प्रसंग तो निवेदन करतो:—

देव देवस्यान्वेषणाय दिक्षु भ्रमन्नभ्रंकषस्यापि विंध्यपार्श्वारूढस्य वानस्पतेरधः परिणतपतंगबालपल्लवावतंसिते पश्चिमदिगंगनामुखे पल्वलांभस्युपस्पृश्योपास्य संध्यां तमःसमीकृतेषु निम्नोन्नतेषु गंतुमक्षमः क्षमातले किसलयैरुपरचय्य शय्यां शिशयिषमाणः शिरसि कुर्वन्नंजलिं यास्मिन् वनस्पतौ वसति देवता सैव मे शरणमस्तु शरारुचक्रचारभीषणायां शर्वगलश्यामशार्वरांधकारपूराध्यातगभीरगह्वरायामस्यां महाटव्यामेकाकिनो मे प्रसुप्तस्येत्युपधाय वामभुजमशयिषि । ततक्षणादेवावनिदुर्लभेन स्पर्शेनासुखायिषत किल मे गात्राण्याह्लादयिषतेंद्रियाण्यभ्यमनायिष्ट चांतरात्मा विशेषितश्च हृषितास्तनूरुहाः पर्यस्फुरन्मे दक्षिणभुजः । कथं त्विदमिति मंदं मंदमुन्मिषन्नुपर्यच्छचंद्रातपच्छेदकल्पं शुक्लांशुकवितानमैक्षिषि । वामतो वलितदृष्टिः समया सौधभित्ति चित्रास्तरणशायिनमतिविश्रब्धप्रस्तुतमंगनाजनमलक्षयम् । दक्षिणतो दत्तचक्षुरागलितस्तांशुकाममृतफेनपटलपांडुरशयनशायिनीमादिवराहदंष्ट्रांशुकजाललग्नामंसस्रस्तदुग्धसागरदुकूलोत्तरीयां भयसाध्वसमूर्च्छितामिव धरणीमरुणाधरमणिकिरणबालकिसलयलास्यहेतुभिराननारविंदपरिमलोद्ग्राहिभिर्निश्वासमा-

तरिश्वभिरीश्वरेक्षणदहनदग्धं स्फुलिंगशेषमनंगमिव सं-
धुक्षयंतीमंतःसुप्तषट्पदमुंबुजमिव जातानन्दमामीलित-
लोचनेंदीवरमाननं दधानामैरावतमदावलेपलूनापविद्धा-
मिव नंदनवनकल्पवृक्षरत्नमंजरीं कामपि तरुणीमालो-
कयम् । अतर्कयं च । क्क गता सा महाटवी कुत इद-
मूर्ध्वांडकपालसंपुटोल्लेखि शक्तिध्वजशिखरशूलोत्सेधसौ-
धमागतम् । क्क च तदरण्यस्थलीसमास्तीर्णं पल्लवशयनम् ।
कुतस्त्यं चेदमिंदुगभस्तिसंभारभासुरं हंसतूलदुकूलशय-
नम् । एष च को नु शीतरश्मिकिरणरजतरज्जुदोलापरि-
भ्रष्टमूर्च्छित इवाप्सरोगणः स्वैरसुप्तः सुंदरीजनः । का
चेयं देवीवारविंदहस्ता शारदशशांकमंडलामलदुकूलो-
त्तरच्छदमधिशेते शयनतलम् । न तावदेषा देवयोषा
यतो मंदं मंदमिंदुकिरणैः संवाह्यमाना कमलिनीव नि
द्राति । भग्नवृंतश्च्युतरसबिंदुशबलितं पाकपांडु चूतफल-
मिवोद्भिन्नस्वेदरेखं गंडस्थलमालक्ष्यते । अभिनवयौवन-
विदाहनिर्भरोष्मणि कुचतटे वैवर्ण्यमुपैति वर्णकः । वा-
ससी च परिभोगानुरूपं धूसरिमाणमादर्शयतः । तदेषा
मानुष्येव दिष्ट्या चानुच्छिष्टयौवना यतः सौकुमार्यमा-
गताः संतोऽपि संहता इवावयवाः । प्रास्निग्धतमाऽपि
पांडुतानुविद्धेव देहच्छविः । दंतपीडानभिज्ञतया नातिo
विशदरागो मुखे विद्रुमद्युतिरधरमणिः । अनत्यापूर्णमा-
रक्तमूलं चंपकमुकुलमिव कठोरं कपोलतलम् । अनंग-
बाणपातमुक्ताशंकं च विश्रब्धमधुरं सुप्यते । न चैत-
द्वक्षस्थलं निर्दयविमर्दविस्तारितमुखस्तनयुगलम् । अस्ति
चानतिक्रांतशिष्टमर्यादचेतसो ममास्यामासक्तिः । आ-
सक्त्यनुरूपं पुनराश्लिष्टा यदि स्पष्टमार्तरवेणैव सह
निद्रां मोक्ष्यति । अथाहं न शक्ष्यामि चानुपश्लिष्य शा-
यितुम् । अतो यद्भावि तद्भवतु भाग्यमत्र परीक्षिष्य इति

स्पृष्टास्पृष्टामेव किमप्याविद्धरागसाध्वसं लक्ष्यसुप्तः स्थितोऽस्मि । साऽपि किमप्युत्कंपिना रोमोद्भेदवता वामपार्श्वेन सुखायमानेन मंदं मंदं विजृंभिकारंभमंथरांगो त्वंगदग्रपक्ष्मणोश्चक्षुषोरलसतांततारकेण नातिपक्व निद्राकषायितापांगपरभागेन युगलेनेषदुन्मिषंती त्रासविस्मयहर्षरागशंकाविलासविभ्रमव्यवहितानि व्रीडांतराणि कानि कान्यपि कामेनाद्भुतानुभावेनावस्थांतराणि कार्यमाणा परिजनप्रबोधनोद्यतां गिरं कामावेशपरवशं हृदयमंगानि च साध्वसायाससंबध्यमानस्वेदपुलकानि कथं कथमपि निगृह्य सस्पृहेण मधुरकूणितत्रिभागेन मंदमंदप्रचारेण चक्षुषा मदंगानि निर्वर्ण्य दूरोत्सार्पितपूर्वकायापि तस्मिन्नेव शयनतले सचकितमशयिष्ट । अजनिष्ट मे रागाविष्टचेतसोऽपि किमपि निद्रा । पुनरननुकूलस्पर्शदुःखायमानगात्रः प्राबुध्ये । प्रबुद्धस्य च सैव महाटवी तदेव तरुतलं स एव पत्रास्तरो ममाभूत् । बिभावरी च व्ययासीत् । अभूच्च मे मनसि किमयं स्वप्नः किं विप्रलंभो वा किमियमासुरी दैवी वा काऽपि माया । यद्भावि तद्भवतु नाहमिदं तत्त्वतो नावबुध्य मोक्ष्यामि भूमिशय्यां यावदायुरत्रत्यायै देवतायै प्रतिशायिष्यामीति निश्चितमतिरतिष्ठम् ॥

नृत्यवर्णनः—

—विद्युल्लतामिव विडंबयंती भूषणमणिरणितदत्तलयसंवादिपादचारम् अपदेशस्मितप्रभाभिषिक्तबिंबाधरम् अवस्रंसितप्रतिसमाहितशिखंडभारम् समाघट्टितक्काणितरत्नमेखलागुणम् अंचितोत्थितपृथुनितंबविलंबितविचलदंशुकोज्ज्वलम् आकुंचितप्रसृतवेल्लितभुजलताभिहतललितकंदुकम् आवर्जितबाहुपाशम् उपरिवर्तितत्रिकविलग्नलोलकुंतलम् अवगलितकर्णपूरकनकपत्र-

प्रतिसमाधानशीघ्रतानतिक्रामितप्रकृतक्रीडनम् असकृदुत्क्षिप्यमाणहस्तपादबाह्याभ्यंतरभ्रांतकंदुकम् अवनमनोन्नमनैरंतर्यनष्टदृष्टमध्ययष्टिकम् अवपतनोत्पतननिर्व्यवस्थमुक्तहारम् अंकुरितघर्मसलिलदूषितकपोलपत्रभंगशोषणाधिकृतश्रवणपल्लवानिलम् आगलितस्तनतटांशुकानियमव्यापृतैकपाणिपल्लवं च निषद्योत्थाय निमील्योन्मील्य स्थित्वा गत्वा चैवातिचित्रं पर्यक्रीडत राजकन्या । अभिहत्य भूतलाकाशयोरपि क्रीडांतराणि दर्शनीयान्येकेनैव वानेकेनैव कंदुकेनादर्शयत् ॥

उच्छ्वास ६

वरील उताऱ्यांवरून दंडीचे पदलालित्यादि गुण वाचकांच्या लक्षांत येऊन त्याची वर्णनाची शैली किती उत्तम आहे तीही सहज समजेल. अशा प्रकारचे शृंगारवृत्तांत या ग्रंथांत बहुधा सर्वत्र आहेत. त्यांवरून आपला कवि दंडधारण करणारा जती नसावा हें तर काय, पण कालिदास, गोवर्धनाचार्य, जगन्नाथराय यांप्रमाणे मोठा रंगेला असावा असें स्पष्ट दिसून येते. आपल्या वेळच्या ख्यालीखुशालीच्या सर्व प्रकारांचा जातीनें अनुभव घेऊन तो त्यांत पुरा वाकबगार झालेला असावा हें प्रस्तुत ग्रंथावरून उघड होतें. मृच्छकटिक' नाटकांत त्याच्या चतुर कवीनें संविधानकाचा बिघाड न करतां त्या वेळची उज्जयिनीनगराची स्थिति निरनिराळ्या अनेक प्रकारांनीं जशी दाखविली आहे, तशीच तऱ्हा ' दशकुमारचरितां ' तही कांहीं आहे. उदाहरणार्थ हा पुढील जुगाराचा प्रकार पहा:—

अनुप्रविश्य च द्यूतसमाजमक्षधूर्तैः समगांसि । तेषां पंचविंशतिप्रकारासु सर्वासु द्यूताक्षाश्रयासु कलासु कौशलमक्षभूमिहस्तादिषु चात्यंतदुरुपलक्षाणि कूटकर्माणि तन्मूलानि सावलेपान्यधिक्षेपवचनानि जीवितनिरपेक्षाणि संरंभविचेष्टितानि सभिकप्रत्ययव्यवहारान् न्यायबलप्रतापप्रायान् अंगीकृतार्थसाधनक्षमान् बलिषु सांत्वनानि

दुर्बलेषु भर्त्सितानि पक्षरचनानैपुण्यमुच्चावचान्युपप्रलोभनानि ग्लहप्रभेदवर्णनानि द्रव्यसंविभागौदार्यमंतरांतराश्लीलप्रायान् कलहानित्येतानि चान्यानि चानुभवन्न तृप्तिमभ्यगच्छम्। अहसं च किंचित्प्रमाददत्तशारे क्वचित् कितवे प्रतिकितवस्तु निर्दहन्निव क्रोधताम्रया दृशा मामभिवीक्ष्य शिक्षयसि रे द्यूतवर्त्म हासव्याजेनास्तामयमशिक्षितो वराकस्त्वयैव तावद्विचक्षणेन देविष्यामीति। द्यूताध्यक्षानुमत्याव्यत्यसजाव। मया जितश्चासौ षोडशसहस्राणि दीनाराणाम्। तदर्द्धं सभिकाय सभ्येभ्यश्च दत्वाऽर्द्धं स्वीकृत्योदतिष्ठम्। उदतिष्ठंश्च तत्र गतानां हर्षगर्भाः प्रशंसालापाः प्रार्थयमानसभिकानुरोधाच्च तद्गोरसाभ्यवहारविधिमकरवम्। यन्मूलश्च मे दुरोदरावतारः स मे विमर्दको नाम विश्वास्यतरं द्वितीयं हृदयमासीत्॥

उच्छ्वास २

येवढे उतारे बस झाले. यांवरून संविधानकाचा चमत्कार, रसपोष, सृष्टिवर्णन वगैरे गुण 'दशकुमारचरितां' त नसतांही ते संस्कृतज्ञांस कां प्रिय झाले आहे हें तेव्हांच कळून येईल. तरी खरें म्हटलें असता ज्यास्ती उतारेही फारसे घेतां येणार नाहींत हेंही येथें लिहिलें पाहिजे. कां कीं, सांप्रत ग्रंथांत बहुतेक कथाभागच वर्णिला असून वाचकांचें मन रमण्यासारखीं वर्णनें वगैरे पुष्कळ नाहींत. वरच्यासारखीं उगीच कोठें कोठें मध्ये आहेत. शिवाय यापूर्वी वर्णिलेल्या कवींच्या ग्रंथांतून निरनिराळ्या रसाचे उतारे जसे हवे तितके घेतां आले, तसेंही प्रस्तुत ग्रंथात करता येत नाहीं. वरील श्रृंगाराखेरीज इतर कोणत्याही रसाचा उतारा देण्यास यांत सांपडणार नाही. असो; तर याप्रमाणें 'दशकुमारचरिता' चें स्वरूप आहे. त्याची मातब्बरी मुख्यत्वेंकरून त्याच्या बाह्य स्वरूपावरच आहे. तरी हें स्वरूप किती उत्कृष्ट आहे हें वरील थोड्या उताऱ्यांवरूनही मर्मज्ञ वाचकांस तेव्हांच कळून येईल. शिवाय प्रस्तुत कवीच्या तर्फेनें हेंही वाचकांस कळविलें पाहिजे, कीं गद्यरूप कवितेच

यानेंच हा पहिला मासला नवीन काढला असल्यामुळे त्याच्यावर पुढें सुधारणा करून सुबंधूनें व विशेषत: बाणभट्टानें जो रसिकप्रिय ग्रंथ केला त्याशीं 'दशकुमारचरित' ताडून पाहणें बरोबर नव्हे. त्याची गोडी घेत असता दंडीचे उपकार वाचकानीं कृतघ्नपणें विसरूं नये.[1]

---

याप्रमाणें हा दुसरा निबंध आटपला. याविषयीं लिहिण्यास आम्हीं जेव्हा प्रथमत: आरंभ केला तेव्हा शेवटल्या दोन कवींचे चागलेंसे अध्ययन केलें नसल्याकारणानें त्या वेळेस ज्या आमच्या समजुती होत्या त्यांत आता पुष्कळ फेर पडला आहे. हा फेर लक्षपूर्वक ग्रंथ वाचण्याची ज्यास संवय असेल त्याच्या लक्षांत आलाच असेल, व तो आम्हीं जागजागीं सुचविलाही आहे. तोच आतां लक्षांत आणून येथवर झालेल्या पांचाही कवींविषयीं येथे पुन: थाडेसें लिहितों. पहिल्यानें याचा काळ. या पाचजणात कालिदास सर्वांत जुना आहे हें येथे सागायास नकोच. तें मागील निबंधांत सिद्ध केलेंच आहे विचार काय तो बाकीच्या चवघांचाच. याचेही काळ मागें ठरविले आहेत त्यांवरून खात्री होईल की, कालमानानें पहिला दंडी, दुसरा भवभूति, तिसरा सुबंधु, आणि चवथा बाणभट्ट असे झाले. तेव्हा मध्यमकालीन कवींत भवभूतीचीही गणना करावी लागते. तो कालिदासाच्या वर्गांत बसत नाहीं. दुसरें, कवित्वाच्या मानानें योग्यता या रीतीनें पाहतां हे सारे वरच्या पायरीस चढतात;—एका बिचाऱ्या सुबंधूस खेरीज करून! हा मात्र खुद्द 'वासवदत्ता' वरून एकंदरींत पाहता दुसऱ्याच वर्गांत बसतो; तरी आम्ही जे थोडे उतारे त्याच्या ग्रंथांतील दिले आहेत त्यांवरून पाहता तेथें त्यास सर्वथा बसविण्याची तरी पंचाईतच! असो; याप्रमाणें आम्ही केलेला दुसरा वर्ग बहुधा रिकामाच पडतो. कारण कवित्वस्फूर्ति; रसपरिपाक; पदरचनेचें

---

१ सुबंधु—पृष्ठ १७७ यात सुबंधूविषयीं जें लिहिलें आहे तें बरोबर नाहीं. तें वर लिहिल्याप्रमाणें दंडीविषयीं असावें.

प्रसाद. मार्दव, माधुर्य, लालित्य इत्यादि गुण; या सर्वांत दंडी, बाण व अंशतः सुबंधु यांस कालिदासाचीच जरी केवळ सर येणार नाहीं, तरी त्याच्या खालोखाल यांची पायरी खरी, या निबंधाच्या उपोद्घातांत मध्यमप्रतीच्या कवींचें जे स्वरूप आम्हीं सांगितलें आहे तें यांत सर्व प्रकारें लागत नाहीं यांच्या अंगी विद्वत्ता मोठी असून त्यांस पूर्वींच्या कवींचें अध्ययनही करावयास सांपडलें, व त्यामुळें त्यांच्या कल्पना, त्यांचे विचारही अगदीं नवे नाहींत, हें सर्व खरें; पण कवित्वाचा मुख्य गुण जी सहृदयता ती यांच्या ठायीं असून तशीच खरी स्फूर्तीही यांस अनुकूल होती. असो; तेव्हां एकंदरींत विचार करतां ते दुसऱ्याच प्रतींत मोडण्यासारखे अगदीं नाहींत. तरी दुसरा वर्ग करणेंच असल्यास या सर्व कवींची पदरचनेची कृत्रिमता, आणि कालिदासाहून कवित्वगुणांत आणि कालांत हीनता, ही तसें करण्यास उपयोगीं पडेल.

निबंधारंभींच्या उपोद्घाताप्रमाणें संस्कृत कवितेचे येथवर दोन विभाग झाले. आतां तिसऱ्याविषयीं निरूपण करावयाचें. वास्तविक पाहतां मागील अंकांत सांगितल्याप्रमाणें वर दोन विभाग झाले असेंही म्हणतां येत नाहीं. कारण, दुसऱ्यांतले कवि बहुधा सर्वांशीं पहिल्यांच्याच मालिकेंत जातात. तरी विषयनिरूपणाच्या सोईस्तव दुसरा विभाग करावा लागला. त्याप्रमाणेंच आतां तिसराही करूं. या तिसऱ्यांत फारसे कवि येणार नाहींत. तरी ज्यांस सामान्यतः त्यांत घालतात त्यांजविषयीं लिहून हल्लींची स्थितिही या शेवटल्या विभागांत मोडते, यास्तव तिजविषयींही कांहीं लिहिलें पाहिजे.

दुसऱ्या विभागाच्या आरंभीं लिहिण्यांत आलें होतें कीं, त्यांत पुष्कळ कवि येत असून त्यांतील तीनच मुख्यत्वास्तव व गद्यरचनारूप विशेषास्तव निवडले. तशी निवड येथें करण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. कां कीं, ते मुदलींच थोडे आहेत. असें होण्याचें तरी कारण उघड आहे. हल्लींप्रमाणें जेव्हां कवित्वाचा केवळ ऱ्हास झालेला असतो त्या काळांत अगोदर एकादा दुसरा कवि निपजतो, आणि त्याच्याही

काव्यांत ते चिरकाल राहण्यासारखे थोडेच, किंबहुना मुळींच गुण नसल्याकारणानें कांहीं कालानंतर त्याचें नाव व ग्रंथ दोन्ही बुडून जातात. याप्रमाणें झाले असतां शंभर दोनशें वर्षांत एकादा दुसरा कांहीं तरी नांव घेण्यासारखा कवि झालाच तर निर्माण होतो. याशिवाय दुसरें एक जबरदस्त कारण आहे कीं, इकडे छापखाने नव्हते. ग्रंथ लिहावयाचे ते हातानें. तेव्हा एकाद्या काव्याची प्रसिद्धि होणें म्हणजे पंडितांत त्याची चोहोंकडे मान्यता होऊन तें उतरून घेऊन संग्रहास ठेवावें असें जेव्हां पुष्कळास वाटूं लागावें तेव्हा. पण यास पहिलें मोठें विघ्न म्हटलें म्हणजे पंडिताचाच मत्सर व द्वेष. हें विघ्न केवढें मोठें असे हें बहुतेक कवींच्या ग्रंथारंभींच्या प्रस्तावनावरून दिसून येतें. तेव्हा यांतून अगोदर पार पडावें तेव्हा पुढे लोकात मानमान्यता व्हावी. आणि ती होऊन नंतर जेव्हा ग्रंथाचा प्रसार व्हावा तेव्हां त्याच्या प्रसिद्धीस आरंभ झाला म्हणावयाचें. पण सध्यांच्या काळीं छापखान्यांच्या योगानें कशी उत्कृष्ट सोय झाली आहे! एक पैशाची मात्र अनुकूलता करून घेतली कीं, हव्या तितक्या ग्रंथाच्या प्रती तयार होऊन टपाल आगगाडी वगैरे जीं प्रसाराचीं अमोलिक साधनें सर्वांस अलीकडे अनुकूल झालीं आहेत त्याच्या योगानें पाहिजे असल्यास थोडक्याच काळात साऱ्या भूमंडळावरही ग्रंथाचा प्रसार करतां येईल! व असा प्रकार युरोपांतील ग्रंथांचा हरहमेश होतही आहे. असो; तर या सोईमुळें मध्यम प्रतीचे व कनिष्ठ प्रतीचे सर्व प्रकारचे ग्रंथ इंग्लंडांत वगैरे जसे हजारों राहिले आहेत व राहतात, तसें इकडे मुळींच झालें नाहीं. जे जे म्हणून फारच उत्कृष्ट ठरले,--असे कीं, त्यांचा प्रचार लवकरच सार्वत्रिक झाला,--ते मात्र तगून राहिले. बाकीचे कोणी लवकर, कोणी उशीरानें, असे हळुहळू बुडाले असावे. अशा बुडालेल्या शेंकडो ग्रंथांचीं नांवें असून प्रसिद्ध असणाऱ्या कित्येक ग्रंथांतून समजलीं आहेत. असो; तर मागें इंग्लिश कवींच्या वर्णनांत मध्यम प्रतीच्या कवींविषयीं जसा बराच मजकूर लिहावयास सांपडला,

व कनिष्ठ प्रतीच्या कवींविषयीं पुष्कळ लिहिता आला असता, तसें संस्कृत कवींविषयीं करता येत नाहीं. नाम्नच प्रस्तुत स्थळीं या तिसऱ्या प्रतीच्या कवींचे विशेष सामान्यतः सांगून नंतर कांहींकां-विषयीं विशेषतः निरूपण करूं.

सर्व राष्ट्रांच्या कवितेंत असा एक काळ दृष्टीस पडतो कीं, ज्या वेळेस कवितेचें साधें शुद्ध स्वरूप अगदीं नष्ट होऊन त्याच्या जागीं कांहीं विलक्षण तऱ्हेचें कृत्रिम असें स्वरूप तीला आलें असतें. मूळच्या कवींच्या काव्यांत अगदीं स्वाभाविक म्हणजे सहज सरळरीत्या मनात येणारे असे विचार असतात; या शेवटल्यांच्यांत तसें कधीं नसून कधीं कोणाच्या स्वप्नींही यावयाचे नाहींत असे ओढून ताणून आणलेले विचार भरलेले असतात. आणि अशा रीतीनें जो खूप भरकटेल तो फार उत्कृष्ट कवि असा निवडला जातो. तसेंच पहिल्यांच्या ग्रंथांत अर्थावरच सर्वथा धोरण असून शब्दांवर कधींही कटाक्ष असत नाहीं; पण दुसऱ्यांचें तेंच अगदीं उलट असतें. कोणताही कोटि करण्याचा व विशेषतः श्लेषाचा प्रसंग आला, आणि तो यांनीं दवडला असें कधीं व्हावयाचें नाहीं. आपण जें लिहिलें त्यांत सामान्य मनुष्याच्या भाषणाप्रमाणें एकच सरळ अर्थ असला, तर त्यांत काय मातब्बरी? निदान दोन तरी अर्थ निघाले पाहिजेत. तसेंच एकादा पदार्थ पाहून साऱ्या जगाच्या मनांत ज्या कल्पना उभ्या राहतात, त्या आपणासारख्या महाकवी-च्याही मनांत आल्या तर मग आपली कवित्वशक्ति ती काय? असे वेडगळ भ्रम मनांत शिरले असल्यामुळे त्यांचें जें स्वरूप ग्रंथाच्या रूपानें बाहेर पडतें तें मोठें विलक्षण असल्यास काय नवल! दुर्बोधता व क्लिष्टत्व हे दोष तर सहजच त्यांत येतात; व अर्थाचीही त्यामुळें हानि होते हें उघडच आहे. असो; इंग्लंडांत अशा प्रकारचे कवि एकदां पुष्कळ होऊन गेले, त्यांत प्रसिद्ध कवि **कौले** हा अग्रगण्य होय. **जॉन्सन्** यानें आपल्या 'कविचरित्रां'त वरील कवींच्या वृत्तांतांत या विलक्षण कवींची खूप फजीती उडवून त्याचे बंड असें मोडून टाकिलें आहे कीं, त्यांचें पुनः कोणीं कधीं नांव काढूं नये!

असेंच कोणीं मनावर घेतल्यास संस्कृतांतही पुष्कळ होण्यासारखें आहे. मागें वर्णन केलेल्या **सुबंधूच्या** ग्रंथांत असा प्रकार पुष्कळ आहे हें मागें सांगितलेंच आहे; व तसेंच 'राघवपांडवीय' नामक **कविराज** कवीच्या ग्रंथाचाही तेथें थोडा उल्लेख कला आहे त्यांतही आहे. या ग्रंथाच्या नांवाप्रमाणेंच रामायण व भारत या दोहोंचेही संविधानक यांत सारख्याच पदांनीं बांधलें असल्यामुळें हा सगळा ग्रंथ एक लांबलचक श्लेषच आहे असें म्हटलें असतां चालेल! **कालिदासाच्या** नांवावर मोडणारें 'नलोदय' काव्यही याच प्रकारचें आहे हें सांगावयास नकोच. आतां हा प्रकार कोणापासून विशेष प्रवृत्त झाला हें निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. तरी अलीकडील पंडितांच्या मतें पंचकाव्यांत शेखरीभूत जें 'नैषध' त्यापासून याची प्रवृत्ति पुष्कळ चालू झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. हें शेवटलें महाकाव्य **श्रीहर्ष** नांवाच्या राजानें रचिलें हें सर्वप्रसिद्धच आहे. यांत कोड्या, अकटोविकट कल्पना, श्लेष इत्यादिकांची गर्दी आहे. 'पंचनली' म्हणून त्यांत शेवटीं एक प्रकरण आहे, त्यांत पांचा नळांचें वर्णन सरस्वती दमयंतीस करते आहे, तेथें तर कवीनें आपल्या कवित्वाची शर्थ केली आहे. बोलणारें पात्र प्रत्यक्ष वाग्देवताच, आणि काव्य रचणारे कवि तिच्या हातावरील केवळ पोपटच, मग काय विचारायाचें आहे! प्रत्येक श्लोक खऱ्या नलास लागून इंद्रादि चार वेषधारी देवांसही ते लागतात. असो; अशा प्रकारचे त्यांनी चमत्कार केले आहेत. आतां आंतील कल्पना, विचार वगैरे अंतःस्वरूप न पाहतां या कवींच्या कृतीच्या बाह्य स्वरूपाकडे जर नजर पोंचविली, तर तें उत्कृष्ट असतें असें सर्व वाचणारांच्या तेव्हांच लक्षांत येईल. म्हणजे मृदुत्व, मधुरता, लालित्य इत्यादि गुण त्यांच्या पदरचनेंत पूर्णत्वानें असतात. केवळ श्रवणमात्रेंकरूनच मन आनंदयुक्त

---

१ 'राजतरंगिणी'त वर्णिलेला हर्षराजा हाच असल्यास याचा काळ इ. स. १११३ या सुमाराचा आहे असें म्हणण्यास चिंता नाहीं. यानेंच 'रत्नावली' व 'नागानंद' हीं नाटकें रचिलीं अशी वदंता आहे.

व प्रसन्न व्हावें अशा तऱ्हेची नुसत्या शब्दांचीच ठेवण त्यांची कांहीं खुबदार असते. या गुणांत कालिदासादि जुन्या सर्वमान्य कवींसही ते कांहीं अंशीं मागें टाकतात असें सुद्धां म्हटलें असतां चालेल. असो; तर याप्रमाणें कवितेच्या साक्षात् तत्त्वापर्यंत यांची गति होत नसल्यामुळें तिच्या बाह्य स्वरूपावरच हे आपली करामत खर्चितात. पण जे खरे ज्ञाते असतात ते अंतःस्वरूपासच विशेष चाहत असल्यामुळें ते या कवींच्या बाहेरील थाटमाटास विशेष मान देत नाहींत.

